# हृदयतरंग

पुस्तक २ रें



लेखक

दत्तात्रेय अनंत आपटे

प्रकाशक

शंकर नरहर जोशी








आवृत्ति पहिली

शा. श. १८४२

किंमत सव्वा रुपाया

श्रीः

# तटस्थाचे विचारतरंग !



[ अफाट नीलवर्ण समुद्र किंवा एखादें प्रशस्त सुंदर सरोवर अथवा नदीचें पात्र यांच्या तीरावर बसून, समोर चालणारी तरंगलीला पहात असतां, कोणाहि मनुष्याच्या मनांत अनेक प्रकारचे विचारतरंग स्वाभाविकपणें उद्भवतात, ही गोष्ट सर्वांच्या अनुभवांतलीच आहे. कविमित्र '**अनंततनय**' यांच्या पुस्तकाचें नांव '**हृदयतरंग**' असें आहे. तेव्हां त्यास अनुसरून प्रस्तावनेस वरील मथळा दिला आहे हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. ]

कीं हें पुरुषार्थाचें वैभव। कीं हें जगदीश्वराचें महत्त्व<br>
नाना लाघवें सत्कीर्तिस्तव। निर्माण **कवी** ॥ ३ ॥

\+ + + +

नसता कवीचा व्यापार। तरी कैंचा असता जगदुद्धार ॥<br>
म्हणोनी **कवी** हे आधार। सकल सृष्टीसी ॥ २१ ॥

—श्रीदासबोध द. १ स. ७

" ——these rare souls,<br>
Poets, whose thoughts enrich the blood of this world.

Tennyson : *The Princess.*

\+ + + +

दिशि दिशि निरपेक्षस्तावकीनं विवृण्वन्।<br>
परिमलवहमन्यो बान्धवो गन्धवाहः ॥

पण्डित जगन्नाथराय.

प्रकटामोद फुलांचा वाढे हरपे न वाऽन्यजनशपथें।<br>
सौरभसुखित रसिक तरि जाइ कवण वानितां न त्या स्वपथें ॥

अलीकडे लहान मोठीं स्वतंत्र काव्यें किंवा निरनिराळ्या कवींच्या कवितांतील निवडक वेच्यांचीं पुस्तकें बरींच प्रसिद्ध होत आहेत. ही गोष्ट मराठी वाङ्मयाच्या सर्वांगीण प्रगतीच्या दृष्टीनें फार अभिनंदनीय व आशाजनक आहे यांत शंका नाहीं. कोणत्याहि भाषेतील वाङ्मयाचे मुख्य ठोकळ विभाग म्हटले म्हणजे गद्यरचना व पद्यरचना हे दोनच होत. त्यापैकीं गद्यरचनेच्या बाबतींत मराठी भाषेच्या प्रगतीचें प्रमाण बरेंच समाधानकारक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. जगांतील आधुनिक परिस्थित्यनुरूप, आपली उन्नति होण्यास आणि जगांतील ज्ञानविज्ञान विषयात्मक चढाओढींत भारतीयांचा दर्जा पुढें सरसावण्यास प्रथमतः आपापल्या मातृभाषेंतील ज्ञानसंपत्ति वाढली पाहिजे; स्वभाषेंत आपला इतिहास व आपली संस्कृति यांचें, आणि त्याचप्रमाणें तुलनात्मक दृष्टीनें जगांतील इतर प्राचीन आर्वाचीन राष्ट्रांचे इतिहास आणि संस्कृति यांचेहि यथार्थ ज्ञान साधारण जनसमाजास सुलभ व चित्ताकर्षक रीतीनें करून देणारे अनेक लहान मोठे ग्रंथ निर्माण झाले पाहिजेत; तसेंच हल्लींचा काळ आधिभौतिक सुधारणेचा आणि औद्योगिक स्पर्धेचा असल्यामुळें निरानिराळीं भौतिकशास्त्रें, भारतभूषण, **सर जगदीशचंद्र** बोस यांच्या अद्वितीय शोधांसारखे किंवा विमानें, बिनतारी संदेशप्रेषण, पाणसुरंग, आकाशतोफा वगैरे सारखे प्रत्यहीं नवे नवे लागणारे आणि एकंदर जगाच्या आचारविचारांत सुखदुःखमिश्रित व कल्पनातीत क्रांति घडवून आणणारे शास्त्रीय शोध किंवा शेतकी, यंत्रविद्या, कलाहुन्नर, यूरोपच्या निरनिराळ्या देशांतील जनतेची व मजूरवर्गाची अंतःस्थिति इत्यादि अनेक महत्त्वाच्या गोष्टींचें ज्ञान साधारण जनसमाजास सुबोध ग्रंथद्वारें करून देणें अत्यंत इष्ट व अवश्य आहे—अशी जाणीव आमच्यांत बरीच उत्पन्न होऊं लागली आहे, तिचें दृश्य फल म्हटलें म्हणजे निरानिराळे ऐतिहासिक अथवा सामाजिक माहितीचे तुलनात्मक चर्चेचे लहानमोठे ग्रंथ, आणि नवीं नवीं औद्योगिक विषयांस वाहिलेलीं मासिक पुस्तकें यांचें थोडें बहुत पण निश्चित स्वरूपाचें दिसून येणारें वाढतें प्रमाण हें होय.

केवळ व्यवहाराच्याच दृष्टीपुरता विचार केला तर, काव्याचें अथवा पद्यरचनेचें कार्यक्षेत्र गद्यरचनेइतकें सर्वव्यापी किंवा प्रत्यक्षोपयोगी असणें शक्य

नाहीं हें उघडच आहे. तथापि ज्या परिस्थितीच्या योगानें व नवनवीन सर्वगामी प्रगतीच्या योगानें गद्यरचनेवर परिणाम झाला व तिला संचालन मिळून विविधत्व प्राप्त होऊं लागलें आहे त्याच परिस्थितीचा व प्रगतिपरिणामांचा प्रवेश काव्यप्रदेशांतहि होणें साहजीक आहे—किंबहुना अपरिहार्यच आहे. म्हणूनच, ब्रिटिश अमलाच्या पहिल्या ५०।७५ वर्षांत, जें व जितक्या प्रमाणाचें स्वरूप होतें त्याच्या पेक्षां गेल्या ३० वर्षांत निरनिराळ्या तऱ्हेची व अधिक विपुल प्रमाणाची काव्यरचना स्वतंत्रपणें व मासिकपुस्तकादिकांच्या द्वारें झाली आहे, ही गोष्ट मराठी वाङ्मयाचें वरवर निरीक्षण करणाऱ्याच्याहि सहज ध्यानांत येण्यासारखी आहे.

पहिल्या ५०।७५ वर्षांपर्यंतची काव्यरचना मुख्यतः (१) संस्कृतांतील नाटकें महाकाव्यादिकांच्या भाषांतरपर (२) संस्कृत काव्यपद्धतीच्या ठरींव नियमानुसार, ऐतिहासिक अथवा आधुनिक प्रासंगिक विषयपर आणि (३) इंग्रजी वाङ्मयांतील उत्तमोत्तम व सर्वसाधारण स्वरूपाचे चुटके वगैरेच्या भाषांतरपर अशा त्रिविध स्वरूपाची होती. वरील तिसऱ्या पोटविभागांत " सर्व साधारण स्वरूपाचे चुटक इ. " असें जें म्हटलें आहे तें विशेष हेतुनें म्हटलें आहे. ' सर्वसाधारण स्वरूपाचे चुटके ' याचा अर्थ असा कीं ज्या चुटक्यांमध्यें कांहीं विशिष्ट स्थल देश काल अथवा ऐतिहासिक निवेदनाचा, अथवा विशिष्ट सामाजिक चालीरीतीच्या वर्णनस्वारस्याचा संबंध नाहीं आणि ज्यांत मुख्यतः सर्वसाधारण मानवी अनुभवाच्या निरीक्षणशक्ति व विचारसरणीच्या दृष्टीनें, मनास पटतील असे उदात्त विचार बोधप्रद नीतितत्त्वें, किंवा चित्ताकर्षक रम्य सृष्टिचित्रेंच प्रतिबिंबित झालेलीं आहेत अशा प्रकारचे ते चुटके होत म्हणजे ज्यांचे मराठींत अवतरण करितांना, मूळांतील शब्दस्वारस्याची व विचार वर्णनादिकांच्या यथार्थत्वाची छाया खुबीदार भाषांतराच्या द्वारें वाचकांच्या प्रत्ययास आणून दिली कीं, कवीचें काम संपलें ! मग त्या काव्यास आल्हादजनकपणा व मनोरमत्व आणण्यास, निरनिराळ्या प्रयत्नाची किंवा अधिक रचनाकौशल्याची अपेक्षा उरत नसते.

गेल्या २५।३० वर्षांतील काव्यरचनेंत क्रमाक्रमानें पुढील निरनिराळ्या

प्रवृत्तींचें आविष्करण व संमिश्रण झालेलें दिसतें. (१) इंग्रजी वाङ्मयांत ज्या-प्रमाणें 'गीतक' ( Lyric ) 'स्वनितक' ( Sonnet ) 'उद्देशिका' ( Ode ) वगैरे विशिष्ट नांवें असलेले, प्रासंगिक, सृष्टिशोभावर्णनात्मक, मननात्मक, निवेदनात्मक तत्त्वबोधनात्मक असे स्फुट कवितांचे प्रकार आहेत त्या धर्तीवर आपल्या इकडील नेहमींच्या व्यवहारांत दृष्टीस पडणारी एखादी वस्तु, व्यक्ति, अथवा नित्य घडणारा किंवा विशिष्ट वेळीं घडलेला प्रकार यांस अनुलक्षून स्वतंत्र पण स्फुट स्वरूपाची कविता. (२) पाश्चात्य देशांतील स्वतंत्र सामाजिक परिस्थितीस व संस्कृतीस अनुसरून स्त्रीपुरुषांचे प्रणयसंबंध किंवा त्यांच्या विलासविहाराच्या विशिष्ट कल्पना यांच्या अनुरोधानें त्यांच्या वाङ्मयांत दांपत्यप्रेम व प्रणयविहार यांच्या वर्णनपर जे अनेक स्फुट चुटके आढळतात त्यांच्या धर्तीवर इकडील शृंगाराचें व प्रणयचेष्टांचें वर्णन करणे. (३) श्रीभगवान् राधाकृष्णाच्या केलिकौतुकाचें व गोपांच्या रासलीलेचे आध्यात्मिक रहस्यांचें उद्घाटन करण्याचे प्रयत्न. (४) विश्वैक्य व अनुहातनादश्रवण किंवा विश्वांतील सर्वव्यापी सूक्ष्म संगीत याची आत्मप्रतीति होऊन त्याच्या स्फूर्तींत कवितेचें अनुकरण. (५) बाह्य जड व अचेतन ( अर्थात् साधारण माणसाच्या स्थूल दृष्टीनें सृष्टीशीं सचेतन सृष्टीचें तादात्म्य दर्शविणें व जडसृष्टीस सचेतनत्व देऊन त्यांतून रम्याद्भुतत्व (Romance) निर्माण करूं पाहणें. (६) "शाहिर" संप्रदायाचा जीर्णोद्धार व ऐतिहासिक स्वाभिमान जागृत करणें. (७) प्राकृत अथवा ग्राम्य ( अर्थात प्रचलित भाषेच्या दृष्टीनें ) म्हणून काव्यरसशून्य मानिलेल्या कित्येक शब्दांचें काव्यदृष्ट्या 'पतितपरावर्तन' करणें व त्यास उदात्तत्वाची व उन्नतत्वाची कळा आणणें. (८) 'गूढगुंजनाची' प्रवृत्ति. (Mysticism)

वर ज्या प्रवृत्ति दर्शविल्या आहेत त्या केवळ, गेल्या २५।३० वर्षांत झालेल्या काव्यरचनेचें स्थूलमानानें निरीक्षण करणाऱ्याच्याहि सहज ध्यानांत येतील अशाच मोघम स्वरूपांत दर्शविल्या आहेत. कालक्रम, काव्यशास्त्राचे नियम अथवा तर्कशास्त्राची वर्गीकरण पद्धति, यांच्या दोरीसूद सांच्यांत बसतील अशा रीतीनें त्यांचा निर्देश केला नाहीं, व तशा तऱ्हेचा प्रयत्न करणें हें कार्य प्रस्तुत-

सारख्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत, प्रयोजनाच्या किंवा अवश्यकतेच्या दृष्टीनें, येऊंहि शकत नाहीं. कारण माझ्या मतें प्रस्तुत पुस्तकासारख्या पुस्तकाच्या प्रस्तावनेचा मुख्य उद्देश हा असावा कीं आधुनिक कवितेंत एकामागून एक ज्या निरनिराळ्या प्रवृत्ति दृग्गोचर झाल्या त्यांचें स्वरूप सामान्य वाचकांच्या लक्षांत साधारणपणें यावें आणि हल्लीं मराठी काव्यौघाचें स्वरूप काय आहे, विशेष काव्याचें ध्येय व पर्यवसान यांच्या संबंधीं केवळ तात्त्विक विवेचन, पारिभाषिक संज्ञासंबंधीं काथ्याकूट किंवा विशिष्ट मतानुयायी 'संप्रदाय' किंवा 'पंथ' यांचा दुराग्रहयुक्त पुरस्कार इ. इ. गोष्टींच्या खोल पाण्यांत अथवा उद्वेगजनक कर्दमांत न शिरतां, केवळ, सदभिरुचीच्या बहुश्रुत, विचारी व निर्विकार (पक्षपात किंवा अभिनिवेश यांनीं रहित) अशा सामान्य रसिकाच्या विचार–सरणीनें, व निरीक्षण दृष्टीनें पाहूं गेले असतां, चांगलें काव्य कोणतें; अमुक एक काव्य 'चांगलें' असें सामान्यतः प्रतीतीस आलें, तरी त्या काव्याच्या चांगुलपणाचा 'आत्मा' कोणत्या विशिष्ट भागांत आहे म्हणजे त्या काव्याचा चांगुलपण व त्यांतील विशिष्ट ओळी, शब्द, कल्पना, विचारसरणी अथवा विषयाची निवड कोणत्या एका किंवा अनेक अंगांमुळेंच विशेष करून आहे, किंवा एखाद्या काव्याचा चांगलेपणा, त्यांतील या सर्व अंगाच्या 'गोळाबेरजे'मुळें मनावर होणारा अनकूल परिणाम अशाच स्वरूपाचा आहे; तसेंच एखाद्या काव्याचे चांगलेपणांत वरील अंगापैकीं कोणत्या अंगाच्या पूर्ण अभावामुळें अथवा कमी प्रमाणामुळें, न्यून आलेलें आहे इ. इ. गोष्टींची आपल्या ठिकाणीं सामान्यपणें तरी बिनचूक छाननी करितां येऊन, जेणें करून सत्काव्याचा रसास्वाद घेण्याच्या कामीं त्यांची बुद्धि व जिज्ञासा विकसित होईल व परीक्षणाची शक्तीहि अधिक प्रगल्भ होईल अशा तऱ्हेचे कित्येक विचार अगदां संक्षपानें कां होईना त्यांच्या-पुढें मांडले जावे या उद्देशास अनुसरूनच आरंभी आधुनिक काव्यरचनेंत दिसून येणाऱ्या ठोकळ प्रवृत्तींचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहे. वरील प्रवृत्ति सकृद्दर्शनीं जरी पृथक् पृथक् अशा स्वरूपाच्या वाटल्या तरी, वस्तुतः त्या एकाच व्यापक प्रवृत्तीच्या अंगभूत आहेत; व पहिल्या ५०।७५ वर्षांतील काव्यरचनेहून, गेल्य २५।३० वर्षांतील काव्यरचनेस स्पष्टपणें भिन्न स्वरूप येण्यास हीच प्रवृत्ति कारणीभूत झाली आहे. ही प्रवृत्ति म्हटली म्हणजे, पाश्चात्य किंवा मुख्यत·

इंग्रजी वाङ्मयाच्या धर्तीवर आपण आपल्या कवितेस वळण दिलें पाहिजे, व देत आहों—मराठी काव्यरचनेंत आपण कांहीं अपूर्व नवीन मनूचा अवतार निर्माण करीत आहों अशी अलीकडील बऱ्याचशा कवींची दिसून येणारी समजूत ही होय. म्हणूनच, या अलीकडील पुष्कळ कवींच्या कृतींत खरा विकास, किंवा निदान खऱ्या काव्यविकासाविषयीं सहेतुक व विचारपूर्वक परिश्रम यांचें अस्तित्व क्वचितच दिसून येत असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. केवळ वर दर्शविलेल्या समजुतीच्याच भरीं पडलेल्या कित्येक कवींना असें वाटतें कीं कांहीं ठरीव तऱ्हेची संस्कारहीन शब्दरचना किंवा विचार व कल्पना यांची जुळणी केली कीं नवीन काव्य झालें ! परंतु या भ्रामक समजुतीचा परिणाम खुद्द कवीवरच असा होतो कीं, त्यांच्यांत चांगल्या कविताशक्तीचें बीज असतांहि योग्य परिश्रमानें व सद्‌व्यासंगानें त्याचा विकास होत नाहीं; व सत्काव्याची व्यापक कल्पना ग्रहण करण्याच्या बाबतींत त्याची मानसिक प्रगति—सांचलेल्या पाण्याच्या डबक्याप्रमाणें—कुंठित होते.

या गोष्टीचें उत्तम प्रत्यंतर म्हटलें म्हणजे, काव्याचें लक्षण, पूर्वकालीन मराठी कवींच्या काव्यांचें स्वरूप व त्या कवींची योग्यता, सयमक-निर्यमक कविता, व आधुनिक कवींची योग्यता व त्यांच्या काव्याचें स्वरूप या संबंधीं जे अनेक वादविवाद व ज्या खडाजंगी चर्चा उपस्थित होतात, त्याच्यांत चांगलें प्रतिबिंबित झालेलें दिसतें. अर्थात् याचा दोष केवळ अमुक एक किंवा अन्यपक्षाकडेच आहे असें कोणीहि समंजस मनुष्य म्हणणार नाहीं. परंतु आपल्यांतील काव्यवाङ्मयाची प्रगति इच्छिणाऱ्या कोणाहि सहृदय व निःपक्षपाती मनुष्यास विषादाची व चमत्कारिक गोष्ट वाटते ती हीच कीं, अजूनहि वरील गोष्टीसंबंधाचे वादविवाद थांबूं नयेत किंवा त्यांतील तत्त्वबोधाच्या बाबतींत अजून एकवाक्यता होऊं नये ! जगाच्या आरंभापासून 'द्वंद्व' हें सृष्टीचें बीजभूत व आधाररूप तत्त्वच आहे म्हणून कित्येक विषयाच्या मूल तत्त्वांसंबंधानें सुद्धां 'बीज अगोदर कीं अंकुर अगोदर' अशासारखे वाद नेहमीं चालावयाचेच. अशा अंतिम कोटीच्या 'वेदांती' विचारसरणीनें विचार केला असतां, वर सांगितलेल्या गोष्टीसंबंधीं एकवाक्यता होणें, कितीहि इष्ट असलें तरी शक्य नाहीं हें खरें !

तथापि, व्यावहारिक समंजसपणाच्या दृष्टीनें विचार केल्यास, ही एकवाक्यता होणें सर्वस्वीच अशक्य आहे असें नाहीं. कारण, अशासारख्या बाबतींत जो 'मतामतांचा गलबला' दिसून येतो तो मुख्यतः—एक तर ज्याविषयीं वाद उपस्थित झालेला असतो त्याच्या व्यापक स्वरूपाविषयीं उभय विवादकांना नीटशी यथार्थ कल्पना नसते आणि दुसरें 'प्रतिपक्षांनले' म्हणून समजले जाणाऱ्या लोकांच्या म्हणण्याचा खरा आशय काय आहे, त्यांचा 'दृष्टिकोण'—कोणता आहे—कोणत्या दृष्टीनें विचार करून प्रतिपक्षी आपलें मत व्यक्त करीत आहे—हें समजून घेण्याइतकी मनाची स्थिरता अथवा हें समजावून देतां येईल अशी मनाची समता उभयतांकडून ठेविली जात नाहीं—या दोन गोष्टींमुळेंच उपस्थित झालेला असतो.

या सर्व गोष्टी ध्यानांत घेऊन एकवाक्यतेच्या दृष्टीनें वरील मुद्द्यांचे आतां थोडक्यांत विवेचन करितों.

"रमणीय अर्थ प्रतिपादन करणारा शब्द तें काव्य" ही पंडित जगन्नाथ-रायांची व्याख्या सर्वश्रुतच आहे. ही व्याख्या व्यक्त स्वरूपाची आहे; आणि ती संस्कृत वाङ्मयाच्या परंपरेस अनुसरून आहे. कारण संस्कृतांत केवळ पद्यमय किंवा श्लोकरचनात्मक काव्यें आणि नाटकचंप्वादिकांसारखीं गद्यपद्यमिश्रित काव्यें या दोहोंचाहि समावेश 'काव्य' या सदराखालीं होतो. परंतु मराठी वाङ्मयांत पद्यरचनात्मक रचनेलाच मुख्यतः 'काव्य' समजण्याची परंपरा रूढ झालेली आहे; आणि या दृष्टीनेंच 'काव्या'-संबंधाच्या सर्व वादग्रस्त मुद्द्यांचा विचार केला पाहिजे. असा विचार करण्याची खबरदारी ठेविली कीं पुष्कळशा गैरसमजाचा तावडतोब उलगडा होऊन 'तुटे वाद तो हीत संवादकारी' असा वादाचा शेवट गोड होतो. केवळ वाटेल ती पद्यरचना म्हणजे काव्य अशी वर-वर विचार करणाऱ्या व एकांगी रसिकतेच्या साधारण मनुष्याची समजूत असते, किंवा केवळ परंपरेच्याच दुराग्रहाच्या भरीस पडूनहि, एखादा मनुष्य वरील कल्पनेस बिलगून राहतो. 'काव्या' संबंधीं वरील या दोन्ही संकोचा-तिरेकयुक्त समजुतींचें अयथार्थत्व दाखविण्यासाठीं, किंवा 'काव्या'चा खरा जिव्हाळा व बीजस्वरूप साधारण मनुष्याच्या मनावर ठसवून त्याची 'काव्या'

बद्दलची कल्पना व्यापक करून त्याच्या ठिकाणीं उदात्त रसिकतेचा विकास करण्यासाठीं—या दोन हेतूंपुरतीच पंडित जगन्नाथरायाची व्याख्या मराठी वाङ्मयाच्या काव्यचर्चेस उपयुक्त होण्यासारखी आहे. परंतु परंपरेच्या दृष्टीनें पाहिलें कीं, पद्यात्मक रचना हेंच मराठी काव्याचें रूप आहे व तें तसेंच राहणार यांत शंका नाहीं. कारण, परंपरा म्हणजे कोणत्याहि गोष्टींत वेळावेळीं जीं स्थित्यंतरें होत असतात, त्या गोष्टीच्या प्रकृतीला (Genius)—बीजभूत स्वभावाला—अनुरूप असणाऱ्या आणि त्या गोष्टीस आधारभूत असणाऱ्या तत्त्वांचा योग्य विकास व परिपोष करणारे जे स्थायी अंश असतात ते अंश मूळ गोष्टींत पूर्णपणें मिसळले व मुरले म्हणजे त्या गोष्टीचें वेळोवेळीं जें विशिष्ट व एकवटलेलें स्वरूप होतें त्यालाच ‘ परंपरा ’ हें अखंड प्रवाहमूलक नांव आहे. तेव्हां कोणत्याहि बाबतींत ‘ परंपरा ’ पाळून प्रगति करा असा जो कित्येकांकडून उपदेश करण्यांत येतो तो केवळ कांहीं तरी जुन्या पुराण्या वडगळ समजुतींना कवटाळून रहा अशा स्वरूपाचा नसतो. म्हणूनच, ‘ गद्यामध्ये काव्य असूं शकतें ही गोष्ट आमच्या लोकांस—साधारण समाजास—माहित नाहीं, ती आम्हीं इंग्रजी वाङ्मयाच्या अध्ययनानें शिकलों, काव्याची खरी कल्पनाहि आम्हांस पाश्चात्य वाङ्मयावरूनच प्रथम कळली व त्यांतील काव्य वाङ्मयांत ती खरी दिसून येते अशा आशयाचीं जीं विधानें कित्येकांकडून करण्यांत येतात किंवा मराठी कवितेच्या व काव्य वाङ्मयाच्या सुधारणेसाठी पाश्चात्य वाङ्मयांतील कविता किंवा काव्यमीमांसक हेच प्रमाणभूत समजले पाहिजेत, असें जें कित्येक प्रतिपादितात त्याचें कारण हेंच होय कीं, त्यांनीं आपल्या संस्कृत काव्य-वाङ्मयाचा किंवा मराठी कवितेचा तादृश व्यासंग किंवा परिशीलन केलेलें नसतें.

संस्कृत व प्राकृत वाङ्मयाचें—आदरयुक्त राहो, पण नुसतें—आस्थायुक्त अध्ययन व परिशीलन न केल्यामुळेंच सध्यां मराठी कवितेसंबंधीं अनेक तऱ्हेचे निष्कारण गैरसमज व दुराग्रहमूलक शुष्कवाद माजले आहेत; आणि वरील अध्ययनाच्या व परिशीलनाच्या अभावामुळेंच अलीकडील पुष्कळ होतकरू कवींत आनंददायक कविता करण्याची स्वाभाविक पात्रता असतांहि त्यांच्याकडून योग्य तशी रचना निर्माण होऊं शकत नाहीं; व मराठी कवितेची प्रगति जशी सुव्यवस्थित व त्वरित व्हावयास पाहिजे तशी ती होत नाहीं.

गद्यांतहि काव्य असतें—नव्हे—गद्यहि काव्य असू शकतें ; खरे 'कवि' जन्मतात, ते 'बनवितां' यत नाहींत ; खऱ्या काव्याला भाषेच्या टाकाठिक-पणाची व यमकप्रासादिक बाह्य व कृत्रिम अलंकारांची मुळींच अपेक्षा नाहीं इत्यादि विधानें, खऱ्या कवीच्या विरलत्वाचें किंवा काव्याच्या उदात्त स्वरूपाचें प्रतिपादन करितांना, सर्वसामान्य सिद्धान्त या नात्यानें कोणासहि संमत होऊं शकतील. परंतु मराठी कवितेची जी सध्यांची स्थिति आहे तिच्या संबंधानें वस्तुस्थितिदर्शक म्हणून वरील विधानें निरनिराळया व्यक्तीस किंवा त्यांच्या कवितेस लावूं पहाण्याचा जो कित्येकांकडून मोठ्या अट्टहासानें प्रयत्न करण्यांत येतो तो मात्र अगदीं अप्रयोजक व हास्यास्पद आहे असें म्हटल्याव चूक राहवत नाहीं. अलीकडील काळांत मराठी कवितेची फारशी प्रगति झाली नाही असा कोणी आक्षेप घेतल्यास जे लोक उत्तर देतात कीं ५०।७५ वर्षांचा काळ हा कांहीं वाङ्मयाच्या प्रगति—अप्रगतीसंबंधीं निश्चित अनुमान करण्यास पुरेसा नाहीं त्याच लोकांना एवढ्याशा अल्प काळांत शेले, वर्डस्वर्थ, शेक्सपियर वगैरेंच्या तोडीचे अनेक 'प्रतिभाशाली' अद्वितीय, अनुपम असे एकाहून जास्त कवि झाल्याचे आढळतात ! अध्ययन, विद्या, शील वगैरे विशेष गुण अंगीं नसतां जर कोणी एखादा नुसत्या स्वतःच्या जन्माच्या जातीवरून, ब्राह्मण्याचा डौल मारूं लागला तर ज्या लोकांना तें मोठें 'अब्रह्मण्यम्' वाटतें आणि त्याच्या निषेधार्थ ज्या लोकांच्या जिव्हाग्रीं 'जन्मना जायते शूद्रः संस्काराद् द्विज उच्यते' हें स्वस्तिवचन चटकन् येतें त्याच लोकांना जर कोणी एखाद्या खऱ्या रसिक व काव्यभक्त्यानें असें सांगितलें कीं, बाबांनो ! मनुष्याच्या अंगीं जात्या थोडीबहुत कवित्वशक्ति असली तरी, योग्य अध्ययन, निरीक्षण, आपल्या काव्यकल्पना सुबोध पण उचित व रम्य शब्दानें व्यक्त करण्याची शैली इत्यादि गुण संपादन करण्यासाठीं करावे लागणारे थोडे बहुत परिश्रम आणि मनाची असावी लागणारी विनीत वृत्ति या गोष्टींचे 'संस्कार' त्या कवित्व शक्तीवर घडल्याखेरीज त्या कवित्वाची फारशी मातब्बरी नाहीं; किंबहुना तें खरें कवित्वच होऊं शकत नाहीं,—या दृष्टीनें विचार केला तर अलीकडील कांहीं होतकरू कवि 'कवि' या पदवीला पुढें मागें पात्र होण्यासारखे असूनहि वरील

गुणांच्या व बुद्धिपूर्वक परिश्रमांच्या अभावीं त्यांचें कवित्व पुष्कळांशीं वाढ खुंटल्यासारखे खुरटलेलें व तुटपुंजें वाटतें, तर लागलीच, हे—स्वतःस काव्याचे खरे मर्मज्ञ व भोक्ते समजणारे, आणि म्हणून, ज्यांच्या ठिकाणीं परमतरसिकता नसली तर निदान परमतसहिष्णुता तरी असावी अशी सामान्य जनांची अपेक्षा असते असे-लोक वरच्याप्रमाणें प्रतिपादन करणाऱ्याच्या अंगावर उसळून येतात व आपल्यावरून जग ओळखण्याच्या तत्त्वाचा अंगिकार करून दुसऱ्यालाच, आकुंचित रसिकतेचा किंबहुना खऱ्या काव्याची त्याला कल्पनाहि नाहीं असा दुराग्रही परमताऽसहिष्णु वगैरे ठरविण्याचा प्रयत्न करितात. अशा प्रयत्नांतील विसंगतता आणखी दुसऱ्या एका रीतीनें दाखवितां येईल. मनुष्याला आपल्या सांसारिक स्थितीची जबाबदारी कळूं लागेपर्यंत त्यानें लग्न करूं नये, आपल्या-पुढें उदात्त ध्येय ठेवून त्याच्या सिद्ध्यर्थ पूर्वतयारी व साधनसामग्री यांची जुळवाजुळव करण्यासाठीं योग्य कालपर्यंत ब्रम्हचर्य पाळावें ऊर्फ अध्ययन आणि शारीरिक शक्ति यांचा भरपूर संचय करावा; बालविवाहानें मुलाच्या मनांत अकालीं शृंगारविषयक कल्पना जागृत होऊन त्यांचा त्याच्या शारीरिक वाढीवर आणि व्यावहारिक प्रगतीवर फार अनिष्ट परिणाम होतो—त्या दोन्ही खुंटतात; आपण संसारांत पडलों, कृतकृत्य झालों, आतां आपण 'मोठे'च झालों, आपल्याला सर्व कांहीं कळून चुकलें—किंबहुना कळावयाचें कांहीं उरलेंच नाहीं-असें वाटावयास लागून त्याच्या हातून कांहीं उदात्त कृत्य होऊं शकत नाहीं; त्याच्या शक्तीचा ऱ्हास होऊं लागतो आणि त्याची प्रजाहि खुरटलेली, सुंदर अवयव असूनहि पुष्टीचे अभावीं कृश व निस्तेज दिसणारी आणि अल्पा-युषी होते वगैरे वगैरे अनेक रीतीनें बालविवाहाच्या दुष्परिणामाचीं भेसुर चित्रें जे कित्येक मराठा भाषाभिमानी व महाराष्ट्र वाङ्मयोपासक समाजहितेच्छु मोठ्या आस्थापूर्वक आवडीनें रेखाटतात त्यांनाच, अलीकडील मराठी वाङ्मयरूपी समाजांत कविता वधूसंबंधीं पुष्कळशा कवींची स्थिति बालविवाहाच्या दुष्परि-णामाइतकीच, किती शोचनीय, अनुकंपनीय झाली आहे ही गोष्ट दिसूं नये आणि वाङ्मयाच्या सुदृढ वाढीसाठीं, या **बालविवाही कवींच्या** स्वैर व बालिश प्रवृत्तीस आळा घालण्याचें तितक्याच नेटानें प्रयत्न करण्याची त्यांस आवश्यकता भासूं नये याचें खरोखर फार सखेदाश्चर्य वाटतें! या

आमच्या आक्षेपाच्या खंडनार्थ, कदाचित् 'कवित्व वयावर नसतें,' 'खऱ्या कवित्वास बाह्य-उपांगांची किंवा पूर्व तयारीची अपेक्षा नसते' व एखाद दुसऱ्या त्रोटक किंवा त्रुटित काव्यानें—काव्याच्या 'चुटक्यानें' हि कवि अमर होऊं शकतो, वगैरे फक्त उदात्त कवित्वासच लागू पडणाऱ्या मूलतत्त्वरूपी विधानांचा भडिमार आमच्यावर करण्यांत येईल ! जणूं काय, काव्यमीमांसेचीं हीं प्राथमिक तत्त्वें सुद्धां आम्हांस माहीत नाहींत किंवा त्यांचा कोणत्या रीतीनें अर्थ व्यःवयाचा त्या संबंधाच्या विवेकासहि आम्ही जसे कांहीं पारखे आहोंत असेंच आणखी एक मौजेच्या विसंगतीचें उदाहरण आधुनिक काव्यांतील काव्यचर्चेंत दिसून येतें तें असें कीं, जे लोक एका क्षणीं, खरें काव्य हें असुक एका विशिष्ट कालांतच होतें असा निर्बंध करितां येत नाहीं किंवा खऱ्या काव्याच्या दृष्टीने, प्राचीन अर्वाचीन, अलीकडील पलीकडील अशी भेददर्शक व जखडून टाकणारी कालमर्यादासूचक भाषा योजणें इष्ट, युक्त व शक्य नाहीं असें उदात्त तत्त्व प्रतिपादितात, तेच दुसऱ्या क्षणीं असें आग्रहपूर्वक प्रतिपादितांना दृष्टीस पडतात कीं, मध्ययुगांतील महाराष्ट्रवाङ्मयांत खरा कवि असा कोणी झालाच नाहीं; विशेषतः वामन पंडित, मोरोपंत हे तर कवीच नव्हत; पंडितांना तर त्यांच्याच कालीं 'यमक्या वामन' अशी संज्ञा मिळून चुकली होती; आर्यापति मोरोपंतांनीं तर काव्य देवीला लांब लांब संस्कृत सामासिक शब्दांनीं कसरतवजा क्लिष्ट व आयासकारक शब्दरचना इत्यादिकांनीं आणि यमकप्रासादि अलंकारांच्या जड भारानें अगदीं गुदमरून, दडपून, घाबरवून मारून टाकलें ! * यांच्या दृष्टीनें, आर्यापति पंत म्हणजे काव्यसुंदरीच्या गळ्याभोंवती बाहुपाश घालून तिचा जीव घेणारे दुष्ट व केवळ बाह्य सौंदर्यलोलुप असे हास्यास्पद आणि तिरस्करणीय शकारच होत ! ! आधुनिक काव्यचर्चेसंबंधीं उभय पक्षांच्या विवेचनांतील व युक्तिवादांतील विसंगततेचे आणखी कांहीं मासले दाखवितां येतील; परंतु तसें करणें अनवश्यक आहे. आतांपर्यंत जें विवेचन केलें

---

* वरील शब्द अतिशयोक्तीचे व काल्पनिक नसून, ते प्रस्तुत लेखकाजवळ एका प्रमुख मानलेल्या दिवंगत आधुनिक कवीनें एका स्मरणीय सहलप्रसंगीं प्रत्यक्ष बोलून दाखविले होते हें येथें नमूद करून ठेवणें अवश्य आहे.

त्याचा मुख्य उद्देश हें दर्शविण्याचा आहे कीं, व्यापक रसिकतेच्या दृष्टीनें पाहिलें असतां आणि शास्त्रशुद्ध विचारसरणीनें विचार केला असतां, कोणत्याहि कवीच्या कृतीची खरी योग्यता ठरविण्यासंबंधीं मतभेद होणें वस्तुतः संभवनीय नाहीं; किंवा तसा निर्णय करण्यास फारसे आयासहि पडण्यासारखे नाहींत. जे काय मतभेद व गैरसमज झालेले दिसतात त्या सर्वांच्या बुडाशीं एकच मूळ कारण आहे तें हें कीं, काव्याचीं जीं निरनिराळीं लक्षणें आहेत तीं सर्व सापेक्ष आहेत म्हणजे त्यांपैकीं कांहीं व्यापक व तात्त्विक स्वरूपाचीं आहेत तर दुसरीं कित्येक काव्याची व्यावहारिक बाजू दर्शविणारीं आहेत. तेव्हां तुलनात्मक दृष्टीनेंच त्या लक्षणांचा उच्चनीचपणा अथवा प्रधानगौणपणा मानिला पाहिजे, या महत्त्वाच्या गोष्टीकडे वादाच्या भरांत उभय पक्षांचेंहि रहावें तितकें लक्ष रहात नाहीं; म्हणून दोघेहि आपआपल्या परीनें खरे असून, त्यांच्यांत ‘ कानडीनें केला मराठा भ्रतार ’ असा शोचनीय प्रकार झालेला दृष्टीस पडतो. याचीं दोन व्यावहारिक उदाहरणें घेऊं. साखर ही गुळापासून होते. या दृष्टीनें पाहिलें तर गूळ म्हणजेच साखर ही गोष्ट खरी; परंतु गुळावर कांहीं विशिष्टप्रकारचे संस्कार केल्यावर त्यास जी निराळी अधिक विशुद्ध व आल्हादकारक रुचि ‘ अवस्था ’ प्राप्त होते तिलाच ‘ साखर ’ असें नांव आहे. अर्थात् साखरेचें गुळाहून पृथक् असें विशिष्ट रूपांतर झाल्यामुळें, ज्यांत फक्त साखरेचाच उपयोग करणें इष्ट व अवश्य आहे अशा एक निराळाच पदार्थांचा वर्ग साहजिकच अस्तित्वांत आला. अशा पदार्थांत जर कोणी एखादा विद्वान् पंडित, गूळ म्हणजे तत्त्वतः साखरेचा जनक—बापच !—आहे, असा कोटिक्रम लढवून साखरेऐवजीं गूळ घालील तर तो जगांत अप्रयोजक व हास्यास्पद ठरल्यावांचून कसा राहील ? आमच्या समाजाच्या दुर्दैवानें म्हणा किंवा अपरिहार्य कालप्रभावानें म्हणा—या विधानाचें, हल्लींच्या काळांतील अगदीं सर्वांच्या परिचयांतलें प्रत्यक्ष प्रमाण म्हटलें म्हणजे गूळ घालून केलेला चहा व साखर घालून केलेला चहा या दोहोंच्या लज्जतींतील फरकाचें होय. निर्भेळ उत्तम दुधांत साखरेचा अंश असतो असें पदार्थ गुणधर्मशास्त्र सांगतें; व शास्त्रीय तत्त्व या दृष्टीनें तें कोणालाहि मान्य झालेंच पाहिजे; आणि कोणीहि तें मान्य करील याविषयीं तिळमात्र शंका नको. पण, असें आहे म्हणून, जर

कोणी भोजनव्यवहारांतहि दुधापासून बनणाऱ्या एखाद्या पदार्थांत साखरेची स्वतंत्रपणें आवश्यकता असतां, या शास्त्रीय तत्त्वाचा हवाला देऊन साखर न घालण्याचा अप्रयोजक हलगर्जीपणा किंवा तिमाजी नाईकी कंजुषपणा दाखवील तर त्याची पढतमूर्खांतच गणना करावयास नको काय ?

काव्याच्या वास्तविक स्वरूपासंबंधीं हल्लीं जो पुष्कळांशीं भ्रामक व दुराग्रह-मूलक वाद माजलेला दिसतो, त्याचें यथार्थ आविष्करण करण्याच्या कामीं वरील दोन्ही दृष्टांत फार समर्पक व पुरेसे आहेत असें आम्हांस वाटतें. गूळ व साखर यांच्या मधाल संबंधाप्रमाणेंच, तत्त्वतः गद्यापासूनच पद्याची–काव्याची निष्पत्ति होते; म्हणून केवळ कांहीं अंशापर्यंत गद्य हेंहि काव्य होऊं शकतें, या विधानास कोणीहि रसिक मनुष्य हरकत घेणार नाहीं. परंतु ज्याप्रमाणें ' साखर ' म्हटली म्हणजे विशिष्ट संस्कारानंतर झालेली गुळाची अधिक शुद्ध व रुचिकर भिन्नावस्थाच होय–खुद्द ' गूळ ' म्हणजे ' साखर ' नव्हे; त्याचप्रमाणें, सुश्लिष्ट शब्दरचना आणि गायनानुकूल वृत्त, पद्य किंवा चाल वगैरे संस्कारांनीं बनलेलें गद्याचें रम्यतर व श्रुतिमनोहर रूप म्हणजेच काव्य होय. तसेंच, दुधाच्या दृष्टांता-प्रमाणें विचार केला तर वर्णमालेंतील प्रत्येक अक्षरांत किंवा भाषेंतील प्रत्येक शब्दांत कांहीं ना कांहीं तरी स्वभावसिद्ध सौंदर्य असतें असा शब्दशास्त्राचा सिद्धांतच आहे. त्यास अनुसरून प्रसंगविशेषीं साध्या गद्यरचनेंतहि सूक्ष्म काव्यांश असूं शकेल ही गोष्ट अगदींच अकल्पनीय आहे असें नाहीं. परंतु एकाच दुधाचे निरनिराळे पदार्थ बनविण्याची कल्पकता लढवून आणि त्यास शर्करा, केशर, वेलदोडे, चारोळ्या वगैरे मालमसाल्याची जोड देऊन भोजन-व्यवहार जसा अधिक विविध–मनोहर, कौतुकास्पद व सद्रसाभिरुचिपोषक करण्यांत आला आहे, त्याचप्रमाणें सुश्लिष्ट गद्यरचनेचें प्रसंग विशेषीं सूक्ष्म सत्कल्पनांशरूपी माधुर्य स्वभावसिद्ध असलें तरी, जेथें त्याला वृत्त, छंद, राग, चाल वगैरेंनीं गायनानुकूल मनोहर भूषणसामग्रीची जोड देण्यांत येते, तेथें तें माधुर्य अधिकच हृदयंगम व आस्वादपर होते यांत शंका नाहीं. म्हणूनच गद्याहून काव्याचें भिन्न व रम्यतर स्वरूप अगदीं पृथक्पणें दाखविण्यासाठीं पद यमकप्रासादि यथोचित सौभाग्यालंकारांनीं भूषविलेलीं व शब्दार्थश्लेष,

उदात्त कल्पना आणि हृदयमानहारक ध्वनि इत्यादि खऱ्या काव्यकांतीच्या मधुरमिश्रित प्रभाकिरणांनीं तळपणारी अशी पद्यात्मक रचना–हाच मराठी वाङ्मयांत गद्याहून काव्याचें भिन्न व रम्यतर स्वरूप पृथक्पणें दाखविणारा विशेष मानण्याची परंपरा चालत आली आहे.

आतांपर्यंत केलेलें हें विवेचन कित्येकांस काव्यशास्त्रांतील अगदीं सर्व परिचित व प्राथमिक सिद्धांताच्या पाल्हाळिक चर्वितचर्वणासारखें वाटण्याचा संभव आहे. परंतु अशा आक्षेपाची जाणीव मनांत वागत असूनहि इतका विस्तार करण्यांत आला, त्यास एक सबळ कारण आहे तें असें कीं, मराठी वाङ्मयाच्या सद्यःस्थितींत, अगोदर नुसत्या, मासिक पुस्तकें वगैरे मधून होणाऱ्या कवितासुद्धां वाचून पहाण्याची आवड साधारण मराठी वाचकवर्गांत–किंबहुना पदवीधर व सुशिक्षित म्हणून मिरविणाऱ्या लोकांत सुद्धां फारशी दिसून येत नाहीं; मग काव्यविषयक चर्चेंत मन घालण्याची गोष्ट तर बालावयासच नको!

पावसाळ्याच्या दिवसांत रस्त्यांतून चालतांना, जसा कोणीहि मनुष्य आपला पाय बेसावधपणानें पडूं नये म्हणून एकसारखी नजर खालीं लावून जपून चालत असतो व खाच खळगा दिसतांच, चपापून अलगद त्याच्यावरून उडी मारून पलीकडे जातो किंवा वळसा घेण्यासाठीं झटकन् एका बाजूला झुकतो, त्याचप्रमाणें मासिक पुस्तकें वगैरे वाचतांना पुष्कळ वाचकांना अशी संवय असते कीं, कवितेचें पान दिसलें रे दिसलें कीं, डोळ्यांत भरेल एवढ्या मोठ्या अक्षरांचा जरी तिचा मथळा असला तरी त्याच्यावर नुसती ओझरती देखील नजर न टाकतां तें पान झपकन् उलटावयाचें व दुसऱ्या पानावरील साधा मजकूर वाचावयास सुरवात करितांना, जणूं काय आपण एका मोठ्या संकटांतून मोठ्या शिताफीनें किंवा शर्तीनें बचावून पार पडलों असें दर्शविणारा एक दीर्घ श्वास सोडावयाचा! कविता म्हणजे कांहीं तरी खूळ आहे – वेडेचार व वेळेचा दुरुपयोग आहे – तिच्यासीं आपल्यास कांहीं कर्तव्य नाहीं व तिच्या वाचनानें आपल्यास व्यवहारदृष्ट्या कांहीं लाभ किंवा खरी करमणूक होण्याचा संभव नाहीं–उलट, अन्वयार्थाची जुळवाजुळव करितांना डोळ्यांस त्रास मात्र

व्हावयाचा ! इत्यादि कल्पनांनीं त्यांच्या मनांत कायमचें ठाणें दिलेलें असतें ! कोणतीहि कविता समोर आली कीं तिच्या बऱ्यावाईटपणाविषयीं कांहीं स्थूल निदान ठरविणें आणि त्या कवितेंतील जो काय थोडा बहुत ग्राह्यांश असेल त्याचा आस्वाद घेऊन सुख पावणें ही जी रसोपभोगाची वृत्ति ती त्यांच्या ठिकाणीं जागृत नसते किंवा ती जागृत करण्याचेहि फारसे प्रयत्न करण्यांत आलेले दिसत नाहींत, उलट, साधारण माणसासच काय पण ज्ञात्या म्हणविणाऱ्या लोकांसाहि आमच्या काव्याचें मर्म समजणें दुर्घट आहे अशा आशयाच्या दर्पोक्ति 'गूढ गुंजना' चा ( Mysticism ) आविर्भाव कित्येक कवींच्या कवितांतून वारंवार केलेला आढळतो ! या सर्वांचा संकलित परिणाम असा झाला आहे कीं, काव्यविषयक चर्चा किंवा वादविवाद मुख्यत्वेंकरून फक्त कवि किंवा त्यांचे टीकाकार यांच्यामध्येंच घुमत रहातात! परंतु ज्यांच्या हितार्थ म्हणून ही चर्चा अथवा वादविवाद करण्यांत येतो आणि त्रयस्थ या नात्यानें ज्यांच्या-कडून हा वादविवादाचा खरा निर्णय होणें इष्ट आहे, त्या लोकांना तर या बाबतींत फारसी - किंबहुना मुळींच नाहीं असें म्हटलें तरी चालेल - आस्था वाटत नाहीं; व मग काव्याविषयीं मत बनविण्याची किंवा व्यक्त करून दाखविण्याची गोष्टच कशाला? कोणत्याहि भाषेतील काव्यवाङ्मयाची योग्य दिशेनें प्रगति व्हावयास त्या भाषेंतील कवि आणि काव्यभोक्ता जनसमाज या उभातांमध्यें काव्यादिकांच्या वाचनद्वारां प्रत्यक्ष परिचयाचें आणि विचार-विनिमयाचें जें परस्परपोषकत्वाचें नातें असणें अवश्य असतें तशा तऱ्हेचें नातें सद्यःकालीं तरी आपल्या वाङ्मयांत असलेलें दिसत नाहीं ही गोष्ट कोणाहि मनुष्यास खेदानें कबूल करावी लागेल! ही शोचनीय स्थिति नाहींशी होण्याचा एकच उत्तम मार्ग म्हटला म्हणजे, आतांपर्यंत काव्यविषयक चर्चा जशी प्रायः एकांगी व मर्यादित स्वरूपाची होत आली आहे तशी न रहातां तिला जास्त व्यापक व सुबोध रूप प्राप्त झालें पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे १९ व्या शतकाचे प्रारंभाचे सुमारास सुप्रसिद्ध इंग्रज ग्रंथकार जॉनसन यानें एकंदर वाङ्मयाविषयक टीकेसंबंधीं जसें व्यावहारिक तारतम्याची–Common Sense criticism चें युग प्रचलित केलें तशा तऱ्हेचें धोरण गद्य व

२

काव्यवाङ्मयाच्या टीकेसंबंधीं आमच्यांतहि रूढ होणें फार अवश्य व इष्ट आहे. हें व्यावहारिक तारतम्याचें धोरण मनांत वागवून कवि व कविता या विषयाचा विचार केला तर असें दिसून येईल कीं, कवींचे **अलौकिक** कवि व **लौकिक** कवि असे दोन स्वाभाविक विभाग पडतात. **अलौकिक** कवि हे फार विरळाच ! एकंदर जगाच्या आजपर्यंतच्या इतिहासांत हाताच्या बोटावर मोजण्याइतके झाले असतील नसतील ! अशा **अलौकिक** कवींचें लक्षण श्रीभवभूतीनें म्हटल्याप्रमाणें 'वाचमर्थोऽनु धावति' असें असतें. त्यांच्या नुसत्या स्वतःस्फूर्त वाक्प्रवाहाच्या मागोमाग अर्थ-उदात्त व रम्य अर्थ--धांवत जातो; नव्हे, त्याला जावें लागतें. श्रीव्यासवाल्मीकि, श्रीज्ञानेश्वर तुकाराम अशाच विभूति अलौकिक कवींपैकीं होत. अशांच्या ठिकाणीं केवळ काव्यगुणापुरतेंच उत्कृष्टत्व वसत नसून एकंदरींचेंच सर्वज्ञत्व सर्वद्रष्टेपणा-थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे परमेश्वराच्या अंशस्वरूपाचेंच-आविष्करण कमी अधिक उत्कर्षानें झालेलें प्रत्ययास येतें; किंबहुना. त्यांच्या देदीप्यमान ईश्वरांश कलेचा एक-स्फुलिंग-नुसती ठिणगी-म्हणजेच त्यांचें काव्य होय. असे अतुल अपवाद ईश्वरांश कवि वजा करितां, बाकी जे कोणी श्रेष्ठ कवि होऊन गेले ते सर्व **लौकिक** कवि या सदरांत समाविष्ट होतात. कवि व कविता या विषयाचा वाङ्मयदृष्ट्या जो विचार होत असतो तो मुख्यत्वेंकरून लौकिक कवींच्याच भूमिकेवरून होत असतो. म्हणजे लौकिक कवींच्या काव्यांत जे मूलभूत उदात्त गुण दिसून येतात त्यांची मीमांसा करून त्यावरून जे सर्वमान्य नियम सिद्ध होतात, त्या नियमांच्या कसोटीला ज्या मानानें एखाद्या कवीची कृति कमी अधिक उतरेल त्या मानानें तो कवि एक तर लौकिक कविवर्गांत समाविष्टच होण्याच्या योग्यतेचा आहे कीं नाहीं, व असल्यास, तो कोणत्या पंक्तींत बसण्यासारखा आहे हें ठरवावयाचें असतें. हा सिद्धांत कित्येकांस शुष्क पिष्टपेषणासारखा किंवा सर्वपरिचित गोष्टीची विनाकारण पुनरुक्ति केल्यासारखा वाटण्याचा संभव आहे. परंतु माझ्यामतें, सांप्रत चालू असलेल्या काव्यचर्चेंत पुष्कळदां, या सर्वपरिचित वाटणाऱ्या गोष्टीकडे दुर्लक्ष होत असल्यामुळें सदरहू चर्चेचें तारूं भलतीकडेच झुकत जाऊन, तीव्र विरोधाच्या

व गैरसमजाच्या वावटळींच्या तडाक्यांत सांपडतें! म्हणून वरील सर्वसामान्य वाटणाऱ्या तत्त्वाचा येथें विशेष निर्देश करावा लागत आहे. अलीकडच्या काळांतील कवींच्या कमी अधिक श्रेष्ठतेबद्दल वाद उपस्थित झाला असतां, त्या कवींचा कोणताहि समंजस तरफदार त्यांचा वर सांगितलेल्या प्रकारच्या अलौकिक कोटींत समावेश करण्याचा आग्रह धरीत नाहीं.–निदान धरणार तरी नाहीं–इतकी गोष्ट खरी आहे. मग लौकिक श्रेष्ठ कवींविषयीं पाहूं गेलें तर असें दिसून येतें कीं, उत्तम काव्याचा आत्मा, त्याचें जीवनसर्वस्व, किंवा चित्कला जी स्फूर्ति किंवा प्रतिभा ही जरी केवळ ईश्वरदत्त व पूर्वकर्मार्जित आहे तरी त्या चित्कलेचा लौकिकदृष्ट्या विकास व उपयोग होण्यास, तिला योग्य पुरुषप्रयत्नाची जोड मिळविली पाहिजे; एरव्हीं, व्यवहारदृष्ट्या कोण्याहि कवीची तादृश मातब्बरी मानली जात नाहीं व जाणारहि नाहीं; इतकेंच नव्हे तर, उलट, मनाच्या प्रतिनिविष्ट वृत्तीच्या भरीं पडून आपल्या अंगच्या प्रतिभेचें खरें ध्येय व तिचा योग्य विनियोग यांच्याकडे मनुष्यानें दुर्लक्ष करून 'अपूर्व कवित्वा'च्या नांवाखालीं मनुष्य भलत्याच कल्पनांना बळी पडून आपली प्रगति खुंटवून घेत असेल, तर तो ईश्वरानें दिलेल्या देणगीचा दुरुपयोग केल्याचें पाप मात्र जोडीत आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. खरा कवि हा कोणाचा बांधलेला नाहीं. हें एका दृष्टीनें यथार्थ असेल, तथापि त्याचा तो ज्या विशिष्ट देशांत किंवा समाजांत उत्पन्न झाला असेल त्या देशाशीं व समाजाशींहि त्याचा व्यावहारिकदृष्ट्या अत्यंत निकट व अनुल्लंघ्य असा एकंदर जगाशीं संबंध असतो ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे ज्याच्या कवित्वाचा जगावर कांहीं तरी ठसा उमटेल आणि ज्याच्या कवितेचें पर्यवसान जगाच्या किंवा आपल्या विशिष्ट देशाच्या व समाजाच्या सुस्थितींत, नीतिमत्तेंत, शहाणपणांत व वाङ्मयात्मक सदभिरुचींत अंशतः तरी भर घालण्यांत होत असेल तोच खरा कवि असें कवीचें व्यावहारिक लक्षण व कसोटी आपोआप निष्पन्न होते. श्रीभवभूतीच्या 'उत्तररामचरित्रां'तील एका प्रवेशांत आत्रेयीच्या तोंडून श्रीरामायणाच्या आकस्मिक व सहजस्फूर्त उत्पत्तीचा वृत्तांत ऐकल्यावर, वासंतिकेच्या तोंडून, 'हन्त! पण्डितस्तर्हि संसारः' [ अहाहा! तर मग जग अधिक शहाणें

होईल म्हणावयाचें!] असे जे उद्गार निघाले त्यांमध्यें, खऱ्या कवींच्या योग्यतेचें व त्यांच्या काव्याच्या पर्यवसानाचें उदात्त ध्येय सूत्ररूपानें पण सहज रम्य मार्मिकतेनें ग्रथित झालें आहे. शेक्सपीयरनेंहि एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, मनुष्याच्या अंगच्या सद्गुणांचा विनियोग इतरांच्या उपयोगार्थ कोणत्या तरी उदात्त कार्याच्या द्वारें होईल तरच त्या सद्गुणांची खरी सार्थकता झाली असें म्हणतां येईल. या लेखाच्या आरंभीं श्रीसमर्थ आणि टेनिसन् यांच्या ग्रंथांतील अवतरणें दिलीं आहेत. त्यांत कवींच्या योग्यतेसंबंधीं हीच गोष्ट प्रतिपादिली आहे. तेव्हां या सर्व विवेचनावरून मुख्य सिद्धांत ध्यानांत घ्यावयाचा तो हा कीं, कोणाची कशीहि प्रतिभा असो व कोणी स्वतःच्या कल्पनाशक्तीसंबंधानें किंवा तिच्या विशिष्ट विनियोगासंबंधानें स्वतःला किती स्वतंत्र समजो; तथापि जर त्याची काव्यरचना व्यावहारिकदृष्ट्या लोकांस–सर्वसाधारण जनतेस–चित्ताकर्षक व बोधप्रद होईल तरच त्याच्या प्रतिभेची खरी सार्थकता झाली असें मानितां येईल. म्हणूनच खऱ्या काव्याचे बाबतींत प्रतिभारूपी ईश्वरदत्त अंशाइतकेंच योग्य पुरुषप्रयत्नरूपी अंशाचें–परिश्रमाचें–महत्त्व आहे हें तत्त्व केव्हांहि विसरतां कामा नये. यासाठींच जगांतील प्रत्येक वाङ्मयांत 'काव्यशास्त्र' म्हणून काव्यरचनेसंबंधीं कांहीं विशिष्ट तत्त्वें सिद्धांत व नियम यांचें संग्रहात्मक विवेचन व प्रतिपादन करणारें 'शास्त्र' असलेलें दिसून येतें. हातीं उत्तम आंब्याची कोय असली तर कोयीच्या स्वरूपांत तिला 'आंबा' म्हणतां येणार नाहीं; ती भूमींत पेरणें, तिला पाणी खत वगैरे घालून तिची योग्य जोपासना व मशागत करणें वगैरे संस्कार जर तिच्यावर करण्यांत येतील आणि तेहि बागवानांच्या ठरीव व अनुभवसिद्ध नियमांप्रमाणें– म्हणजेच वृक्षसंवर्धनाच्या शास्त्रानुसार–करण्यांत येतील तरच त्या कोयीचा आम्रवृक्ष होऊन त्याचीं फळें चाखावयास मिळतील. अर्थात् कोयीची जोपासना व मशागत बागाइतीच्या नियमाबरहुकूम व बिनचूक केली तरी अखेर त्या फळांची प्रत जी ठरेल ती कोयीच्या अंगीं असलेल्या बीजशक्तीच्या लायकीच्या मानानें ठरेल हें उघड आहे. तथापि मूळ कोय अथवा आंब्याचें झाड हलक्या दर्जाचें असलें तरी त्याच्यावर कलम वगैरे बांधल्यानें त्यास जास्त वरचढ प्रतीचें बनवितां

येतें ही नेहमींच्या पाहण्यांतली गोष्ट आहे. त्याचप्रमाणें कित्येकदां काव्यशक्ति मूळ बेताबाताची असली तरी तिला योग्य वळण दिल्यानें आणि रचनेच्या ठाकठिकीसंबंधीं विशेष परिश्रम घेतल्यानें, साधारण दर्जाच्या कवीच्या काव्यासहि एक प्रकारचें श्रवणानुकूल सौष्टव आणि आनंददायक मोहकता प्राप्त होते हीहि गोष्ट पुष्कळांच्या निरीक्षणांत आली असेल. काव्यशास्त्राचे नियम देखील अशाच सदभिरुचीच्या पायावर रचलेले असतात व म्हणून काव्यरचनेचें 'शास्त्र' निर्माण केलें त्यांना अथवा जे काव्यशास्त्राच्या सर्वसंमत सदभिरुचिपोषक आणि सद्रसिकाल्हादजनक नियमांच्या अनुसरणाकडे स्वभावसिद्ध कवीनें देखील लक्ष पुरविणें अवश्य व श्रेयस्कर आहे असें प्रतिपादितात त्यांना सत्काव्यांत ईश्वरदत्त प्रतिभा हा एक मुख्य घटक असतो या गोष्टीची मुळापासून कल्पनाच नाहीं असें कधीं तरी म्हणतां येईल काय? अर्थात् नाहीं. कारण कोणत्याहि शास्त्राच्या उभारणीनें किंवा मानवी बुद्धीच्या प्रभावाची ज्यांत विशेष अपेक्षा आहे अशा कोणत्याहि गोष्टींमधील प्राविण्यासंबंधीं विचार करितांना त्या त्या गोष्टींविषयीं मनुष्याच्या ठिकाणीं प्रतिभादि ईश्वरदत्त गुण किंवा स्वाभाविक पात्रता असेल तोच त्या शास्त्रांत खरी पारंगतता मिळवील व नांव काढील ही गोष्ट 'गृहीत कृत्वा' प्रमाणें प्रथमच गर्भित स्वीकारलेली असते. तेव्हां त्याचा मुद्दाम निर्देश करण्याची आवश्यकता नसते; व तेवढ्यावरून कोणतेंहि 'शास्त्र' केवळ कृत्रिम नियमाविषयीं आभिनिवेश धरूनच बनविण्यांत येतें असेंहि अनुमान काढणें अप्रयोजकपणाचें होईल. गणितशास्त्राचे नियम जरी सुलभ व उघड रीतीनें विशद केले असले तरी ज्यांना त्या विषयाची उपजत गोडी आहे किंवा तीव्र बुद्धि वगैरेंच्या रूपानें ज्यांचे अंगीं, त्या शास्त्राचें आकलन करण्याची ईश्वरदत्त देणगी आहे तेच काय ते त्या विषयाकडे वळतील व त्यांच्यांतील शेंकडा किंवा हजारांतील एखादाच 'गणिती' या नांवास खरा पात्र असूं शकेल, ही गोष्ट कोणासहि सहज कळण्यासारखी आहे. या सर्व विवेचनाचा मथितार्थ इतकाच कीं, सत्कवीच्या ठिकाणीं प्रतिभा हा ईश्वरदत्त गुण जरी कमी अधिक अंशानें वसत असला तरी त्याचा योग्य विकास व खरी सार्थकता होण्यास, काव्यशास्त्राचे एक दोन मूलभूत सिद्धांत तरी प्रत्येक कवीनें

आपल्या मनांत नेहमीं वागवून तदनुसार रचनेचें धोरण ठेवण्याचा त्यानें नेहमीं आस्थेनें व दक्षतेनें प्रयत्न केला पाहिजे. ते मूलभूत सिद्धांत थोडक्यांत असे सांगतां येतील:—

कोणताहि बाह्य पदार्थ पाहण्याची शक्ति या नात्यानें आपली 'दृष्टि' जरी एकरूप व एकवचनी प्रयोगाची असली तरी तिचें जें कार्य घडतें तें आपल्या दोन डोळ्यांच्या संयुक्त व्यापारामुळेंच घडत असतें; किंबहुना, एखादा पदार्थ पहाण्याच्या कामीं दोन्ही डोळ्यांचा योग्यप्रकारें संयुक्त व्यापार घडला तरच त्या पदार्थाचें आपल्यास यथार्थ ज्ञान घडतें. हीच गोष्ट कवि व कविता यांस लागू आहे. कवीनें आपल्या एकंदर कलेचा किंवा वेळोवेळीं आपल्या हातून निर्माण होणाऱ्या कवितेचा जो विचार करावयाचा तो त्याच्या 'मनोदृष्टी' चे जे दोन डोळे आहेत त्यांचा एकसमयावच्छेदेंकरून योग्य व संयुक्त उपयोग करूनच केला पाहिजे. किंवा असें न म्हणतां, वेदांताच्या परिभाषेंत ज्याप्रमाणें 'अंतर्मुखदृष्टि' व 'बहिर्मुखदृष्टि' असे जे दृष्टीचे दोन प्रकार वर्णिलेले असतात; त्याप्रमाणें कवीनेंहि आपल्या कलेकडे व कवितेकडे दोन दृष्टींनीं पाहण्याचा नियम केला पाहिजे. एक अंतर्मुखदृष्टि म्हणजे खुद्द कवीपुरती व दुसरी 'बहिर्मुखदृष्टि' म्हणजे ज्या विशिष्ट देशांत, परिस्थितींत व समाजांत तो उत्पन्न झाला असेल त्या संबंधाची परंपरा व उदात्त ध्येय या संबंधाची दृष्टि. अर्थात् थोडा सूक्ष्म विचार केला तर या दोन्ही दृष्टि वस्तुतः भिन्न नसून अन्योन्य-स्वरूपव्यापीच आहेत असें दिसून येईल. खुद्द कवीपुरता विचार केला तर आपली ज्या विषयाकडे अथवा मनोवृत्तीकडे स्वाभाविक प्रवृत्ति होईल किंवा कविता करण्याची स्फूर्ति होईल त्याप्रमाणें आपल्यास जें कांहीं व जसें कांहीं लिहिणें बरें वाटेल, तसें लिहिणें हेंच आपलें वर्तनब्रीद, त्यांत लोकांच्या आवडी-निवडीचा किंवा बाह्यपरिस्थितीवरील परिणामावगैरेंचा विचार करण्याचें कारण नाहीं ही एकदृष्टि; यांच्याखेरीज दुसरी व विशेष श्रेष्ठ दृष्टि ही कीं, श्रीपर-मेश्वरकृपेनें आपल्याला जो कांहीं प्रतिभांश लाधला आहे त्याचा आपण सतत परिश्रमानें योग्य विकास करूं. यासंबंधीं सर्वमान्य परंपरा व अनुभवसिद्ध नियम यांचें अध्ययन व निरीक्षण करूं व कोणाहि सुसंस्कृत मनुष्याच्या ठिकाणीं

साहजिक उद्भवणाऱ्या व व्हास करणाऱ्या अशा एकंदर विश्वकल्याणाच्या सद्‌बुद्धीखेरीज विशेषेंकरून आपण आपल्याच समाजाचे व राष्ट्राचे—त्यांतील उन्नत व तेजस्वी विचारविकारांचे, त्यांतील ललितोदात्त व कोमल मनोवृत्तींचे अभिमानास्पद व स्फूर्तिसंचारक ऐतिहासिक परंपरेचे तादात्म्यरूपानें—आपण आदर्शभूत नव्यजीवनप्रेरक कवि होऊं किंवा तसें न होऊं शकलों तर,—कारण हें भाग्य फारच थोड्या कविहीरांना लाभतें!—निदान आपण आपल्या काव्यांच्या द्वारें आपल्या काव्यांतील आपल्या समाजाच्या व राष्ट्राच्या विचार आकांक्षांचा—त्याच्या उदात्त ध्येयाचा—उद्बोध—करणारा एक नम्र सैनिक—पाईक—व प्रतिनिधि या नात्यानें तरी, आपण आपल्या प्रिय मातृभाषेच्या वाङ्मये-तिहासांत—एखाददुसऱ्या ओळीइतकेंच का होईना!—अत्यंत स्पृहणीय असें स्थान पटकावूं! असें उदात्त ध्येय सतत डोळ्यांपुढें ठेवून तदनुसार आपल्या काव्यरचनेचें धोरण ठेवणें, वेदांताच्या परिभाषेनें बोलावयाचें म्हणजे, शुद्ध व निरुपाधिक ब्रह्म हें केव्हांहि श्रेष्ठ व वंद्यच होय, तथापि सगुण ब्रह्मच साक्षात्कार होण्यास सुलभ असतें व तद्‌द्वारांच, वेळोवेळीं जगांत अवतरणाऱ्या सगुणोपासक संतचरित्राच्या प्रत्यक्ष उदाहरणरूपानें साधारण संसारी जीवांमध्यें भक्तिमहात्म्य व भक्तगौरव यांचे ' वस्तुपाठ ' देऊन त्यास आध्यात्मिक उन्नतीचे मार्गास लावण्याचें कार्य विशेष शीघ्रतेनें होतें. त्याप्रमाणें रम्योदात्त कविप्रतिभांशाचा लहानसा कण कोठेंहि व कोणत्याहि स्वरूपांत निगडित झाला असला तरी तो खऱ्या रसिकाच्या लक्ष्यांत आल्यावांचून रहावयाचा नाहीं व अशा कवित्वा-विषयीं त्याच्या मनास जो निरपेक्ष व अकृत्रिम आदरभाव वाटावयाचा तो वाटल्याशिवाय रहावयाचा नाहीं हें खरें! परंतु म्हणून, आत्मैकलक्ष्यी ( Subjective ) व निरुपाधिक व निरंकुश कवित्वाच्या नांवासाठीं केवळ स्वतःच्याच उथळ व उच्छृंखल मनोवृत्ति, स्वतःच्याच प्रिय दयितादिकांचे विहारविलास व चेष्टाचाळे यांचें—कवित्वाच्या निरंकुश स्वातंत्र्याच्या नांवाखालीं—शुष्क व उत्तान शृंगारयुक्त वर्णन किंवा ' गूढ गुंजना ' च्या ( Mysticism ) नांवाखालीं, व विश्वैक्याच्या आविर्भावानें फारच असंदिग्ध, त्रुटित व केवळ सर्वसामान्य विधानरूप अर्थशून्य तुटपुंजी रचना—यांनाहि शाश्वत कवित्वाचा

मान केव्हांहि मिळणें शक्य नाहीं; किंवा खुद्द कवीच्या क्षुद्र समाधानाखेरीज दुसऱ्या कोणाचेंहि बरें अथवा वाईट होण्याचा संभव नाहीं! समाजाच्या सामुदायिक रसिकतेच्या धारवाडी काट्यांत आपल्या अल्पस्वल्प गुणांशास वाजवीपेक्षां फाजील वजन न मिळाल्यामुळें जे कवि अथवा त्यांचे प्रतिनिविष्ट पुरस्कर्ते खट्टु व रुष्ट होऊन बिचाऱ्या–इतर रीतींनीं उपहत असलेल्या–समाजाच्या रसिकतेवर वेळीं अवेळीं ताशेरा झाडीत असतात आणि समाजास मद्र बैलावगैरेसारख्या उपमा देत असतात, त्यांची अखेरस्थिति, इसापनीतींतील बैलांच्या शिंगावर इकडे तिकडे उड्या मारणाऱ्या व क्षणभर बसून अत्यंत क्षुद्र व क्षीणशक्तीचा गोंगाट करणाऱ्या प्राण्यांसारखी झाल्यास नवल नाहीं!! ही कांहीं अंशीं कटु वाटणारी गोष्ट इतक्या स्पष्टोक्तीनें लिहिण्याचें कारण कित्येक आधुनिक कवींच्या काव्यकृतींत व इतरत्र, स्वतःच्या ठिकाणीं असणाऱ्या गुणांशांपेक्षां फारच जास्त प्रमाणानें, दर्पयुक्त आत्मश्लाघेची व असहिष्णुतेची छटा दिसून येते, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे! भलत्याच प्रकारचा आत्मविश्वास म्हणजे शोचनीय आत्मवंचनाच होय; तशांत या आत्मवंचनेंत जर का 'ग' च्या गरळाची भर पडली तर, कवीनें 'चेष्टा वदूं मग किती'– असें ज्याच्या स्थितीविषयीं वर्णन केलें आहे त्या प्राण्यासारखीच स्थिति होते! केवळ 'आधुनिक' म्हणूनच आधुनिक कवींच्या काव्यांतील ग्राह्यांशाचाहि खऱ्या समंजस व सहृदय रसिक मनुष्याच्या हातून अनादर अथवा अव्हेर होणें केव्हांहि शक्य नाहीं! मग तो मनुष्य स्वतःस जुन्या कवींचा अभिमानी म्हणून घेवो कीं न घेवो! तसेंच अशा मधुर काव्याला कारणीभूत होणाऱ्या आधुनिक कविविषयींहि योग्य ती सकौतुक सद्बुद्धि मनांत वागवून प्रसंगविशेषीं ती उघडपणें व्यक्त करावयास खरा रसिक मनुष्य केव्हांहि अनमान करणार नाहीं! ही सर्वसाधारण लोकांसंबंधाची गोष्ट क्षणभर बाजूला ठेवूं. या बाबतींत खुद्द प्रस्तुत लेखकाचेंहि बरेच दिवसांपासून ठाम झालेलें असें स्पष्ट व प्रांजल मत आहे कीं, आधुनिक कवींपैकीं कांहीं कवींच्या काव्यांत पुष्कळदां उच्चप्रकारची खरी काव्यप्रतिभा उज्ज्वल रीतीनें दिसून येते, व ही प्रतिभा पुष्कळ कवींच्या ठिकाणीं आपापल्यापरी अपूर्व आल्हादकारक अशा प्रकारची

दिसून येते. इतकेंच नव्हे तर क्षणभर तुलनेसाठीं म्हणून मुद्दाम, आपल्या मानसिक रंगभूमीवर जुन्या नव्या—प्राचीन व अर्वाचीन, संस्कृत प्राकृत कवींचें जर संमेलन भरविण्याचें ठरविलें तर निस्सीम आधुनिक कवींपैकीं कांहीं कवींना तरी—फक्त ईश्वरदत्त, व उपाधिरहित काव्यप्रतिभेचें कमी अधिक प्रमाणाचें वास्तव्य अंगीं असणें या एकाच गुणाच्या दृष्टीनें—जन्मसिद्ध हक्क म्हणून पूर्वींच्या कित्येक चांगल्या चांगल्या कवींच्या शेजारींच गौरवानें स्थान द्यावें लागेल! असें म्हणण्यांत कोणत्याहि प्रकारें औपचारिक अतिशयोक्ति अथवा सहेतुक वस्तुस्थितिविपर्यास केल्याचा दोष येणें शक्य नाहीं! हें सर्व खरें! पण!—आणि येथेंच सर्व 'वादस्तंभ' आहे!—आधुनिक कवींपैकीं पुष्कळांच्या कवितेंत जें कलाविषयक अंग त्याची फारच उपेक्षा झालेली दिसून येते. इतकेंच नव्हे तर दुर्दैवाची गोष्ट ही कीं, भलत्याच भ्रामक समजुतीच्या भरीं भरून किंवा कांहीं तरी नवीन 'मनु' अथवा 'फॅशन' रूढ करण्याच्या, नवीन शककर्ते (Epochmakers) होण्याच्या मोहास बळी पडून, कलाविषयक अंगाची जाणून बुजून अवहेलना व उपेक्षा केलेली आपल्या काव्यांत ठळकपणें दृग्गोचर होणें हेंच आधुनिक काव्याच्या श्रेष्ठतेच्या लक्षणांपैकीं एक प्रमुख लक्षण आहे अशीच कांहीं तरुण कविमंडळाची घातुक व कींव येण्याजोगी दुष्कल्पना होऊन गेलेली दिसते.

या प्रवृत्तीचें ठळक द्योतक म्हटलें म्हणजे साधेपणा व जोरदारपणाच्या नांवाखालीं, कित्येकदां अत्यंत उच्च संस्कृत शब्दांच्या शेजारीं किंवा पाठोपाठ, अगदीं ग्राम्य मानलेले किंवा काव्यरसहानिकारक कटु उच्चाराचे अगदीं साधे प्राकृत किंवा फारशी, मुसलमानी वगैरे परभाषेचे शब्द जाणून बुजून योजण्याचा 'फॅशनेबल' म्हणून रूढ होऊं पहाणारा प्रघात हें होय. यावरून एखादा शब्द केवळ प्राकृत, अगदीं घरगुती किंवा परभाषेचा म्हणूनच त्याचा उपयोग काव्यांत वर्ज्य होय असें आमचें मत आहे, असा मात्र कोणी गैरसमज करून घेऊं नये. काव्याच्या ओघानुसार जो कोणताहि शब्द अर्थोद्दीपक वाटत असेल तो योजल्यास कोणाहि रसिक मनुष्यास त्याबद्दल विषाद वाटणार नाहीं. मात्र पुष्कळदां अशा तऱ्हेचे शब्द, काव्याच्या कलाविषयक अंगाची उपेक्षा

करून व काव्यस्वरूपाविषयीं कांहीं तरी विचित्र कल्पनेच्या भरीं भरूनच योजलें असल्याचें दिसून येतें आणि कित्येकदां उत्तम काव्यप्रतिभेची भरारी ऐन रंगांत आली असतां असाच एखादा शब्द कवीनें अप्रयोजकपणें विपर्यस्त व प्रतिनिविष्ट मनःप्रवृत्तीनें योजल्यामुळें खऱ्या सहृदय वाचकमनाची एकदम 'गौरवाचा रौरव' झाल्यासारखी ( इंग्रजींतील "From pathos to bathos" यासारखी ) विषादपूर्ण व रसभंगानें क्षुब्ध अशी स्थिति होते! इतकेंच सुचविण्याचा आमचा उद्देश आहे.

मनुष्याच्या शरीरावरील पोषाकांत काय किंवा काव्याच्या शब्दरचनारूपी पोषाकांत काय, अतिशय कृत्रिमपणा किंवा सहेतुक व सपरिश्रम नटवेपणा हा जसा शिष्टजनांच्या उपहासास पात्र व उद्वेगजनक होतो, त्याचप्रमाणें मनाची संस्कारी वृत्ति दर्शविणारा असा जो सद्गुण— म्हणजे पोषाकाचा नीटनेटकेपणा— त्याचीहि उपेक्षा केल्यानें मनुष्य शिष्टजनांच्या, अनादरास व अप्रीतीस कारणीभूत होतो ही व्यवहारांतील नित्य अनुभवाची गोष्ट काव्यासंबंधींहि खरी आहे. स्वाभाविक उच्च प्रकारच्या सौंदर्यास, भूषणादि बाह्यालंकारांची तादृश अपेक्षा नसली तरी सौभाग्याच्या— म्हणजेच औचित्याच्या—दृष्टीनें विचार केला तर, अशा अपूर्व सौंदर्यविभूषित स्त्रीपुरुषाच्या ठिकाणी— आपल्या स्थितीस अनुरूप अशी फाजील अलंकारविहीनता दिसून येईल, तर ती दोषार्हच समजली पाहिजे. तसेंच अलंकारादि बाह्य व कृत्रिम साधनांनीं खऱ्या सौंदर्याच्या स्वभाविक उज्ज्वलतेंत फारसी भर पडत नाहीं हें जसें खरें आहे त्याचप्रमाणें दुसरीहि एक गोष्ट तितकीच अनुभवसिद्ध खरी आहे; ती ही कीं, प्रसंगविशेषीं मूळचें सौंदर्य साधारणप्रतीचें जरी असलें तरी, पोषाखाच्या ठाकठीकपणामुळें आणि परिमित व सहजोचित अलंकारादि सामग्रीनें त्याच्या मूळच्या स्वरूपाला चांगलाच उठाव मिळतो. 'एक नूर अदमी और दस नूर कपडा' ही व्यावहारिक म्हण देखील, कांहीं अंशीं, याच तत्त्वाची द्योतक म्हणून रूढ झाली. आधुनिक कालांतील कपडे-शिलाईच्या कामांतील फार सुधारलेल्या कौशल्यामुळें, कित्येक वेळा क्षुद्र किमतीचें कापड देखील मनुष्याच्या अंगावर फारच मोहक व दावून दिसतें ही गोष्ट सर्वांच्या अनुभवांतलीच आहे. तसेंच अत्यंत मौल्यवान् व उंची कापड

अकुशल शिंप्याच्या कर्तरी प्रयोगाच्या तावडींत सांपल्यास त्याची कशी माती होउन जाते त्याची हे कांहींनाकांहीं उद्वेगजनक उदाहरणें प्रत्येकाच्या स्मृति-संग्रहांत असतातच ! ही व्यावहारिक दृष्टांतांची मालिका सादर करण्याचा मुख्य हेतु हाच आहे कीं, आमच्या अनेक होतकरू कविबांधवांनीं भाषा-सौष्ठव काव्यनुकूल शब्दरचना वगैरे काव्याचें जें कलाविषयक अंग आहे त्याचें यथार्थ महत्त्व त्यांच्या प्रत्ययास आणून द्यावें आणि या अंगाकडे त्यांचें लक्ष सध्यां जितकें असल्याचें दिसून येतें त्यापेक्षा अधिक प्रमाणानें तें दिलें जावें अशी त्यांना प्रेमाची सूचना करावी.

स्वतःच्या काव्यव्यासंगासंबंधीं कवीच्या ठिकाणीं जी दुसरी म्हणजे 'बहिर्मुख दृष्टि' असावी म्हणून सांगितलें त्या दृष्टीनें सध्यांच्या काव्यवाङ्मयाच्या प्रवाहाचें निरीक्षण केलें असतां, कित्येक आधुनिक कवींच्या कृतींत, प्राचीन ऐतिहासिक परंपरा जागृत करण्याचा आणि स्वाभिमानपोषक व कर्तव्योत्साहप्रेरक अशा, श्रीशिवाजी महाराज, बाजी प्रभु देशपांडे, थोरले बाजीराव, नाना फडणीस, बापू गोखले इत्यादि ऐतिहासिक विभूतींच्या गौरवपर कवनें करण्याचा आणि त्यांच्या चरित्रांतील काव्यानुकूल व उज्ज्वल प्रभावदर्शी प्रसंग काव्यसंजीवनीच्या स्फूर्ति-संचारक बोधामृतानें पुनः सजीव करण्याचा जो उपक्रम दिसून येतो तो खरोखर फार अभिनंदनीय आहे, यांत शंका नाहीं. मात्र यासंबंधीं केवळ पोंवाड्या-वगैरेंतील भाषानुकरणावरच भर देणें किंवा 'शाहिर-पंथी' काव्यास काव्याचें उदात्त अंग म्हणून ठरविण्याचा अट्टाहास धरणें वगैरे आगंतुक गोष्टींच्या नादीं न लागतां अशा कवींना आपापल्या आवडीनुसार कोणातरी आदर्शभूत ऐतिहासिक थोर विभूतीच्या चरित्रपर एखादें पौरुषोत्साहप्रेरक प्रदीर्घ काव्यरूपी सौभाग्य लेणें आपल्या प्रिय व परमपूज्य अशा स्वभाषा-मातेच्या चरणीं अर्पण कर-ण्याचा निश्चय करून तो तडीस नेल्यास फार महत्त्वाची वाङ्मयसेवा केल्याचें त्यांस श्रेय लाभेल. कारण, सध्यांच्या काव्यवाङ्मयांत, एकच विषयपर किंवा सर्गात्मक अशा प्रदीर्घ काव्यांची फार उणीव आहे ही गोष्ट सर्वांच्या सहज ध्यानांत येणारी आहे. किंबहुना, अशीं प्रदीर्घ काव्यें फारशीं निर्माण होत नाहींत. यावरून सध्यांच्या कवींची काव्यशक्ति अशीं प्रदीर्घ काव्यें निर्माण करण्याइतकी अखंड प्रवाहात्मक व विविधकल्पनाप्रचुरच नाहीं असाहि आक्षेप

कित्येकांकडून घेण्यांत येतो. अर्थात् हा आक्षेप सर्वस्वीं सयुक्तिक आहे असें म्हणणें उचित होणार नाहीं हें खरें, तथापि या आक्षेपाचें उगमस्थान कशांत असावें याविषयीं जर आपण विचार करूं लागलों तर थोड्याशा सूक्ष्म विचाराअंतीं आपल्यास कळून येईल कीं, या आक्षेपाचा उगम मुख्यतः आधुनिक कवींच्या कवितांचें जें प्रायः स्फुट प्रकरणात्मक किंवा प्रासंगिक विचार निवेदनात्मक असें—त्रोटक—त्रुटित—अथवा कित्येकांच्या मतें—तुटपुंजें—स्वरूप दिसून येतें त्यांत आहे. अर्थात् सध्यांच्या काव्यवाङ्मयावर आरंभापासून मुख्यतः आधुनिक पाश्चात्य वाङ्मयाचेंच त्यांतहि विशेषेंकरून इंग्रजी वाङ्मयाचेंच संस्कार होत गेले असल्यामुळें, तिकडल्याप्रमाणेंच इकडल्याहि काव्यवाङ्मयाचें स्वरूप —‘ गीतकें ’ ( Lyrics ) ‘ स्वनितकें ’ ( Sonnets ) ‘ विलापिका ’ ( Elegy ) ‘ उद्देशिका ’ ( Odes )— वगैरेसारखें त्रोटक काव्यरचनात्मक होत जाणें अगदीं अपरिहार्य आहे हें कांहीं अंशीं खरें आहे; परंतु वरील आक्षेपांत दुसऱ्या एका गोष्टीसंबंधाचा कटाक्ष गर्भित आहे. ती गोष्ट म्हटली म्हणजे, ही कीं,—आधुनिक कवींची प्रवृत्ति बहुतांशीं, त्रोटक काव्यरचना करण्यांतच समाधान, सार्थकता आणि आकुंचित अभिमान बाळगणारी आहे. जरा कोठें दोनचार ‘ चुटके ’ प्रसिद्ध केले कीं, लागलीच आपण ‘ कवि ’ पदाला पात्र झालों—नव्हे, स्वयमेव आपण जाऊन पोंचलोंच—अशी बऱ्याचशा तरुण आधुनिक मुग्ध कविपोतांची समजूत झालेली दिसून येते, असें ध्वनित करण्याचा वरील आक्षेपाचा कटाक्ष आहे. केवळ या आक्षेपाच्या स्वरूपापुरतांच विचार केला तर, या आक्षेपांत ध्वनित केल्याप्रमाणेंच सर्व आधुनिक तरुण कवींची समजूत आहे असें सरसहा अनुमान करणें बरेंच धाष्ट्यांचें होईल यांत शंका नाहीं. तथापि या आक्षेपांतील ग्राह्यांश म्हणून इतकाच घ्यावयाचा कीं, खरी ‘कवि’ ही पदवी प्राप्त होण्यास, कांहीं तरी भरदार काव्यग्रंथसंख्या कवीच्या हातून निर्माण होणेंच अवश्य आहे. तुटपुंज्या चुटके वगैरेदिकांनींच कविपदाची खरी मान्यता मिळणें अशक्य आहे; नुसते हिऱ्यांचे भुकटी वजा लहान मोठे कण जवळ असणें म्हणजे ‘ जवाहिऱ्या ’ चें दुकान थाटणें नव्हे ! ज्याच्याजवळ अनेक लहान मोठे, निरनिराळ्या रंगाचे पाणीदार, विविधतऱ्हेचे चित्ताकर्षक

व किंमत वाढविणारे पैलू पाडलेले हिरे, माणि, रत्नें वगैरे नेहमीं वागत आहेत व ज्याच्या हातून अशा हिरे-माणकांची देवघेव अखंड चालू आहे तोच खरा 'जवाहिऱ्या' होय. नाहीं तर श्रीमाधवबागेंतील पांजरपोळाच्या बाजूकडील नाक्यावर अथवा हॉर्नबी रोडवर टाईम्स छापखान्याच्या बाजूकडील 'फुटपाथ' च्या फरसबंदीवर अनेक प्रकारचे रंगी बेरंगी अल्प किंमतीचे कांचेचे खडे व दगड मांडून बसणारे पोटभरू फेरीवालेहि मोतीबाजारांतील जवाहिऱ्यांच्या योग्यतेचे ठरूं लागतील ! 'एखादी दुसरी कोकिळा दिसूं लागली म्हणजे वसंतऋतूचा उदय झाला असें म्हणतां येत नाहीं' अशा आशयाची जी एक इंग्रजींत म्हण आहे ती येथें चांगली लागूं पडते. ज्यांच्या कवितांचे खरे निवडक वेंचे काढण्याचें मनांत आणल्यास १००।१५० पानांचें निदान एखादें तरी चांगलें पुस्तक निघेल इतक्या विस्तृत काव्य-रचनेचे आधुनिक कवींपैकीं कितीसे सांपडतील बरें ! या गोष्टींचा निर्विकारपणें विचार केल्यास वरील आक्षेपांतील एका गर्भित अंशाची यथार्थता आपल्या चांगली ध्यानांत येईल. तें कसेंहि असो. मुख्य ध्यानांत ठेवण्याची गोष्ट म्हणून इतकीच कीं 'कवि' ही पदवी यथार्थत्वानें प्राप्त होण्यास, कवीचा काव्यनिर्मितीच्य व्यासंग व्यापक व विविधस्वरूपाचा असला पाहिजे व तो सहजौघी प्रवाहाप्रमाणें अखंड सातत्याचा व यथाशक्ति अन्यजनाल्हादक व अन्यजनोपकारक असला पाहिजे.

तसेंच, आधुनिक कवींचा वाचकवृंद हा साधारण जनतेपासून अगदींच अलग व भिन्न स्वरूपाचा—म्हणजे प्रायः अलीकडील सुशिक्षित लोक यांचाच बनलेला आहे. त्यामुळें, पूर्वींच्या साधुसंतांच्या कवित्वाचा जसा साधारण जनतेवर इष्ट परिणाम होऊं शकला तसा आधुनिक कवींतील उत्तमोत्तम गणले जाणाऱ्या कवींच्या कृतींचा अजून साधारण जनतेपर्यंत व्हावा तसा नुसता प्रवेशहि झालेला दिसत नाहीं; मग परिणाम होण्याची गोष्ट तर दूरच राहिली ! राजकीय परिस्थितीसंबंधीं ज्याप्रमाणें साधारण जनसमाज आणि सुशिक्षितवर्ग यांच्यामध्यें—कांहीं कालापूर्वीं—जसा अगदीं अलगपणा व पृथक्‌पणा नांदत होता—व तो तसाच नांदण्याविषयीं कित्येकदां कित्येकांकडून सहेतुक प्रयत्नहि करण्यांत येत असत

व असतातहि—तसाच आधुनिक कवि व साधारण जनसमाज यांच्यामध्यें परस्पर फार दूरीभाव-किंबहुना परस्परांबद्दलच्या अज्ञानामुळें एकप्रकारची तुच्छतायुक्त अनादरबुद्धि-प्रसृत असलेली दिसून येते, ही फार शोचनीय गोष्ट आहे! पण सुदैवानें हल्लीं सर्व देशभर पसरलेल्या राष्ट्रैक्याच्या भावनेच्या प्रभावानें ही शोचनीय स्थिति अल्पायासानें दूर होण्यासारखी आहे, व ती दूर करण्याची मुख्य जबाबदारी-व कार्यसिद्धीनंतरच्या श्रेयाचा मुख्य वांटाहि—आधुनिक कविवर्गाकडेच स्वाभाविकपणें येतो. त्यांनीं आपल्या काव्याचें आतांपर्यंतचें केवळ एकदेशीय—व तेंहि प्रायः परदेशानुसारी—धोरण ठेविलें होतें तें बदलण्याचा उपक्रम केला पाहिजे. स्वदेशभावनेच्या प्रेमानें साधारण जनतेच्या विचारप्रवाहाशीं—त्याच्या सामाजिक पूर्वपरंपरेशीं व दृढमूल धार्मिक भावनांशीं त्यांनीं आपलें तादात्म्य करून घेतलें पाहिजे; ' जनतेचें खरें हित कशांत आहे तें, खुद्द जनतेपेक्षां किंवा तिचाच अंशभूत जो सुशिक्षित पुढारीवर्ग त्यापेक्षां आम्हां राजकर्त्यांनाच जास्त चांगलें कळतें ' असा जो सद्धेतुमूलक दुराग्रहरूपी महाग्रह ( समंध वगैरे ) नोकरशाहीच्या मनांत अजूनहि—या स्वयंनिर्णय तत्त्वोद्घोषक विसाव्या शतकांतहि ठाणें देऊन बसलेला दिसतो त्याप्रमाणें, साधारण जनतेच्या किंवा त्यांचे प्रतिनिधिभून कित्येक आधुनिक सुशिक्षित लोक यांच्या काव्यासंबंधाच्या ज्या विशिष्ट कल्पना असतील त्यांचा अव्हेर करण्याची आणि खऱ्या काव्याची काय-किंवा समाजहिताची काय—कल्पना काय ती आम्हांलाच आहे व आमच्याच पद्धतीनें काय तें खऱ्या काव्याचें आविष्करण होऊं शकते ' अशा तऱ्हेचा अभिनिवेश— अंगीं असल्यास—आधुनिक कवींतील आमच्या कित्येक ईश्वरदत्तप्रतिभेच्या कविबंधूंनीं सोडून देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आपल्या समाजाच्या खऱ्या भावना व आकांक्षा यांच्यांशीं तादात्म्य करून घेऊन त्यांनाच आपल्या स्फूर्तिसंचारक काव्यवाणीनें मूर्तस्वरूप दिलें पाहिजे, व अशा रीतीनें वाङ्मय सेवेच्या द्वारां राष्ट्रपुरुषाच्या चरणीं सदैव तत्पर व सादर राहून स्वतः सह एकंदर समाजास उत्कर्षाच्या व उन्नतीच्या आनंदमय भाग्यशिखराकडे नेण्याचा यथामति अखंडोत्साहानें प्रयत्न करीत राहिलें पाहिजे—हेंच ' बहिर्मुख ' दृष्टीनें कोणाहि खऱ्या कवीचें परमभाग्य व जन्मसाफल्य होय ! !

२

येथवर काव्य व कवि यांच्यासंबंधी मुख्यत: कवींच्या दृष्टीनें सविस्तर विवेचन केलें. आतां, कोणतीहि कविता हातीं आली असतां, तिच्या गुणावगुणांचें ठोकळमानानें निदान कसें करावयाचें आणि त्या कवितेच्या रसाचा आस्वाद कोणत्या वृत्तीनें घ्यावयाचा या मुद्द्यासंबधीं वाचकांच्या दृष्टीनें थोडक्यांत विवेचन करितों. वेदान्ताच्या मताप्रमाणें या स्थूल सृष्टींतील प्रत्येक पदार्थ सत्त्व, रज व तम अशा त्रिगुणांच्या संयोगानें झालेला आहे. काव्याचें म्हणजे काव्याच्या स्वरूपाचेंहि याचप्रमाणें तीन स्वाभाविक घटक आहेत. ते असे:— १ काव्यानुकूल विषयसंदर्शन. २ सुश्लिष्ट व मनोहर शब्दरचना, अर्थात् भाषासौष्ठव व ३ अर्थोद्दीपन अथवा तत्त्वप्रतिपादन. कविता हातीं घेतली कीं प्रथम तिच्यातील विषयाकडे स्वाभाविकच मनुष्याचें लक्ष जातें तेव्हा त्यावेळीं विचार करावयाची गोष्ट ही कीं कवितेसाठीं घेतलेल्या विषयांत खरोखरच कांहीं काव्यबीज आहेत काय व असल्यास आपल्या मताप्रमाणें, त्या विषयाचें सारसर्वस्व कशांत आहे. 'चांगली सुरवात म्हणजे अर्धांअधिक मात' (First blow is half the battle)अशी जी इंग्रजी म्हण आहे तिचेंच तत्त्व येथें कांहीं अंशीं लागूं पडतें.मुख्यतः कवितेच्या विषयाची निवड करण्यांत कवीचें अधिक चातुर्य दिसून येतें. या निवडीच्या चांगलेपणाची एक कसोटी म्हटली म्हणजे कवितेचा विषय कांहीं अपूर्व असावा, म्हणजे विषयाचें नांव पाहिल्याबरोबर त्या कवितेच्या साधारण स्वरूपाची जरी अटकल झाली—आणि तितक्यापुरत्या दृष्टीनें, तो विषय जरी काव्यानुकूल ठरला—तरी पुढें प्रत्यक्ष त्या विषयाच्या प्रतिपादनांत जर कांहीं अपूर्वपणा व चटकदारपणा वाटला तर, ती निवड उत्तम झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. अकल्पित आश्चर्य वाटावयास लावणें हीच विषयाच्या अपूर्वपणाची व चटकदारपणाची कसोटी समजावी. हेंच दुसऱ्या शब्दांनीं सांगावयाचें म्हणजे एखादी पौराणिक कथा अथवा ऐतिहासिक गोष्ट आपल्यास संपूर्ण ठाउक असली तरी एखादा चित्रकार त्या गोष्टींपैकीं कोणत्या विशिष्ट प्रसंगास महत्त्व देतो व तें महत्त्व चित्राच्या द्वारें आपल्या मनावर तो प्रतिबिंबित कितपत करूं शकतो—थोडक्यांत म्हणजे

वयाचें म्हणजे तो चित्राचें विषयसूचक नांव काय व कसें देतो–या एका गोष्टी-वरून त्या चित्राची मातब्बरी व चित्रकाराची कर्तबगारी दिसून येते. ही आश्चर्य उत्पन्न करण्याची शक्ति प्रत्येकांत नवी, भिन्न भिन्न व अनंत प्रकारची असल्यामुळेंच चंद्र, पतंग, समुद्र, वगैरेंसारख्या सर्वपरिचित पदार्थांवरहि निर-निराळ्या कवींच्या सारख्याच सुंदर पण अभिनव आश्चर्यकारक कविता सर्व वाङ्मयांत आढळून येतात. विषयाच्या निवडीची कसोटी ठरल्यावर, मग त्या वि-षयास अनुरूप व उचित अशी कवितेची भाषासरणी आहे कीं नाहीं हें पहावें. म्हणजे विषय गंभीर स्वरूपाचा असल्यास भाषासरणीहि तशीच गंभीर आहे कीं नाहीं, अथवा करुणरसात्मक असल्यास तशीच मृदुललित व करुणार्थोत्कट शब्द-पूर्ण आहे कीं नाहीं, हें पाहिलें पाहिजे. कित्येक वेळां कल्पना फार अभिनव व रम्य असून, केवळ योग्य भाषावैभवाची जोड न मिळाल्यामुळें एखाद्या गरीबाची जात्या फार सुंदर अवयवाची पण क्षीण कांतीची आणि बहुतेक अलंकारशून्य अशी कुमारिका जशी नयनमनोहर असली तरी तिच्या त्या बाह्य वेषावरून तिच्या जनकाच्या गरीबीचाच विचार प्रथम व प्रमुखपणानें मनांत येऊन तिच्य सौंदर्याबद्दल विषादमिश्रित कींव उत्पन्न होते तद्वत्च अलीकडील कांहीं चांगल्या प्रतिभेच्या कवींच्या कृतींत भाषा परिपोषाकडे जसें लक्ष द्यावयास पाहिजे तसें दिलें न गेल्यामुळें, रसिक वाचकाच्या मनाची विषण्ण स्थिति होते! कित्येक अलीकडील कवींची अशी एक भ्रामक समजूत झालेली दिसते कीं, सामान्य वाचक वर्गास नव्या व अपरिचित कल्पना फारशा आवडत नाहींत; व त्याचें कारणहि ते आपणच असें जोडून देतात कीं, साधारण महाराष्ट्र वाचक, जुन्या कवींच्या शब्दरचनेच्या व कविसंकेताच्या वातावरणांत वाढल असल्यामुळें, आधुनिक वाङ्मयांतील अभिनव कल्पना ग्रहण करण्याची त्यांच्या अंगीं स्वाभाविक पात्रता व मानसिक क्षमताच नसते!! परंतु ही समजूत चुकीची असून, पुष्कळ बहुश्रुत व रसिक वाचकाचें लक्ष नव्या कवींच्या कृतींकडे विशेष वेधलें जात नाहीं याचें खरें कारण दुसरें तिसरें कांहीं नसून, खुद्द कवींचीच रचना–भाषा परिपोषाच्या व कल्पना विकासाच्या दृष्टीनें–सदोष, संदिग्ध व अपूर्ण असते. कोणतीहि नवी कल्पना केवळ 'नवी' व अपरिचित आहे

याच एका कारणास्तव एखाद्या खऱ्या रसिक काव्यभोक्त्यास समजणार नाहीं असें कधींच होऊं शकत नाहीं. मात्र कवीनें जी काय खबरदारी घ्यावयास पाहिजे ती हीच कीं, अपरिचित व नवी कल्पना असेल तर तिच्यांत रम्यत्व व अपूर्वत्व कोठें व कसें आहे हें जितक्या स्पष्ट व सुबोध रीतीनें प्रसंगविशेषीं त्याच्या मनास जितके शब्द अथवा जितक्या ओळी पुऱ्या वाटत असतील त्याच्यापेक्षां जास्त शब्द व ओळी घालूनहि वाचकाच्या मनावर त्यास बिंबवितां येतील तितकें बिंबविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. नाहीं तर, पूर्वींचे 'चंद्र' 'कमल' 'धवल स्मित' वगैरे कविसंकेत शिळे, कायमठशाचे व कंटाळवाणे म्हणून त्यांचा एकीकडे उपहास करावयाचा; व आपण पुनः पुनः हसणारीं फुलें मुलें, नक्षत्रांचे, अश्रू किंवा मोत्यांचे सर, निर्झर बालकें, नद्यांचें व वेलींचें खेळणें बागडणें, हास्य, प्रेम, कारुण्य 'उधळणें' वगैरेंसारख्या नव्या निघालेल्या कविसंकेतांवर वेळोंवेळीं, युक्तायुक्ततेकडे तादृश लक्ष न देतां कसरत करायाची व संदिग्ध व अर्थशून्य कल्पनांच्या 'गिरक्या' व 'पिंगा' घालीत बसावयाचें किंवा, संबंध असो नसो, 'मांगल्या' चा 'शुभत्वा' चा 'पावित्र्या'चा, 'मानव्या' चा वगैरें अनेक भाववाचक नामांचा 'सडा' घालीत सुटावयाचें !! –हाहि प्रकार तितकाच हास्यास्पद व अप्रयोजक होय. रसिक वाचकाचा कटाक्ष अभिनव कल्पनेला अनुरूप अशा नवीन शब्दरचनेवर केव्हांहि असणें शक्य नाहीं व असतहि नाहीं. मात्र, पुष्कळ वेळां, एकांगी ऊर्फ केवळ आधुनिक व प्रायः इंग्रजीच काव्यवाङ्मयाचें परिशीलन झाल्यामुळें, ज्या कल्पना एखाद्या अलीकडील कवीला त्याच्या दृष्टीनें अभिनव व अपूर्व वाटतात, त्याच, संस्कृतवाङ्मयाचें व जुन्या कवींच्या सर्व वाङ्मयाचें तुलनात्मक दृष्टीनें केवळ मराठी भाषेच्या द्वारें अध्ययन केलेल्या एखाद्या बहुश्रुत वाचकास तितक्याशा अभिनव वाटणार नाहींत. याचें एक ठळक उदाहरण घेऊं. व्यवहारांतील अगदीं साध्या व नेहमीं अवलोकनांत येणाऱ्या गोष्टींवरून किंवा वस्तुनिरीक्षणावरून, कांहीं तरीं उपयुक्त व उदात्त नीतितत्त्वें काढणें हा एक आधुनिक पाश्चात्य काव्यवाङ्मयाचा अपूर्व व अनुकरणीय विशेष म्हणून सांगण्यांत येतो. अशा काव्यपद्धतीस 'मननात्मक' अथवा 'आत्मलक्षी' पद्धति ( Reflective, Subjective ) असें नांव आहे; व त्याचा मुख्य अध्वर्यु

वर्ड्‌स्वर्थ हा मानला जातो. अर्थात्, खुद्द इंग्रजी वाङ्मयाच्या दृष्टीनें पाहिलें किंवा वर्ड्‌स्वर्थ वगैरे सारख्यांच्या काव्यांतील कांहीं कांहीं खरोखरच अपूर्व व बोधप्रद कल्पना लक्षांत घेतल्या तर, ‘ मननात्मक ’ किंवा ‘ आत्म-लक्ष्मी ’ काव्यपद्धति हा त्या वाङ्मयांतील एक चांगला व अनुकरणीय विशेष आहे याबद्दल कोणाहि समंजस माणसाचा मतभेद होणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे, तर केवळ जुन्या मराठी कवींच्याच काव्यरचनेकडे या मुद्द्याच्या दृष्टीनें पाहिलें तर, तिच्यांत या ‘ मननात्मक ’ किंवा ‘ आत्म-लक्षी ’ पद्धतीचें फारसें अस्तित्व दिसून येत नाहीं असेंहि म्हणण्यास कोणी निःपक्षपाती महाराष्ट्र भाषाभिमानी वाङ्मयोपासक अनमान करणार नाहीं. परंतु पूर्वींच्या मराठी वाङ्मयांत या ‘ मननात्मक ’ किंवा ‘ आत्म- लक्षी ’ पद्धतीचें अस्तित्व प्राचुर्यानें दिसत नाहीं म्हणून तें मराठींत मुळींच नाहीं; किंवा तें नाहीं ही मराठी वाङ्मयाची मोठीथोरली नामोशी आहे असें मात्र समजण्यास तो केव्हांहि तयार होणार नाहीं; शिवाय अशी स्थिति असावयाला काय कारणें झालीं त्याचेंहि तो ऐतिहासिक परिशीलनाच्या ( Historical criticism ) पद्धतीनें समर्पक निवेदन करूं शकेल. परंतु याहिपेक्षां विशेष महत्त्वाचा मुद्दा म्हटला म्हणजे संस्कृत वाङ्मयांत, केवळ काव्यशास्त्र-विनोदाचा प्रासंगिक आविर्भाव या नात्यानेंच प्रायः वेळोवेळीं रचण्यांत आलेला ‘ सुभाषित ’ या सर्व साधारण व व्यापक नांवाखालीं येणारा जो वाङ्मयाचा प्रकार आहे, त्याच्या अपूर्वत्वाबद्दलचा होय. हा संस्कृत वाङ्मयांतील ‘ सुभाषित ’ रचनेचा प्रकार म्हटला म्हणजे एक प्रकारें ‘ मननात्मक ’ किंवा ‘आत्म-लक्षी’ काव्यपद्धतीरूपी काव्यकामिनीचा उदात्त कोटीपर्यंतच नेऊन पोंचविलेला पूर्ण विकास व विलास आहे, असें म्हणण्यांत तिळमात्र अतिशयोक्तीचा आरोप येणें शक्य नाहीं अशी आमची खात्री आहे. ईश्वरी कृपेनें, ज्यांना, आपल्या मातृभाषेची आई अर्थात् आपली आजी या नात्यानें संस्कृतभाषेशीं निकट संबंध जोडण्याचें व तिच्याशीं लीलेनें—अर्थात् प्रेमळ लडिवाळपणानें परिचय करून घेण्याचें सद्भाग्य लाधलें आहे त्यांनीं तर या गोष्टीचा यथार्थ अभिमान बाळगला पाहिजे- व यथाशक्ति या प्रेमळ, धीरोदात्त व निरुपम वात्सल्ययुक्त आजीचा आशीर्वाद व लोभ संपादन करून घेण्याचा अहर्निश प्रयत्न केला पाहिजे.

संस्कृत वाङ्मयाच्या अफाट सृष्टींत सुभाषितसागरांत काय, किंवा काव्य-नाटकादि सुधाप्रवाहांत काय, इतक्या अभिनव, अपूर्व व सदैव चित्ताल्हादक कल्पना भरल्या आहेत कीं त्यांतील कांहींचा सहजासहजीं बिंदुमात्र आस्वाद घडल्यास आधुनिक लोकांच्या, कौतुकातिरेकानें मुरकंड्या वळतील; आधुनिकांच्या साध्याभोळ्या व निर्भीड प्रेमोत्कट शब्दांत सांगावयाचें म्हणजे ते अगदीं अशा कल्पनांवर 'बहुत खूष' 'राजी' व फिदा होऊन जातील! सारांश, या मुद्द्यासंबंधीं विशेष जोर देऊन सांगावयाची गोष्ट ती हीच कीं, ज्याप्रमाणें आधुनिक काव्यमीमांसेंत काव्याचें लक्षण व हेतु अनुक्रमें "उत्कट भावनांचा सहजाविष्कार"[१] व 'जीवनें--शिक्षण'[२] हीं मानण्यांत आलीं आहेत त्याच-प्रमाणें प्राचीन संस्कृत कवि व काव्यशास्त्रकार यांनींहि काव्याचें लक्षण व हेतु तेच सांगितले आहेत. श्रीवाल्मीकीच्या 'मा निषाद प्रतिष्ठां त्वं......' या पहिल्या श्लोकासंबंधीं भवभूतीनें 'आकस्मिकप्रत्यवभासा निर्गता वाणी' असें म्हटलें आहे; व काव्यप्रकाशकर्ते मम्मटाचार्यांनीं 'व्यवहारवित्ति' (लोक-व्यवहाराचें ज्ञान प्राप्त होणें) हा काव्याच्या चार हेतूंपैकीं एक हेतु सांगितला आहे. तसेंच, काव्यद्वारां होणाऱ्या उपदेशाचें रम्यत्व व मृदुसुलभग्राह्यत्व दर्शविण्यासाठीं त्यांनीं मुद्दाम 'सद्यःपरनिर्वृतये कान्तासंमिततयोपदेशयुजे.' याचा अर्थ असा कीं, काव्य हें, प्रिय व कुशल पत्नीप्रमाणें, मृदु कोमल शब्दरचना व ललितमनोहर अर्थध्वनि यांच्या प्रयोगानें मनुष्यांच्या मनास तत्काल आराम व समाधान उत्पन्न करून त्यांस सन्मार्गास प्रवृत्त करितें; या नुसत्या एका सहज वर्णिलेल्या लक्षणावरून, उत्तम प्रतिभायुक्त काव्यास भाषासौष्ठवाच्या अंगाची किती अवश्यकता आहे याची जितकी 'काव्यमय' व सहजगम्य कल्पना होईल तितकी, काव्यमीमांसेचे अनेक सूक्ष्म व रूक्ष विवेचनपर ग्रंथ वाचून होणार नाहीं असें म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होईल कीं, काय हें ठरविणें वाचकांवरच सोंपवितों.

काव्याचें तिसरें महत्त्वाचें अंग म्हटलें म्हणजे कांहीं अपूर्व अभिप्राय प्रकट करणें अथवा कोणतें तरी नवीन तत्त्व सांगणें हें होय. विषय कोणताहि असो;

---

१ वर्ड्सवर्थची काव्याची व्याख्या, २ मॅथ्यु आर्नोल्डचें तत्त्व criticism of Life,

पण तो इष्टांपुढें कवीनें उभा केल्यावर, त्याच्याच विचारसरणीनें पहातां कोणत्या रीतीचा तत्त्वविचार किंवा वर्णन यानें कवितेचा शेवट झाला पाहिजे याची वाचकानें प्रथमतः आपल्या मनाशीं अटकळ बांधण्याचा सराव पाडावा व नंतर आपली अटकळ व कवीनें प्रत्यक्ष केलेलें कवितेचें पर्यवसान यांची तुलना करून, किती मानानें दोघांचें विचारैक्य होतें व कोणत्या बाबतींत कवीचा व आपला मतभेद होतो तेंहि निश्चित करण्याचा अभ्यास वाचकांनीं केला पाहिजे. कित्येक वेळां, विषयाच्या आरंभाच्या श्लोकाच्या मानानें कवितेचें पर्यवसान अगदींच विसदृश व क्षीणबल असें केलेलें आढळतें. कित्येक कवितेंत, विषयापासून सुचलेल्या म्हणून ज्या कल्पना वर्णिल्या जातात, त्या बऱ्याच कृत्रिम असाहजिक व अर्थात् ओढाताण करून बसविलेल्या अशा भासतात. यासंबंधाची लक्षांत ठेवावयाची गोष्ट ही कीं, कवितेंतील आपला हेतु अथवा कवितेंत ध्वनित केलेला अर्थ कितीहि अपूर्व असला तरी तो अशा रीतीनें वाचकांपुढें मांडलेला असावा कीं, वाचक, कवितेच्या अगदीं शेवटच्या भागाला येईपर्यंत त्याच्या तोंडावर, कविता वाचतांना, स्वाभाविकपणानें एकसारखें सकौतुक आल्हादाचें व अनुमतीचें स्मित खेळतें रहावें आणि अगदीं शेवटच्या ओळींत किंवा अगदीं शेवटच्या भागाशीं आल्यावर, त्यांतील आपल्यास अकल्पित, परंतु विषयाला अनुरूप असें कांहीं नवीन प्रमेय अथवा वर्णन आलेलें पाहून त्याचा चेहरा अकल्पित आश्चर्य व आनंद यांनीं फारच प्रफुल्लित व्हावा व ती त्याची चेहऱ्यावरील प्रफुल्लता, त्यानें कवितेवरून दृष्टि काढून इतर गोष्टींकडे लाविली तरी ती त्याची स्वानंदतृप्तीची छटा, त्याच्याहि न कळत, कांहीं वेळ त्याच्या चेहऱ्यावर चमकत रहावी. कित्येक कवितांचा अमुक एक विशेष चांगला असें दाखवितां येत नाहीं, हें जरी खरें तरी एकंदर समुच्चयात्मक रीतीनें त्यांचा परिणाम आपल्यावर फार अनुकूल अशा-प्रकारचा होतो अथवा कित्येक कवितेंत, एकच ओळ अशी अनुरूप, उत्कट व बहारदार असते कीं, तीच ओळ-किंबहुना कित्येक कवितेंत फक्त एखाददुसरा शब्दच-त्या सर्व कवितेचा जीवात्मा व जीवितसर्वस्व होय असें म्हणावें लागतें. अशी कविता निरखून आस्वाद घेण्याची संवय केल्यानें मनुष्याची रसिकता वाढत जाऊन त्यास सदभिरुचीचें शिक्षणहि आपोआप मिळत जातें व कालेकरून त्या

रसिकतेचा परिपाक होऊन, कोणतीहि कविता पुढें आली असतां, तिच्या एकंदर रचनेकडे व त्यांतील आपोआप पडणाऱ्या पोट विभागांकडे मनुष्याचें लक्ष साहजिकपणें वधतें; व त्यांतील गुणावगुण चटकन व निश्चितपणें ठरवितां येतात. याप्रमाणें कवि आणि वाचक यांच्यामधील संबंध विशेष निकट व सतत चालू राहिल्यास ( त्याचीच, माझ्या मतें सध्यांच्या आमच्या काव्यवाङ्मयाच्या संक्रमणावस्थेंत फार आवश्यकता व उणीव आहे! ) सत्कवि आणि सद्रसिक हे परस्परांचे अभिरुचिपोषक होऊन परस्परांच्या अभिरुचीचे नियामक व शिक्षक होतील असें म्हणण्यास हरकत नाहीं. सत्कवि आपल्या कृतींच्या योगानें चांगली कविता कशी असते, व असावी याचें जणूं काय, अप्रत्यक्षरीतीनें साधारण वाचकांस शिक्षणच देत असतो; आणि एखाद्या सहृदय निःस्पृह व कसलेल्या रसिक टीकाकारानें आपल्या कवितेला नाक मुरडल्याचें जर सत्कविला समजलें तर तो आपली काय चूक घडली याबद्दल आत्मशोधन करूं लागतो, व चूक लक्षांत येऊन ती पुनः न होऊं देण्याविषयीं तो साहजिकच पुढें दक्ष रहातो. शेवटीं या विवेचनाचें निष्कर्षरूप असें एकच सूत्रवाक्य नमूद करून हें विवेचन पुरें करितों. हें सूत्रवाक्य, वर एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें, इंग्रजी वाङ्मयांत "व्यावहारिक तारतम्यप्रधान टीकापद्धति" (Common sene Criticism.) विशेष रूढ करणारा जो पंडितवर डॉ. जॉन्सन त्याचेंच आहे. आणि तें वाक्य केवळ, कवि अथवा टीकाकार यांनींच नव्हे तर, वाङ्मयदेवतेची सेवा करणाऱ्या प्रत्येक उपासकानें आपलें ब्रीदवाक्य करून ठेवण्याच्या योग्यतेचें आहे. तें सूत्रवाक्य हें होयः—'जनाभिरुचीला चांगलें वळण लावणारा मनुष्य हाच खरा लोकोपकार करणारा होय.' (He who refines the public taste is a real public benefactor.)

बरेंच दिवसांच्या उत्कट हेतूप्रमाणें, एखाद्या आवडत्या स्वच्छ मनोहर जलाशयाच्या कांठीं संध्याकाळच्या शांत व रम्य वेळीं बसलें असतां आणि अंगावर एकसारख्या मंदमंद, उल्हास व समाधानसंचारक पवनलहरी चालू असतां मनुष्याच्या अंतस्थ प्रशांत मानससरोवरावरहि मंद मंद व अनुकूल संवेदनीय अशा विचारलहरी एकामागून एक आपोआप उठूं लागतात. याप्रमाणें आंतून व बाहेरून होणाऱ्या सुखसंवेदनांत

मनुष्य इतका तल्लीन होऊन जातो कीं, आपण जलाशयाचे कांठीं किती वेळ बसलों याचें त्याला भानच रहात नाहीं. त्याचप्रमाणें, प्रस्तावनेच्या रूपानें काव्य व कविता यासंबंधीं विवेचन करण्याच्या भरांत लेखकाचा व त्याच्यामुळें स्वभावसहिष्णु वाचकांचाहि किती कालक्षेप झाला याचें त्यास भानच राहिलें नाहीं ! आतां त्याबद्दल औपचारिक दिलगिरी प्रदर्शित करणें म्हणजे, आईबापांच्या उत्कट वात्सल्याची खात्री असल्यामुळें, प्रसंगविशेषीं लांबवर फेरफटका करण्याच्या मोहास वश होऊन उशिरां घरीं परत येणाऱ्या व वरमल्यासारखें झाल्यामुळें उसन्या चापल्यप्रदर्शनानें आईबापांस रिझवण्याचा व त्यांचा रोष जिरविण्याचा प्रयत्न करणाऱ्या अल्लड पोराच्याच वर्तनाचें केवळ अनुकरण होईल ! तेव्हां तसें न करितां आतां खुद्द "हृदयतरंगा" चे कर्ते प्रिय कवि सन्मित्र रा. रा. "अनंत-तनय" ऊर्फ दत्तात्रेय अनंत आपटे यांच्या कवितेविषयीं माझे अल्प विचार सादर करून प्रस्तावना पूर्ण करितों. सदरहू विचार प्रदर्शित करण्याचें माझें कर्तव्य दोन्ही गोष्टींनीं सुलभ झालें आहे. पहिली गोष्ट अशी कीं, आज जवळ जवळ १५।२० वर्षांच्या अखंड व विविधविषयक काव्यव्यासंगानें 'अनंत-तनय' यांचें नांव प्रमुख वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें यांच्या द्वारें शब्दशः आबालवृद्धांस चांगल्या परिचयाचें झालें आहे. तेव्हां त्यांची 'ओळख' किंवा 'नवा परिचय' महाराष्ट्र वाचकांस करून देण्याची किंवा त्यांच्या काव्यांच्या गुणावगुणासंबंधानें पाल्हाळानें विस्तार करण्याची—मुळींच आवश्यकता नाहीं ! थोडक्यांत इतकें म्हटलें असतां पुरें होईल कीं; महाराष्ट्रांतील प्रमुख वर्तमानपत्र अथवा मासिक पुस्तक वगैरेंपैकीं क्वचित्च असें असेल कीं, जें कोणत्याहि स्मरणीय प्रसंगीं "अनंततनय" यांच्या हातच्या कृतीची आपण होऊन अपेक्षा करीत नाहीं अथवा तशी कांहीं प्रासंगिक रचना मित्र. रा. "अनंत-तनय" यांजकडून गेली असतां प्रेमादरानें तिचा स्वीकार करीत नाहीं !! या सार्वत्रिक स्नेहादराचें मुख्य रहस्य म्हटलें म्हणजे खऱ्या कवीच्या ब्रीदाला योग्य अशी त्यांची सर्वसंग्राहक, विनयशील, निगर्वी व मित्रसाहाय्यतत्पर वृत्ति ही होय. केवळ त्यांच्या वाङ्मयात्मक चरित्रनिरीक्षणावरून माझ्या मतें सर्वांनींच—विशेषतः 'कवि' पदवीची स्पृहा बाळगणाऱ्यांनीं—घेण्यासारखा पहिला बोध म्हटला म्हणजे यथार्थ रीतीनें 'कवि' समजला जाण्यास,

कांहीं तरी नांव घेण्यासारखी व स्वतंत्र रूपानें छापविण्याच्या योग्यतेची कविता मनुष्याच्या हातून निर्माण झाली पाहिजे. याचाच अर्थ अखंड व सोत्साह काव्यव्यासंग चालू राहिला पाहिजे. धूमकेतुवृत्ति अथवा कपिला षष्ठीचें व्रत किंवा उन्हाळ्यांतील बहुतेक शुष्कप्राय झालेल्या झऱ्यांचें त्रुटित व शक्तिहीन झिरपणें व ठिपकणें–वगैरे सर्व प्रकार खऱ्या काव्यवृत्तीशीं विसंगत व तिच्या योग्य विकासास फार घातुक व वावडे आहेत. 'अनंत-तनय' यांच्या कवितांच्या वाचनावरून दुसरी एक महत्त्वाची गोष्ट ध्यानांत येते ती ही कीं, कोण्याहि कवीच्या भाषेस खरें भाषाप्रभुत्व व भाषासौष्ठव-म्हणजे एक तर, विषयाच्या स्वरूपानुसार त्यास योग्य अशी शब्दरचना, हुकुमबंद्या सेनेप्रमाणें, वाटेल त्या वेळीं व वाटेल त्या व्यवस्थेनें साहजिकपणें पुढें हात जोडून आज्ञेस तत्पर रहाणें; आणि दुसरें, आपल्या भाषासरणीला कांहीं प्रकारचें अनन्य साधारण असें विशिष्ट ठरीव, भरीव व ठसठशीत रूप येण्यास जुन्या कवींच्या ग्रंथांचें आस्थायुक्त परिशीलन होणें फार अवश्य असतें. कारण काव्याच्या इतर गुणांबरोबर, रचनेची पुष्टि–भरीवपणा व सकस बांधेसूदपणा– हाहि एक महत्त्वाचा गुण आहे. या गुणाच्या अभावीं कवितेंतील विषयीभूत कल्पना कितीहि सुंदर असली तरी, खुद्द कविताहि वर एके ठिकाणीं दर्शविल्या-प्रमाणें–एखाद्या अशक्त व फिकट सौंदर्यवती स्त्रीसारखी क्षीणशक्ति व अनु-कंपार्हच होते; आणि हाच अनुभव कित्येक चांगल्या आधुनिक कवितांच्या संबंधानें येत असल्याबद्दल पुष्कळांच्या तोंडून आक्षेप निघत असतो; अर्थात्, केवळ भाषा हें काव्य नव्हें; व जसें एकाचें नाक दुसऱ्याच्या नाकासारखें कधींहि–बनवूं म्हटलें तर बनविलें जात नाहीं, त्याचप्रमाणें, ' मूर्ति तितक्या प्रकृति ' या न्यायानें प्रत्येक लेखकाची–मग तो गद्यसरणीचा असो कीं पद्या-त्मक रचना करणारा असो–विशिष्ट शैली आपोआप ठरत जाते, हीं सामान्य तत्त्वें कोणासहि मान्य होण्यासारखीं आहेत. परंतु हीं तत्त्वें सापेक्ष म्हणजे कांहीं मर्यादेपर्यंतच लागू पडणारीं आहेत, हीहि गोष्ट त्याच्याच बरोबर ध्यानांत ठेवणें फार अगत्याचें आहे. या तत्त्वांचा अर्थ इतकाच घ्यावयाचा कीं, अखेर कोणाची भाषाशैली–जी काय ठरेल ती–त्याची स्वतःची त्या बाबतींत जशी व जितकी स्वाभाविक पात्रता असेल त्या मानानेंच ठरेल. पण

यावरून, मनुष्यानें काव्यरचनेची पूर्व तयारी म्हणून, आदर्शभूत कवींच्या रचनेकडे मुळींच लक्ष देऊं नये असें अनुमान काढणें केव्हांहि सयुक्तिक होणार नाहीं. अविचारी अथवा अंधअनुकरणानें एखाद्या भूतपूर्व कवींच्या क्लिष्ट रचने-सारखीच आपलीहि रचना क्लिष्ट होईल इतकी पूर्वानुकरणाची कृत्रिमता आपल्या कवितेंत नसावी याबद्दल प्रत्येकानें जपावें हें खरें; परंतु त्या कवींच्या काव्यांस नमुनेदारपणा येण्यास अथवा ज्या कांहीं विशिष्ट व अपूर्व गुणामुळें प्रत्येक आदर्श-भूत कवींचीं काव्यें आपापल्या परी सदैव मनोहर वाटतात, त्या त्या गुणांचें प्रतिबिंब, तादात्म्याच्या परिशीलनानें व अनायासें आपल्या काव्यांत दृग्गोचर झाल्यास कोणाहि आधुनिक कवीस त्याबद्दल विषाद अथवा मानहानि वाटण्याचें बिलकुल कारण नाहीं. उलट, कित्येक अगदीं प्राथमिक अवस्थेंत असणारे व अल्पस्वल्प रचना करणारे होतकरू कवि, कीं ज्यांना त्यांच्या रचनेच्या तुटपुंजेपणामुळें, **बिंदुस्रावी कवि** असें नांव देणें अगदींच अस्थानीं होणार नाहीं असे कवि–प्रतिभेच्या दृष्टीनें चांगल्यांपैकीं परंतु भाषापुष्टीच्या दृष्टीनें क्षीणशक्ति अशा कित्येक आधुनिक कवींच्या तुटपुंज्या व बेडौल ठरीव शब्दांचेंच अंधानु-करण करण्याऐवजीं व्यापक भाषावैभवाच्या दृष्टीनें जर जुन्या कवींच्या ग्रंथांचें वाचन करतील तर त्यांस खात्रीनें फायदा झाल्यावांचून रहाणार नाहीं. अति तालीमबाजी करून स्थौल्यानें व जाड्यानें महिषासुराची स्पर्धा करणारें शरीर बनविणें हें जरी उघड उघड अप्रयोजक व निरुपयोगी होय तरी जेणें करून आपल्या भावि जीवनक्रमांत आपली शरीरयष्टि बांधेसूद, निरोगी, सुखकर व कार्यक्षम होईल अशा बेताचा कोणताहि शारीरिक व्यायाम करणें हें प्रत्येकाचें कर्तव्यच होय. हीच गोष्ट काव्य-रचनेच्या पूर्व तयारीसंबंधीं खरी आहे. उत्तम ग्रंथांच्या परिशीलनानें आणि तादात्म्यभावनारूप श्रद्धायुक्त उपासनेनें आपला विशिष्ट काव्यगुण कायम राहून शिवाय आपल्या काव्यास आपाततः आणखीहि कसें सहज रम्यत्व व स्पृहणीय गांभीर्य–ओज–येतें याचें उत्तम उदाहरण म्हणजे अनंत-तनयांच्या काव्य-रचनेच्या एकंदर स्वरूपांत चांगलें पहावयास सांपडतें. हृदयतरंगाच्या [१] ल्या भागावर अभिप्राय देतांना करमणुकींतील एका लेखकानें कांहीं अंशीं प्रच्छन्न

---

१ करमणूक ता. ११ नोव्हेंबर सन १९१५.

उपरोधिकपणानें असें म्हटलें होतें कीं, अनंत-तनयांची कविता अशी जुन्या थाटाची आहे कीं, तिला खुशाल वामन, मोरोपंत यांच्या काळच्या कवितेंत ढकलून द्यावी; परंतु माझ्यामतें, हें अनंत-तनयांच्या कवितेस दूषण नसून उलट खरोखर भूषणच आहे व तें अगदीं यथार्थ आहे. रचनेचा भरींवपणा, यमक-प्रासादिकांचा सहजौघी रम्यपणा, लौकिकोक्ति वगैरे विशिष्ट प्रकार इत्यादि बाबतींत अनंत-तनयांच्या आर्यांची धाटणी थेट हुबेहुब पंतांच्या आर्यांसारखी बेमालुम व दीर्घ व्यासंगानें येणाऱ्या तादात्म्यामुळें, सहेतुक अनुकरणरहित अशी आहे. त्याचप्रमाणें, प्रसंगानुसार विषयगांभीर्य, शब्दरचनेची प्रौढ सहजौघी उदात्त रम्यता, भावनेची आवेशयुक्त आर्तता व उत्कटता वगैरे गुण किंवा श्लोकांची ठाकठिक ठसकेदार व शब्दचमत्कृतियुक्त मांडणी या दोन्ही दृष्टीनें त्यांचे पृथ्वी, शिखरिणी वगैरे वृत्तांतील श्लोक खात्रीनें पंतांच्या (मोरोपंतांच्या) व पंडितवरांच्या श्लोकांची तादात्म्यरूपानें सुखद संस्मृति करून देतात—थोर जनांच्या तेजोज्योतीनें आपल्या ठिकाणीं तेजोज्योतीचा उदय झाल्यास, ती गोष्ट, एका दीपानें दुसरे अनेक दीप लागावेत—त्याप्रमाणें, दोघांपैकीं-कोणासच कमीपणाची नसून उलट तितक्या पटीनें सहृदय वाचकांचा आनंद वृद्धिंगत करणारी आहे. अशा थोर विभूतींच्या प्रचंड कृति-संग्रहाच्या परिचयानें दुसरा जो अमोल फायदा होतो तो हा कीं, 'कवि' ही पदवी प्राप्त होण्यास कसे अखंड व बहुसंख्याक प्रयत्न करावे लागतात याची जाणीव कवि होऊं पहाणाऱ्या मनुष्याच्या मनावर चांगली बिंबते व त्यांच्या ठिकाणीं अखंड काव्यरचनोत्साह, व कांहीं तरी अपूर्व महाकाव्यनिर्मितीची निदान संकल्परूप ईर्ष्या व तदनुसार यथाशक्ति प्रयत्न—या स्पृहणीय भावनांचा उदय होतो; आपल्या वाङ्मयाची सध्यां आहे त्यापेक्षां अधिक वेगानें प्रगति होण्यास हल्लींच्या वाङ्मयोपासकांत याच भावनांच्या प्रसाराची फार आवश्यकता आहे.

या सामान्य विवेचनाखेरीज, 'अनंत-तनय' यांच्या कवितेच्या स्वरूपा-विषयीं थोडक्यांत व स्थूलमानानें सांगावयाचें म्हणजे, काव्यविषयक जुनी परंपरा व तिच्यांतील उत्तमांशाविषयीं उत्कट आदर व अनुकरण भाव कायम राखून, शिवाय "आधुनिक" म्हणून समजल्या जाणाऱ्या काव्यरचना-पद्धतीचेंहि मर्म बरोबर जाणून व त्या प्रवृत्तीच्या ग्राह्यांशाशीं तादात्म्य पावून

प्रसंगानुसार दोन्ही प्रकारांपैकीं इष्ट त्या प्रकारची सहजमनोहर रचना करण्याचें अखंडोत्साहि सव्यसाची कौशल्य ज्यांच्यांत दिसून येतें असें जे कांहीं थोडे **सांप्रदायिक कवि** आमच्यांत सुदैवानें विद्यमान आहेत त्यांपैकीं अनंत-तनय हे एक प्रमुख आहेत. स्वाभाविक प्रतिभांशानें, संस्कृत, मराठी काव्य-वाङ्मयाच्या आस्थायुक्त परिशीलनरूपी पूर्व तयारीनें, आणि कर्तव्यबुद्धीनें चालविलेल्या दीर्घकालीन रचनाव्यासंगानें त्यांच्या कवितेंत प्रौढ असूनहि प्रासादिक शब्दरचना उदात्त विचारसरणी असूनहि सामान्य जनांस सुलभ अशी विचारप्रदर्शनाची शैली दिसून येते. शिवाय, आपल्या इकडील काव्यपरंपरेस अनुसरून प्रसंगोचित रसनिष्पत्ति करण्याचीहि त्यांच्या ठिकाणीं चांगली हतोटी दिसते. याचा एकच लहानसा पण चटकदार मासला म्हटला म्हणजे पृ. १११ वरील ' नवरसमंजरी ' ही कविता होय. तरी त्यांतल्यात्यांत वात्सल्य, हास्य व करुण यांच्या बाबतींत रा. आपटे यांचा हातखंडा आहे. किंबहुना कै. गु. व. हरिभाऊ आपटे, विद्यमान लेखक मित्र नारायण हरि आपटे ' आनंद ' कर्ते आपटे ' तरंग ' कर्ते आपटे या चौकडीचा करुणरसपर प्रसंग चित्रित करण्याच्या वेळीं दिसून येणारा लेखनशैलीचा उत्कर्ष पाहिला म्हणजे गुर्जर भक्त-शिरोमणि श्रीनरसी मेहता याला केदार रागाचें जसें वरदान होतें तद्वत् आपटे वंशीय लेखकांस करुणरस निष्पादनाचें वरदानच आहे कीं काय असें वाटतें ( तरंग ५ वा ' सांत्वन ', भिषग्वर अण्णासाहेब पटवर्धन ! ) ' तशांत जुन्या भक्तकवींच्या सांप्रदायास अनुसरून ' अनंत-तनयां ' च्या काव्यांत करुणरसाला आधार किंवा निमित्त भक्तीच्या उत्कट भावनेचें मिळालें म्हणजे त्या 'जिवाचें पाणी पाणी' करण्याच्या प्रसंगाविषयीं बोलणेंच नको !(तरंग ३ रा. 'वंचित शकुंतला ' ' वंजुलकुंज ' ' गलिताभिमानराधा. ' ) खऱ्या प्रेमळ आर्य कुटुंबीयास व गृहस्थाश्रमी संसारी जनास उचित असा वात्सल्य रस मला वाटतें, रा. अनंत-तनय यांच्या कवितेंत जसा उत्कट व स्वभावरम्य दिसतो तसा तो इतरत्र क्वचितच दिसतो; यासंबंधीं विशेष खुबी ही कीं, प्रत्यक्ष व्यवहारांतील नात्यांच्या—उ. पितापुत्र, मातापुत्र इ. बाबतींत तो जितका उत्कट व वस्त्वनु-कारी—वस्तुस्थितीचें चित्र उठविणारा ( Realistic ) दिसतो तितकाच तो मातृभूमि व स्वदेशभक्त यांच्यांतील रूपकात्मक नात्यांतहि तसाच उत्कट व

स्वाभिमानमनोहर दिसतो ( लोकमान्यांस भूमातेचा निरोप. पुण्यपुरीचा शिष्ट मंडळास निरोप. व या दोहोंपेक्षांहि अनुपम अशी " औक्षण " ही कविता ). हास्यरसहि तसाच कित्येक ठिकाणीं सहजौघी व फार मजेदार असतो. (विनोद लहरी; वरची वाट ).

विविध परिमाणांस एकच परिमाणाचें रूप देण्याचें गणितांत जसें उदाहरण असतें त्याप्रमाणें अनंत-तनयांच्या विविध विषयक कवितांचें स्वरूप एक-वृत्तीच्या परिमाणांत सांगणें झाल्यास, ' अनन्य प्रेम किंवा उत्कट प्रेमळ भक्ति' हा त्यांच्या कोणत्याहि कवितेचा केंद्रवर्ती बिंदु आहे असें म्हटल्यास चालेल. ही अनन्य प्रेमाची किंवा उत्कट प्रेमळ भक्तीची भावना ईश्वराविषयीं असली कीं त्यास ईश्वरनिष्ठा व धार्मिक श्रद्धेचें रूप प्राप्त होऊन अशा काव्यांत रचनागांभीर्य व वृत्तीची सनम्र आर्तता यांचा अत्यंत उज्ज्वल मनोहर आविष्कार झालेला दिसतो. प्रासंगिक प्रार्थना, निरनिराळ्या देवतांचीं स्तोत्रें व श्रीरामकृष्ण परमहंसांच्या वाक्सुधेच्या अनुषंगानें झालेला सुधास्यन्द हीं इतकीं सरस व भक्त्युत्कट प्रकरणें आहेत कीं, तीं स्तोत्रांदाखल किंवा जुन्या प्रासादिक संतांच्या नीतिपर पदांप्रमाणें मुखोद्गत करून त्यांचें आस्थायुक्त पठन अथवा गुंजन केल्यास त्यायोगानें कोणत्याहि सहृदय मनुष्यास खरोखर अपूर्व आल्हाद व समाधानशांति वाटल्यावांचून रहाणार नाहीं.सदरहू अनन्य प्रेमवृत्तीचें, आपला समाज, आपला पूर्वेतिहास, सद्यःकालीन थोर पुरुष, प्रिय मातृभूमि इ० गोष्टींकडे तोंड फिरलें कीं लागलीच त्या वृत्तीस स्वाभिमान, देशाभिमान, ऐतिहासिक परंपराभिमान, विभूतिपूजा इ० नांवें प्राप्त होतात. अनंत-तनयांची ही स्वाभिमानाची, ऐतिहासिक परंपराभिमानाची व विभूतिपूजेची वृत्ति अत्यंत उत्कट तेजस्वी व ओजस्वी आहे. ज्या आपल्याच समाजाविषयीं आपलें तादृश प्रेम नाहीं किंवा ज्या ऐतिहासिक परंपरेबद्दल आपल्याला फारसें प्रत्यक्ष ज्ञान नाहीं त्याबद्दल उगाच देशाभिमानाची व समाजोन्नतीची ' फॅशन ' म्हणून, एक तर संदिग्ध व क्षीणशक्ति शब्दांनीं अथवा दुसरें, अत्यंत आवेशी व तारतम्यरहित मोघम अतिशयोक्तींनीं व अलंकाररूपकादिकांच्या भपक्यानें देशाभिमानपर कविता करणें ही गोष्ट निराळी; व मनास तशी खरी भावना व

तळमळ रात्रंदिवस वाटणें, गतेतिहासांतील अनेक लहानमोठ्या काव्यपूर्ण व उदात्ततत्त्वप्रदर्शक गोष्टींची व व्यक्तींची स्वतः वाचनद्वारां माहिती मिळविणें व ती आपल्या विचारसरणींत पुरती मिसळून टाकणें, या गोष्टी निराळ्याः पाहिल्या नुसत्या देखाव्याच्या गोष्टींपेक्षां दुसऱ्याच गोष्टीस खरे लोक मनःपूर्वक मान देतात ! " दुसरा बाजीराव " याचे उद्गार किंवा " तक्त फोडतांना " या कवितांत, काव्याचें एक मुख्य अंग जें काव्यानुकूल विषयसंदर्शन त्याचा फार रम्योदात्त आविष्कार झालेला दिसतो. या दृष्टीनें पहातां ऐतिहासिक विषयांसंबंधाच्या अनंत-तनय यांच्या कविता फार कळकळीच्या, समयोचित, साध्या, आवेशपूर्ण व विचारसंप्रेरक अशा आहेत यांत तिळमात्र संशय नाहीं. अनन्य प्रेमाचें, केवळ पत्नीविषयीं प्रदर्शन झालें कीं त्यास दांपत्यप्रेमाचें आणि इतर कुटुंबीय आप्तेष्टांच्या संबंधीं ती वृत्ति व्यक्त झाली कीं, त्यास वात्सल्याचें स्वरूप निसर्गतःच प्राप्त होतें.

कवीनें आपल्या काव्यसंग्रहास ' हृदयतरंग ' हें नांव दिलें आहे तें फार समर्पक व अन्वर्थक आहे. कारण, त्यांतील कवितांत तरंगांच्या आकाराची व स्वरूपाची विविधता व लहान मोठेपणा आणि केवळ प्रसंगानुसार व लीलामात्रेंकरून त्या कवितांची उत्पत्ति व समाप्ति या दोन गोष्टींचें चांगलें दिग्दर्शन झालें असून शिवाय, तरंगांस आधारभूत जसा एखादा जलाशय विशाल, शांत व प्रसन्न असावा, तसेंच कवींचेंहि हृदयरूपी सरोवर विशाल शांत, व प्रसन्नमनोहर असल्याचें सूचित होतें तेंहि योग्यच आहे. कांहीं ठिकाणीं मोठ्या भव्य कल्पना सहज लीलेनें व मनोहर अर्थोद्दीपन करतील अशा रीतीनें येऊन गेल्या आहेत. ( " सांत्वनां " तील पृ. ९८ क. ६ व्या मधील सांत्वनपर युक्तिवाद, चित्रमयजगत्, विश्वोद्यान इ. ) कवीचा तेजस्वी परंतु विनयशील स्वाभिमानहि एकदोन कवितांत चांगला व्यक्त झाला आहे. ( " पांढऱ्यावर काळें " विकल्पपरिहार " ' मनाची ग्वाहीं ' ).

भाषावैभव व काव्याचा सहजौघी रम्योदात्त प्रवाह विशेषतः ईश्वरप्रार्थनापर पद्यांत किंवा देवताविषयक स्तोत्रांत चांगला साधलेला दृष्टीस पडतो ( पृ. ४२ श्लो. ८ )

मार्मिक वर्णनशैलीचे नमुने:— पृ. ७ स्वानंद-साम्राज्यनगरी. (श्लोक ७) "वरची वाट" यांतील मुंबईतील रस्त्याचें वर्णन. पृ. ५० वरील श्लो. ३-८ मधील विविधवेषांचें वर्णन.

मार्मिक उपदेशपर व अवतरणसदृश ओळी:—

। बाह्यीं वेष कसाहि घ्या परि असा हो हिंदवी आंतुनीं ॥ पृ.५० श्लो. ८
। भाषा लक्ष शिका परी सतत द्या लक्ष स्वभाषेकडे । पृ. ५१ श्लो. १३

काव्यानुकूल व अर्थद्योतक शब्द:—"ध्वनिमंजूषा" (बाजाची पेटी). कौतुकास्पद गोष्ट ही कीं, इतकें वर्षांचा अखंड काव्यव्यासंग असून, काव्य-रचनेंत कोणत्याहि प्रकारें शिथिलता, श्रांति अथवा रसापकर्षता यांचा यत्किंचित् संपर्क दिसत नाहीं इतकेंच नव्हे, तर यक्षाच्या अलकानगरींतील सदायौवन विलासिनीप्रमाणें रा. आपटे यांची काव्यकामिनी पहिल्यापासून आहे तशीच अजरोत्साही व धीरगंभीरवृत्तीची आहे. श्री परमेश्वरकृपेनें ती दीर्घकालपर्यंत तशीच राहो हीच सर्व रसिकांची आशा व प्रार्थना !

पुष्पाच्या बहराचे एकामागून एक कितीही वेंचे तोडले तरी प्रत्येक मागच्या वेंच्याचे वेळीं पुष्पाच्या मृदु कोमल स्वरूपांत, विविधरंगयुक्त नयनमनोहारित्वांत किंवा मधुर सुगंधित्वांत यत्किंचित् न्यूनता येत नाहीं. हाच प्रकार रा. अनंत-तनय यांच्या काव्यकुसुमांसंबंधींहि दिसून येतो; किंवा, त्यांनींच ठेवलेल्या रूपकाच्या अनुरोधानें म्हणावयाचें म्हणजे, तरंगांच्या लहानमोठ्या आकारावर तरंगाचें खरें अस्तित्व मुळींच अवलंबून नसून तरंगांचें अनंतजन्मत्व हीं अनंतच आहे ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे.

तरंगांच्या अनंतत्वाच्या बरोबरीचा दुसरा महत्वाचा मुद्दा म्हटला म्हणजे विषयांच्या विविधत्वानुरूप त्यांस प्राप्त झालेलें मनोहर वैचित्र्य हा होय. कारण एकाच जलाशयाच्या आधारावर उठणारे तरंग या दृष्टीनें जरी सर्व तरंगांचें परस्पर साम्य असलें तरी, निरनिराळ्या तरंगांच्या उत्थानास निमित्तमात्र होणारे विशिष्ट प्रसंग किंवा विषय यांच्या दृष्टीनें विचार केला असतां प्रत्येक तरंगांत आपआपल्यापरी, मनोहर कल्पना, उदात्त ध्येय किंवा मार्मिक व ओजस्वी विचारसरणी इत्यादि गोष्टींसंबंधीं कांहीं तरी वैशिष्ट्य असून तरंगांच्या

संकलित स्वरूपामुळें एकंदर रचनेस एक प्रकारचें अपूर्व व सुखद रम्यत्व आलें आहे, ही गोष्ट कोणाहि रसिक वाचकाच्या सहज ध्यानांत येईल अशी आमची खात्री आहे. 'तरंगां 'चें पहिलें पुस्तक सर्वसामान्य व विविध विषयक काव्य स्वरूपाचें आहे. परंतु प्रस्तुत पुस्तक विशेषेंकरून भूतकालीन किंवा सद्य:कालीन कित्येक रोमहर्षण प्रसंग यांचीं उदात्त वर्णनें, थोर विभूतींचें गौरवयुक्त यशोगान इ० द्वारां स्वाभिमानपोषक, भक्तिसंवर्धक आणि देशकालानुरूप उदात्त पौरुषपर व ऐतिहासिकपरंपरेचें संजीवन करूं पाहाणाऱ्या काव्यकृतींनीं भरलेला आहे, ही गोष्ट, ऐतिहासिक परंपरेच्या दृष्टीनें आणि सद्य:कालीन सर्वव्यापी नवचैतन्याच्या प्रभावानें आपल्या समाजाशीं तादात्म्यरूप एकजीव असणाऱ्या सत्कवीच्या मनावर बाह्य परिस्थितीचा परिणाम आपातत: किती प्रबळ होतो याची उत्तम निदर्शक आहे.

' अनंततनयां 'च्या पुस्तकाच्या साभिप्राय नांवावरून, कवि व त्याची कविता यावद्दलच्या एका वादग्रस्त मुद्द्याचाहि ध्वन्यर्थानें चांगला खुलासा होण्यासारखा आहे. तो मुद्दा म्हटला म्हणजे, कवीच्या मनाचा व त्याच्या शीलाचा परिणाम त्याच्या काव्यांत कितपत प्रतिबिंबित झालेला असतो, व त्याच्या कवितेचा विचार करतांना, या दोन गोष्टींस कितपत महत्त्व देणें युक्त व न्याय्य आहे—याबद्दलचा होय. ' हृदयतरंग ' या नांवावरून कवीच्या कृतींचा—त्याच्या सर्व काव्याचा उगम त्याच्या हृदयापासूनच होतो, म्हणजे हृदयांत वेळोवेळीं उत्कट रीतीनें उद्रेक अथवा उत्थान पावणाऱ्या विचारांचें व विकारांचें यथार्थ रीतीनें केलेलें आविष्करण म्हणजेच खरें काव्य, हें तत्त्व सूचित होतें. तसेंच, ' तरंग ' या शब्दावरून कोणत्याहि काव्याचें स्वरूप मुख्यत: रम्य आभासमयच असावें हें तत्त्व जरी ध्वनित होत असलें तरी, तो आभास हृदयाच्या अधिष्ठानावर व त्याच्या अनुरोधानेंच उत्थान पावला पाहिजे हेंहि तत्त्व त्याच्याच बरोबर सूचित होतें.

श्रीमच्छंकराचार्यांच्या सुप्रसिद्ध श्री **विष्णुषट्पदी** स्तोत्रांतील ' सामुद्रोहि तरंग:, क्वचन समुद्रो न तारंग: " या एका चरणांत हाच सिद्धान्त फार मार्मिक व मनोहर रीतीनें ग्रथित केला आहे. तरंग हाच

समुद्राधीन–समुद्राचा विकाररूप—आहे; समुद्र हा केव्हांहि तरंगाधीन–तरंगाचा विकार–होऊं शकत नाहीं. हाच न्याय प्रस्तुत बाबतींत लागू केला असतां, असें साहजिकच निष्पन्न होतें कीं, काव्यांतील तरंग रम्य खरे पण केवळ आभासरूप असले तरी ते समुद्राच्या अधिष्ठानावर उत्थान पावतात या एका गोष्टीवरूनच अफाट व खोल सागराच्या यथार्थ स्वरूपाची कल्पना बांधण्याचा प्रयत्न केला तर तो कधींहि समंजस व सफल होणार नाहीं. उलट पक्षीं जर कविहृदयरूपी समुद्र व्यावहारिक सागराप्रमाणें सर्व परिचित व उत्तान स्वरूपाचा असेल तरच त्याच्या विशालतेचें व गाभीर्याचें प्रतिबिंब त्याच्या तरंगांत पडल्यावांचून रहावयाचें नाहीं आणि सकृद्दर्शनीं मनुष्यास जरी आपण तरंगलीला पहात आहों असें वाटलें तरी, थोड्याशा विचारा अंतीं, सागराच्या अधिष्ठानावरच आपण तरंगलीला पहात अहों या गोष्टीचें भान त्यास झाल्यावांचून रहात नाहीं. म्हणून, कोणत्या हि कवीच्या प्रत्येक कृतींत त्याच्या व्यक्तिगत विचारविकारांचें किंवा चारित्र्यशीलाचें प्रतिबिंब पडतेंच असें नाहीं, किंवा प्रत्येक कृतीचा विचार करितांना, कविसंबंधाच्या वरील खाजगत गोष्टींचा विचार केलाच पाहिजे असेंहि नाहीं. ही गोष्ट जरी खरी असली, तथापि, एखाद्या कवीच्या एकंदर काव्यशैलीचा विचार करूं लागल्यास कित्येक वेळां त्या शैलीचा खरा उलगडा होण्यास किंवा खरें स्वारस्य समजण्यास कवीच्या खाजगी व्यक्ति या नात्यानें असणाऱ्या साधारण वर्तनाची माहिती असणें; किंवा त्याच्या व्यक्तिगतवर्तनाची आपली आपल्या मनाशींच कां होईना–मीमांसा करणें या दोन साधनांची फार मदत होते. सारांश, कवीचें शील व चारित्र्य आणि त्याचें काव्य यांचा निकट संबंध आहे. फक्त, काव्यांतील आभासरूप व कल्पनामय भागाशीं जरी या दोन गोष्टींचा तादृश संबंध येत नसला तरी कवीच्या एकंदर काव्य–शैलीवर–अर्थात् त्यांतील विकाराविष्करणावर आणि विचारसरणीवर–त्याच्या व्यक्तिगत गोष्टींचा फार सूक्ष्म पण गूढ परिणाम होतोच होतो; व कोण्याहि कवीची यथार्थ योग्यता व्यापकरूपानें अजमावितांना, त्याचें खाजगी चारित्र्य व शील या दोन्ही गोष्टी विचारांत अवश्य घेण्यासारख्या आहेत व अवश्य विचारांत घेतल्याच पाहिजेत याविषयीं कोणाहि, विशिष्ट पक्षाकडे अभिनिवेश नसणाऱ्या विचारी मनुष्यास

फारसें कोडें पडणार नाहीं. मग अशा निःस्पृह मीमांसेच्या अंतीं, निर्णय कांहींहि ठरो !

येथवर " कवि व कविता " या विषयासंबंधीं माझ्या मतें जे महत्त्वाचे मुद्दे वाटले त्यांचें यथामति विवेचन केलें आहे. हें विवेचन ' प्रस्तावने ' च्या रूपानें सादर करण्यास मी जो प्रवृत्त झालों तो या विषयासंबंधीं माझा विशेष अधिकार आहे अशा जाणिवेनें मुळींच प्रवृत्त झालों नसून, केवळ, ' अनंत-तनया ' सारख्या अकृत्रिम प्रेमळ व सन्मान्य सत्कविमित्रांनीं, त्यांच्या ' तरंगां ' च्या दुसऱ्या भागास मी प्रस्तावना लिहावी अशी जी उत्कट इच्छा प्रदर्शित केली तीच कर्तव्यरूप आज्ञा समजून मी " प्रस्तावना " लिहिण्याचें कबूल केलें. वाळ्याच्या पंख्यास लाल भडक रंगाची व सफाईदार कांतीव कामाची लहान मोठी दांडी बसविली व नुसत्या अलवाणाची किंवा चित्रविचित्र रंगांच्या कपड्याची झालरहि त्याला लाविली तरी, त्यामुळें वाळ्याच्या स्वभावसिद्ध सौम्यशीतल मधुर सुगंधांत अधिक भर पडते असें नाहीं किंवा मृदु सुखद पवनलहरी उत्पन्न करून लोकांचा शारीरिक व मानसिक-ताप परिहार करण्याची त्याची नैसर्गिक शक्तिहि दांडी व झालरीच्या योगानें विशेष वृद्धिंगत होते असेंहि नाहीं. तथापि, लौकिक व्यवहारासाठीं वाळ्याच्या पंख्यास विशेष प्रकारची दांडी व झालर यांची जोड देण्यांत येते. हाच न्याय एखादा स्वभावसिद्ध प्रतिभाशाली लेखक अथवा कवि आणि त्याच्या रचनेस गौरवार्थ दुसऱ्यानें लिहिलेली प्रस्तावना यांच्या संबंधीं लागू पडतो असें मला वाटतें.

अनेक प्रकारची व्यग्रता आणि सामान्यजनसुलभ दीर्घसूत्रीपणा या दोन भरती ओहोटीसारख्या-प्रवृत्तींच्या ओढाताणीच्या तडाक्यांत हेलकावे खात खात ही प्रस्तावनारूपी नौका एकदांची, समाप्तिरूपी वेळा ( वेला-किनाऱ्यावरील वृक्षराजी ) गांठीत आहे; आणि बरेच दिवसांपासून सन्मित्रास दिलेल्या वचनाचे पूर्तीरूप पुण्यक्षेत्रावरून येणारा समाधानाचा शीतल वारा मनःस्थलीचा ठाव काढून अंतःकरणांत जाऊन भिडत असल्यामुळें अपूर्व आल्हाद होत आहे; व त्या बरोबरच, प्राणाधिष्ठित ईश्वरचरणीं कृतज्ञतायुक्त स्मरणरूपी सेवा आपोआप समर्पण होत आहे ! हा अपूर्व सोहळा एखादा सत्कविच आपल्या स्वानु-

भक्तपूर्ण काव्यवाणीनें यथार्थरीतीनें वर्णन करण्यास समर्थ होईल! इतरांनीं नुसता मनांतील मुकाच आस्वाद घेत घेत आपल्याशीं, अस्फुट म्हणून अतृप्त वृत्तीनें चुटपुटत बसावें, किंवा गद्यरूपी पंगु चालीनें वर्णन करण्याची धडपड करावी. याशिवाय दुसरा इलाजच नाहीं!! शेवटीं, श्रीपरमेश्वरकृपेनें कविमित्र रा. "अनंत-तनय" यांचा काव्य-व्यासंग दीर्घकालपर्यंत अखंड चालू राहो व त्यांच्या विशुद्ध काव्यप्रतिभामय "हृदय" सागरांतील अनेक सुखद शीतल "तरंग" महाराष्ट्रवाचकांचें मनोविनोदन व मनःशिक्षणरूपी मंगल व मानास्पद कार्य सदा नवोत्साहानें करीत राहोत अशी मनःपूर्वक इच्छा प्रदर्शित करून, सत्कविमुकुटमणी श्रीज्ञानेश्वरांच्या मंगलमय 'पसायदाना' च्या सुप्रसिद्ध व सदातेजस्वी उक्तीच्या सिद्धिदायक अवतरणानें ही प्रस्तावना पुरी करितों.

> दुरिताचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो॥
> जो जें वांच्छील तो तें लाहो। प्राणिजात॥ ३॥

परतवाडा, (कँप एलिचपूर)
शुक्रवार, चैत्र वद्य ६ ष्ठी.
शके १८४२. ९-४-२०

श्रीकृष्ण निळकंठ चापेकर.

---



# हृदयनिवेदन.



हृदयतरंगाचें पहिलें पुस्तक महाराष्ट्राला सादर करून आज उणीं पुरीं साडेचार वर्षे झालीं. प्रथम पुस्तकाचें महाराष्ट्रानें आपल्या ऐपतीप्रमाणें कोड-कौतुक केलेलें पाहून लेखकास हें दुसरें पुस्तक आज—श्रीशिवजयन्तीच्या मंगल-दायक दिवशीं—त्याचे चरणीं सादर करावयास कौतुक वाटणें अस्वाभाविक नाहीं. काव्याबद्दल त्यास काय अल्पस्वल्प विवेचन करावयाचें होतें तें त्यानें पहिल्या पुस्तकांतच केलें आहे; तेव्हां आतां या पुस्तकाचा विशेष काय आहे हें सांगणें हेंच आजचें निवेदनकार्य आहे.

या पुस्तकांत एकंदर ७१ शब्दचित्रांचा समावेश केलेला असून त्यांचीं पूर्वी-प्रमाणेंच सात मंडलें केलीं आहेत व त्यांस 'तरंग' हीच संज्ञा दिली आहे. 'ऐतिहासिक,' व 'प्रासंगिक असे दोन नवीन तरंग या पुस्तकांत घातले आहेत'

प्रस्तुत पुस्तकांतील दुसरी निर्देश्य गोष्ट म्हणजे त्यास रसिकवर रा. रा. श्रीकृष्ण निळकंठ चापेकर एम. ए. एल एल. बी. हायकोर्ट वकील एलीचपूर यांनीं लिहिलेली विद्वत्ताप्रचुर, सुंदर व मार्मिक प्रस्तावना ही होय. श्रीकृष्णांनीं आपला अमोल वेळ खर्चून प्रस्तुत पुस्तकास मार्मिक प्रस्तावनेची जोड दिली त्याबद्दल हा जन त्यांचा अत्यंत आभारी आहे.

असो. प्रस्तुत पुस्तकासंबंधानें लेखकास याहून जास्त सांगतां येण्यासारखें कांहींच नाहीं व यदा कदाचित् असलें तरी तसें करणें त्याच्या अधिकाराबाहेरचें आहे.

ज्यांनीं आपल्याला यथाशक्ति साहाय्य केलें त्यांचे आभार मानतांना उपकृत मनुष्याला केव्हांहि आनंदच वाटणार. इतर मंडळींना हा आभारप्रदर्शनाचा विधि औपचारिक वाटतो; पण त्याचें खरें रहस्य उपकारी व उपकृत यांसच ठाऊक, इतरांना तें अनुभाव्य नाहीं. श्रीमंत गंगाधरराव रघुनाथराव गंभीर-राव ऊर्फ अण्णासाहेब देशमूख सर कानगो मु० सावर्दे यांनीं त्यांस हा ग्रंथ अर्पण करण्याची परवानगी दिली व ग्रंथप्रकाशनाचे कामीं आर्थिक साहाय्य केलें, याबद्दल लेखक श्रीमंतांचा अत्यंत ऋणी आहे.

प्रस्तुत पुस्तकांतील पाठभेद कायम करण्याचे कामीं व व्याकरणदोष टाळण्याचे कामीं लेखकाचे परमस्नेही सुप्रसिद्ध धार्मिक लेखक रा. रा. कृष्णाजी गोविंद किनरे, एकनाथ पांडुरंग रेंदाळकर व माधव गोविंद भिडे यांनीं, आणि पद्यांतील तालसुरासंबंधाचे दोष काढून टाकण्याचे कामीं कवि गिरीश व अरविंद यांनीं लेखकास जें साहाय्य केलें त्याबद्दल तो त्यांचाहि ऋणी आहे.

शेवटीं ज्या हृदयस्थ जनार्दनानें, परममंगल परमात्म्यानें प्रस्तुत पुस्तकांतील शब्दचित्रें काढविलीं, त्याला अनन्यभावें शतशः प्रणाम करून व श्रीज्ञानेश्वरांच्याच शब्दांनीं त्याजपाशीं खालील वरदान मागून सदर निवेदन आटोपतों.

> आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ॥
> तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥१॥
> जें खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं रति वाढो ॥
> भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥२॥
> दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ॥
> जो जें वांच्छील तो तें लाहो । प्राणिजात ॥३॥
> वर्षत सकल मंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ॥
> अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥४॥

११३, बुधवार पेठ, पुणें. सर्वांचा कृपाभिलाषी,
श्रीशिवजयन्ती शके १८४२ अनंततनय.

---



# अनुक्रमणिका.



# चित्रांची सूची.





# अर्पणपत्रिका.

श्रीमंत सरदार धैर्यौदार्यचूडामणि गंगाधरराव रघुनाथराव ऊर्फ आण्णासाहेब गंभीररावसाहेब देशमुख, देशपांडे, सर कानगो, सावदें, पूर्व खानदेश.



## आर्या ( गीति. )

रिक्तकरें श्रेष्ठांचें दर्शन केव्हांहि आर्यमान्य नसे,<br>
ज्ञानयुगोचित म्हणुनी नव पुस्तक अर्पिं हें उपायनसें  १<br>
गंगाधरा ! धरीं ही कुतुकें स्वशिरीं मदीय हृद्गंगा,<br>
मान्यवरा ! रसिकवरा ! सुखवुत तव तत्तरंग सर्वांगा.  २

# हृदयतरंग.

## पुस्तक २ रें

### तरंग १ ला.

### १. श्रीमंगलमूर्तीस याचना.

श्लोक [ वृत्त पृथ्वी ]

' गणाधिप गणेश ' या श्रवणचित्तसंमोहिनी ।
अनंत बिरुदावली तव विभो ! यशोदायिनी ॥
कितीक परि सार्थ गा ! असति त्यांतल्या आजला ।
विचार तव तूंच हा करिं दयानिधे ! मंगला ! ॥ १ ॥
समग्र जनता दिसे त्रुटित आजि या भारतीं ।
विमा रतिहि ना मुखीं खचित भारता भार ती ॥
वि-नायक विनायका ! स्वयमपीच जो तो जरी
कशास मग ईशता अधिपता तुझी ती तरी ? ॥ २ ॥
मतैक्य तिळही नसे गलबला भला जाहला ।
भरी शुनिच पाठि जों दळण तें दळी आंधळा ॥
कुणा न कुणिही धनी, कुणि कुणा नसे सेवक ।
तिघांत सतरा मतें वचन हें नसें भ्रामक ॥ ३ ॥
अनंत तव सांत हें उदर जाहलें काय कीं ।
सुतीक्ष्ण तव दृष्टि ही स्तिमित हो तयें काय कीं ॥
लुळे तव तसे चतुष्करहि जाहले काय कीं ।
प्रचंड तव शुंडिका विकल जाहली काय कीं ॥ ४ ॥

त्वदीय परशूमधें तिखटता नुरे काय कीं ।
तसा सुदृढ पाशही तव तुटे अजी काय कीं ॥
त्वदंकुश अमोघ तो परि असा कसा बोथटे ? ।
न मोद तव मोदकीं तव विनायकी कीं घटे ! ॥ ५ ॥
मुळींच जरि काळजी तुज तुझ्या गणांची नसे ।
गणेशपण तें तरी तव विभो ! टिकावें कसें ? ॥
स्वधर्म जनका जरी तिळभरी न सांभाळवें ।
सुतींच सुतधर्म ते तरि कशा धराया हवे ? ॥ ६ ॥
तुझे न गण चांगले तरि तुझा न का दोष तो ? ।
अलक्ष्य तव त्यांवरी तव न धाक त्या वाटतो ॥
अझूनि तरि ऊठ बा ! झडझडोनि वेगें महा ।
धरीं स्वकरिं आयुधें मजसि एक हीच स्पृहा ॥ ७ ॥
महा भरतहस्ति हा निजशिरासवें घे झटे ।
मिळे न जरि खावया मदभरें तरी आरटे ॥
द्विधा अहह ! जाहलें बघ फुटोनि गंडस्थल ।
चमत्कृति न काय कीं जरि बलिष्ठ तो निर्बल ? ॥ ८ ॥
तदीय शिरिं हे प्रभो ! । निजकरस्थ या अंकुशें ।
प्रहार करिं कीं असा झणिं जिरेल त्याचें पिसें ॥
विघातक समग्र हीं मतमतांतरें सोडुनी ।
स्वरक्षण करील तो नत तुझ्या पदीं होउनी ॥ ९ ॥

---

## २. श्रीशारदावंदन.[1]

पद ( चालः—किती तरी पहाटेची. )

जयोऽस्तु ते विधिदुहिते ! कल्पलते !
सकलविबुधसंस्तुते ! ॥ ध्रु० ॥

श्रुतिमंगल मधुर मधुर । दिव्य तुझा वीणास्वर ।
खडबडवी जगदंतर । सुकविवृंदपूजिते ॥ जयो० ॥ १ ॥
परिसितांचि वीणारव । हृदय वरी मूकभाव ।
जाय लया सकल गर्व । भक्तभृंगगुंजिते ! ॥ जयो० ॥ २ ॥

---

[1] हें पद मुंबईस भरलेल्या साहित्यसंमेलनाचे वेळीं म्हणण्याकरितां पाठविलें होतें.

मोहनिशा ती उडुनी । ज्ञान-उषा ती फुटुनी ।
चित्ताची गांठ सुटुनि । प्रेम हृदयीं दाटतें ॥ जयो० ३ ॥
प्रेमभरें जें फुललें—। हृदयकंज; भक्तिबलें—
तेंच तुला अर्पियलें । भरतभुवनभूषिते ! ॥ जयो० ४ ॥

---

## ३. श्रीगोविन्दाष्टक.

संस्थान इचलकरंजी येथें सरकारी वाडयाला अगदीं लागून असें एक प्राचीन देवालय आहे. त्यांत काळ्या दगडाची एक कालियामर्दनाची सुंदर मूर्ति आहे मंदिरांतील अधिष्ठित मूर्ति जरी कालियामर्दनाचीच आहे तरी पुरातन कालापासून उपरिनिर्दिष्ट मंदिर 'श्रीविष्णूचें देवालय' म्हणून प्रसिद्ध आहे.

संस्थानचे मूळपुरुष नारो महादेव यांची स्नुषा—पहिले पेशवे श्रीमंत बाळाजी विश्वनाथ यांची कन्या—अनूबाईसाहेब यांनी हें श्रीविष्णुमंदिर बांधिलें. या बाई इतिहासप्रसिद्ध व्यंकटराऊ नारायण यांच्या पत्नी होत. व्यंकटराऊ हे नारो महादेव यांना त्यांच्या उतारवयांत 'गिरी' येथील 'श्रीव्यंकटेशा'च्या प्रसादानें झाले अशी आख्यायिका आहे. व तेव्हांपासून ' श्रीव्यंकटेशा ' ला इचलकरंजी संस्थानचे संस्थानिक आपलें कुलदैवत मानितात. व्यंकटेशाला 'गोविंद' या नांवानेंहि भक्तजन संबोधितात. सदहू विष्णुमंदिर सरकारी वाड्या-लगत किल्ल्यांतच असल्यानें श्रीविष्णूच्या दर्शनास नित्य नियमानें जाण्याचा खासे मंडळींचा सांप्रदाय आहे. तेव्हां त्या समयीं म्हणण्यारितां म्हणून प्रस्तुत 'श्री-गोविंदाष्टक ' श्रीमंत नारायणराव बाबासाहेब घोरपडे संस्थानाधिपति यांच्या आज्ञेवरून यथामति रचिलें आहे.

श्लोक ( वृत्त शिखरिणी. )

प्रभो ! विश्वोत्पत्तिस्थितिलयनिदाना सुवदना !
सदा सन्तत्राणा दनुजदलना शेषशयना !
नमो जिष्णो विष्णो भुवनविजयिष्णो स्तुतपदा !
नमो श्रीगोविन्दा परमसुखकन्दा तुज सदा. १
नतोद्धाराचें जें व्रत दृढ तुझें पुण्यपुरुषा !
तया पाळायातें कधिं न चुकशी पावनयशा !

अजन्मा तूं साक्षात् तरिहि धरिले जन्म कितिदां,
नमो श्रीगोविन्दा परमसुखकन्दा तुज सदा. २
बकी वृन्दारण्यीं सविष पय जों पाजुनि तुला,
वधायातें आली, सहज वधुनी तोंचि तिजला—
तुवां वृन्दा केली विगतभय बा गोपसुहृदा !
नमो श्रीगोविन्दा परमसुखकन्दा तुज सदा. ३
वृथा मायामोहें सगरल पयःपान करवी,
अहंता ही माझा मजकडुनिया घात घडवी;
तिला मर्दायातें मजसि बल दे भक्तवर-दा !
नमो श्रीगोविन्दा परमसुखकन्दा तुज सदा. ४
वधोनी कालीया अनुपमबला ! त्वां निजबलें,
त्वरें केलीं प्रेमें अभय सगळीं गोकुलकुलें;
तशी केली पुण्या भयद यमुना पुण्यजलदा,
नमो श्रीगोविन्दा परमसुखकन्दा तुज सदा. ५
वसे क्रोधाही जों मम हृदिं तया मर्दिं सदया !
कृपें मातें रक्षीं विभय यदुराया करुनिया;
मती माझी साध्वीसम करिं विभो त्वत्पदरता,
नमो श्रीगोविन्दा परमसुखकन्दा तुज सदा. ६
श्रुता गीता आख्या मम कुलपति ' व्यंकट ' इति,
अनू नाम्नी माता भटनृपसुता विश्रुत सती;
तुझें केलें त्यांहीं निजनिकटिं संस्थापन मुदा,
नमो श्रीगोविन्दा परमसुखकन्दा तुज सदा. ७
प्रभो ! येतां जातां मुखकमल तें शान्तिनिलया !
दिसोनी व्हावें कीं शुभद तव तें दर्शन तयां;
तसें पुत्रां पौत्रां स्वजननिवहां आप्तसुहृदां.
नमो श्रीगोविन्दा परमसुखकन्दा तुज सदा. ८

( वसंततिलका )

केलें जसें विहित जें हित तें तयांचें,
त्यांच्या प्रजेसहि मिळो सुख तेंवि साचें;
श्रीव्यंकटेश तुझिया कृपया मला हें,
दे एक नित्य, सदया ! मन हेंचि लाहे. ९

## ४. तें मुख

अभंग

सुंदर तें मुख ज्यांत ब्रह्मगोळ । दाविला तेजाळ यशोदेसी. १
सुंदर तें मुख वणवा गिळून । करी वृंदावन निर्भय जें. २
सुंदर तें मुख वेणु वाजवोनी । घेई जें मोहोनी गोपगोपी. ३
सुंदर तें मुख भक्षी नवनीत । दावी नव नीत गोकुळीं जें. ४
सुंदर तें मुख सांगुनीया गूज । पुरवितें चोज राधेचें जें. ५
सुंदर तें मुख निववी राधेसी । हरी स्मितहासीं तान्हभूक. ६
सुंदर तें मुख करी जें निवाडे । कर्माकर्म गाढें उकलोनी. ७
सुंदर तें मुख व्यामूढ विजया । लावी उचलाया शरचापें. ८
सुंदर तें मुख दावीं एक वार । पाहूं डोळेभर देई मशीं. ९
नलगे दातारा मजसी आणीक । नव्हे हें अलीक बोलणें की. १०

---

## ५. हृदयवांच्छित.

श्लोक ( वृत्त स्रग्धरा )

संकेतें भ्रूविभंगें करुनि गुज तुवां मोहिलें राधिकेला,
कालिंदीचे पुलिंदीं अभिनव विपिनीं गोकुळीं रास केला;
योगींद्रा एक वेळा कुटिल नयन ते नाचवीं हे मुरारी,
तेणें कीं वृत्ति माझी तुजसह रमुनी पूर्ण येईल यारीं. १
' नाहीं मी खात माती वदुनि मज पुन्हां भक्षिली काय माती;
पाहूं पाहूं गुलामा उघड मुख तुझें, पाहुं त्या काय हातीं ?'
शापी जेव्हां यशोदा उघडुनि मुख तूं दाविला विश्वगोळ,
दावीं दावीं दयाळा, अर्पित मुख तुझें पाहुं दे एक वेळ. २
' प्रल्हादाचे ध्रुवाचे करुण विलपनीं जें दिलें कर्णगात्र,
ऐकाया दीनबंधो, बघुं तरि मज तें काय झालें अपात्र ? '
या कृष्णावक्रवाणीप्रतिहि हरि दिला प्रेमकारुण्यकर्ण.
देवोनीयां दयाळा श्रवण सुभग तो या करावें वितृष्ण ! ३
दोर्दंडें दंडुनी ज्या भुजमद हरिला कंसचाणूर यांचा,
किंवा आलिंगनानें सकल पुरविला हेतु गोपांगनांचा,

---

१ अवास्तव. २. द्रौपदी.

स्नेहासाठीं नखाग्रीं विजयहय तुवां खाजवीले दयाळा !
त्या हस्तांनीं कधां भो ! कवळुनि हृदयीं बोलशी शब्द ' बाळा '. ४
प्रेमें ज्या सांठवीला अकरुण हृदयीं भाव त्या भीमकीचा,
लत्ताघात प्रकर्षें प्रकटितहि जिथें साहिला त्या भृगूचा;
आली जन्मा जिथोनी भुवनविजयिनी ग्रंथरत्नाख्यगीता,
लाभो विश्रांति यातें हृदयकुहरिं त्या होउं गीता अधीता. ५
ब्रह्मांडांचा पिता या कमलभव विधि ब्रह्मविद्ब्रह्मधाम,
नाभीपासोनि पावे जनु हरि तव ज्या पद्मपिंडीं प्रकाम;
ओंकाराचा जिथोनी अनुहत रव तो चालतो देवराया,
मूलाधार प्रभो तें अभिनव पद कीं पाहुं दे लेंकरा या. ६
पादांगुष्ठांमधोनी कलिमलहरिणी पावली जन्म गंगा,
केली ज्या पूत तैशी पदकमलरजें गौतमाची शुभांगा;
पाताळीं पावलें ज्या बलिस दडपिलें दाउनी विक्रमातें,
देईं देईं दयाळा स्वपदिं सुगति त्या दीन या बालकातें. ७
श्रीकृष्णा, सावळी ती अभिनव मधुरा साजिरी रम्य मूर्ती,
केली त्वां दाखवोनी जननसमयिं कीं देवकीहेतुपूर्ती;
भीतिग्रस्ता सख्या जें कुरुरणभुवि वा दाउनी शांत केलें,
दावोनी एक वेळा निववि निववि हें चित्त माझें भुकेलें. ८

मंदाक्रांता.

हास्यानें ज्या मुकुलित कळी राधिकेची फुलावी,
दुष्टोद्दामा हृदयकलिका उन्मळोनी गळावी;
साधूंचें वा मन विकसुनी वृत्ति सोल्हास व्हावी,
विश्वा मोही विविधपरि जें हास्य तें यास दावीं. ९

---

## ६. दावीं मला मार्ग तो !

### श्लोक ( शार्दूलविक्रीडित )

जेणें जीवित धन्य होय मम हें दावीं असा मार्ग तो,
देवा; यापरतें न अन्य तुजला कांहींच मी मागतों;
जातां त्या पथिं संकटें कितिकही येवोत चिंता नसे,
त्यांच्याशीं झगडावया तव दयें सामर्थ्य मातें असे. १
माझी शक्ति अमोघ ती न सहसा होईल कीं निष्फला,

कीं कर्णापरि न त्यजील समरीं ऐन प्रसंगीं मला;
नाहीं एकचि मी सहाहि रिपुशीं येथें करोनी रण,
पादाक्रांत करोनि लाविन तयां दातीं धराया तृण. २
स्थानाचा पथ दाखवीं मजसि त्या जेथें विहंगापरी
होओनी मम ही तनू जड, तनू जाईल कीं अंबरीं;
जीवाची तनु होउनी सहचरी पाहील कालत्रय,
सप्तद्वीपवसुंधरा सहज वा ये हिंडुनी निर्भय. ३
शोकोर्मी भयदुःखवीचि अथवा धांवोनि अंगावरी
किंवा संसृतिसिंधुनक्र मजला ओढो जलाभ्यंतरीं;
ध्येयप्राप्ति जरी कधीं प्रभुवरा होणार मातें असे
त्यांची भीति मला मुळीं न गमते तैसी क्षितीही नसे. ४
सर्वाधार विशाल काल सहजीं विश्रांति देतो जया
दुःखांचा प्रतिकार त्या करुनि तीं सोत्साह सेवावया;
इच्छा नश्वर वस्तुसंग्रह करी ती पूर्ण मोडावया;
दावीं मार्ग विभो कृपा करुनिया दे शक्ति ही चिन्मया!५
अल्प प्राप्तयशें न चित्त हुरळो कीं अल्प सौख्याप्तिनें
वाटो त्या कृतकार्यता न सदया हें एक कीं मागणें;
आत्मीयोन्नति होउं आजि इतुकी कीं सर्व तीं खेळणीं
बाळांचीं मजला गमोत; सहसा जावें न त्यां मोहुनी. ६
आहे राज्य विशाल ज्यास अभिधा स्वानंदसाम्राज्य ही,
त्याची ती नृपधान शांतिनगरी अंतःस्थिता जी रहीं;
चेतःशुद्धि सुनीति या दृढभुवीं संस्थापिली सुंदर,
जेथें लौकिक भेदभाव हरपे वाहे सुधानिर्झर ! ७
जेथें आत्मिक तेज तें चमकुनी दिव्यप्रकाशीं तया,
भ्रांतीचे पडदे अपाप विरुनी जाई अहंता लया;
जाया वाट तिथें जरी बिकटही देवा धरोनी करीं,
राज्यींचा करुनी सुभा मुकुट तूं घालीं स्वयें या शिरीं. ८

---

ाया. २ सूक्ष्म. ३ सखी. ४ सुखलाभानें. ५ राजधानी. ६ गुप्त; एकांतांत.

# ७. सुधास्यन्द.

## १. मनोबोध.

पद [ चाल. बीज पेरावें......... ]

भक्तविश्राम । ध्याइं मना आत्माराम ॥ध्रु०॥
सच्चिद्घन तो भवभयभंजन,
पूर्णपरात्पर निखिलनिरंजन,
सुंदर मूर्ती निजजनरंजन,
पावननाम । कमलेक्षण मेघश्याम ! १
रागसुरंजित रूप झळाळे,
कोटि शशींहुनि तेज आगळे
चपलेची ही दीप्ति मावळे.
तेजोधाम । पुलकित करि हर्ष निकाम ! २
हृदयसरोजीं सोज्ज्वलरूप,
कल्पुनि मोदं प्राशिं अमूप—
प्रसन्ननयनीं; हो निष्पाप;
पूज्यपदपद्म । पूजिं मना अष्टौ याम ! ३
चिदानंदमधुकंदमरंद,
भक्त्यावेशें सेवुनि धुंद—
होतां सखया तुटतिल बंध.
दुःख विराम- । पावे; तरि स्मर जितकाम ! ४

---

पद [ चाल. अर्धतनू वारुळीं बुडाली ।

जगदीशाची नितांत सुंदर शिवद मूर्ति साजिरी,
प्रकाशे रम्य हृदयमंदिरीं. ध्रु०
प्रशांत सोज्ज्वल नयनमनोहर सौंदर्याचा निधी !
पहा तरि मज्जन करिं त्यामधीं;
अखिल इंद्रियां नयन करोनी आतुरतेनें जरी,
निरंतर बघसि न शांती तरी !
ते अनंतरूपी ज्ञानकिरण भास्कर,
त्या गहन तमोवनिं शिरति जेंवि निर्भर,
ये तसा प्रभुवरा मम हृदयीं सत्वर,

शरण शरण हा चरणपंकजीं थकली रसना हरी !
बावरें चित्त न धैर्या धरी ! १
परमानंदा उदयमान हो हृदयनभोभ्यंतरां,
अविद्यानिबिडतमःसंहरा !
तमालतरुनिभ नीलनभीं त्या येतां उदयाप्रती—
कलानिधि हिमकर रजनीपती !
तो चकोरपक्षी विभो मुदित होउनी,
चंद्रमाकांतिमधुरुचिरसुधा प्राशुनी,
होतसे स्वरूपीं लीन जसा रंगुनी
निमग्न तेंवी तुझ्या स्वरूपीं चिन्मयसुखसागरां,
होउं कीं मधुकर कमलाकरीं ! २

---

पद [ दे रे हरी संतपदाची. ]

पावन हरिचें नाम वद वद पावन० ध्रु०
मधुर किती तरि सेवुनि पाहीं खर्च न एक छदाम. १
प्रेमानंदें तन्नामाचा करितां गजर निकाम. २
करुणामृतनिधि हेलावे तो सेवीं मग अविराम. ३
अणुरेणूही जीववितो जो काय त्यजी तुज राम ? ४
चिंता दुबळ्या ! करिसी कसली गाई मुनिविश्राम ! ५
दुरितगिरी तव भंगाया क्षम एकचि पवि हरिनाम ! ६
ब्रह्मानंदीं मज्जन करुं ये होऊं पूरितकाम ! ७

---

पद [ कवणें तुज गांजियलें. ]

जय जय जय करुणामय दुरितदारणा !
अतुलतेज कमलशेज दीनरक्षणा ! ध्रु०
चिद्‌व्कार्शि राकाशशि । ये उदया रूपराशि ।
मधुर सुधा सागरासि । ये भरती पूर्ण तशी ।
हास्यमग्न भुवन सर्व सौख्यवितरणा ! जय० १
स्वर्भुवनद्वार मुक्त । आनंदा लहरि फुटत ।
नवविधामरूपललित । माधवमधुमंजुमरुत ।
वाहुनि करि मंद मंद । मोदवितरणा । जय० २

लीलारस मधुर गंध । सेवुनि हा योगिवृंद ।
होत पहा तुंद धुंद । जेवीं पिउनि अलि मरंद ।
निजरंगीं गुंग कसा विघ्नवारणा ! जय० ३
दुस्तरभवसिंधुजलीं । नवविधाननवकमलीं ।
विश्वजनी श्रीकाली । मोदमयी ही रमली ।
तनुवसना, मधुहसना । पद्मलोचना । जय० ४
भक्तराज मधुपाली । भक्त्याकुल ही जमली ।
मधुपानीं बहु रमली । शुद्धिबुद्धि ही सरली ।
भेदवृत्ति मनिं जिरली पतितपावना ! जय० ५
पाहिं पाहिं मातृवदन । मनमोहन विमलनयन ।
सौख्यपूर्ण मंजुहसन । साधुवृंद चरणलीन ।
नृत्य करुनि आनंदें करित गायना जय० ६
प्रियदर्शन अतुलकांति । साधुमना देइ शांति ।
भ्रांति गळुनि खचित अंतिं । प्रेमदास करि विनती ।
नमुनि पाय ' गा ' वदतो विश्वकारणा. जय० ७

---

पद [ प्रिये पहा...... ]

मना गड्या ! घेइ उडी तांतडिनें आत्महृदयसागरीं ध्रु०
करशिल जरि ईशभजन । सुतर समज सिंधुतरण,
ना तरि तव त्यांत मरण । सत्य वैखरी. १
एक दोन जरि बुड्यांस । येइ न धन तव करांस
रत्नाकर ओस खास । समज ना धरीं ! २
कामादिक नक्र सहा । फिरति त्यांत दुष्ट महा ।
भक्ष्यलोभ धरुनि पहा । नित्य अंतरीं. ३
सद्विवेकरूपि हळद । निजदेहा मरद मरद
येतां तो, नक्र, गंध । पळति बा दुरीं ! ४
सागरिं या मुक्तामणि । असति किती कोण गणी !
मार बुडी धांव झणीं । भाव मनि धरीं ! ५
प्रेमदासवचनसुधा । सेविसि जरि चित्त ! मुदा ।
विषय न तुज छळिति कदा । समज अंतरीं. ६

---

# २. आई व तिचीं मुलें.

पद [ चालः—बीज पेरावें...... ]

हाचि विचार । पीडी मज वारंवार. ध्रु०

कृपासिंधु तूं असतां जननी,
मी ही जागृत तैसा भुवनीं,
चोरी होई कैसी सदनीं ?
पडे हें गूढ । करि मज तें मूढ वि-मूढ ! १

त्याया पावन नाम मनोहर,
निश्चय केला कितिदां दृढतर,
केविं पडे परि कळे न विसर—
ऐन प्रसंगीं । मन केवळ चंगी भंगी ! २

दिलें न तूं परि मजला कांहीं,
म्हणुनि मिळालें तुजला नाहीं,
द्यावें घ्यावें नय हा बाई !
कोणता दोष । वद माझा न धरीं रोष ! ३

देतिस जरि तूं मजला कांहीं,
त्यांतूनचि गे परि लवलाहीं,
मिळतें जननी ! खास तुलाही,
रूढ हा न्याय ! शंका धरि तव का हृदय ? ४

यशोपशय कीं सुरस कुरस वा,
देणें तव हें हातीं जीवां,
देशि न त्यांतिल रस जो बरवा,
रसेश्वरि सांग । का करिसी जनरसभंग ? ५

मन तूं अंबे दिधलें मजला,
कानगोष्ट परि कथुनि तयाला,
फितूर करुनी डाव साधिला,
नेत्रसंकेतें । कथिलें मज वंचायातें ! ६

सुखरूपी या क्षितिजामार्गें,
धांवत फिरतों जगतिं शुभांगे !
विपरित हा ! परि करास लागे,
अशी तव माव । वद कैसा लागे ठाव ? ७

विमल सुखाची इच्छा करितां,
दुःखभार तो बसतो माथां,
सत्य इच्छितां असत्य हाता,
काय करावें। वद कोणा दूषण द्यावें? ८

## ३. नाममहात्म्य.

पद [ चालः—शारदे दासकामदे! ...... ]

अंबिके! भक्तरंजिके! दुःखभंजिके! जरी तव नाम,
स्मृतिसमयिं मुखीं ये असतां मन निष्काम. ध्रु०
मग तरी, मला शांकरी, मुक्ति झडकरीं, कशी ना मिळते,
पाहीन हटानें विश्वंभरचिच्छक्ते! १
गोवधा, वाहुनी मदा, करीं मी मुदा, तरी मज त्याचें—
भय नसे, घडे जरि गान तुझ्या नामाचें. २
स्त्रीघात, विप्रनिःपात, तुला मी गात, करीं गे अंबे!
तरि काय तयाचें मजला? जगदालंबे! ३
बेभान, होउनी जाण, वारुणीपान, बालहत्याही,
मत्करीं जाहल्या भीति न मजला कांहीं. ४
मंगले! नामिं रंगलें, चित्त गुंगलें, तरी हीं पापें,
वद काय बापुडीं करिती मज निष्पापे? ५
चालके! विश्वमोहिके! जरी मुखिं निकें, नाम तव येई,
तें असें ब्रह्मपद सहज सलभ कीं बाई! ६

## ४. आई आणि मनोबोध.

पद [ चाल—झाली ज्याची उपवर...... ]

चाल मना वा! जाउं फिराया, ईशदयानिलसुख सेवाया. ध्रु०
कालीजननीकल्पतरुतळीं चार फळांची अभिरुचि घ्याया. १
प्रवृत्ती ती तशी निवृत्ती उभय तुझ्या या सुंदर जाया. २
संगें घेई निवृत्तीला, कल्पतरूचा पथ दावाया. ३
तनय तिचा जो विवेक नामा, तत्त्वकथा तो क्षम सांगाया. ४
शुचिताऽशुचिता सोडुनि जेव्हां, दिव्य मंदिरीं रिघसि निजाया. ५
जननी-दर्शन सुलभ, भेद जैं, उभय सतींतिल जाई विलया! ६

अहंकार तो पिता, अविद्या जननी दोघां दूर करीं या. ७
मोह तयांचा मायाजाळीं, सजला तुजला जरि ओढाया. ८
अढळ धृतीच्या अचल स्तंभीं, गुंतविं त्यातें यत्नें सखया ! ९
धर्माधर्मा मेषयुगा या बांधुनि ठेवीं धरितां न भया. १०
ज्ञानकृपाणें छेदिं तयांना, करितां बल ते तुज रोधाया. ११
बोधिं दुरोनी प्रवृत्तीच्या संतानांना, क्रोधादिक या. १२
वळति न जरि ते, चुके न लवही ज्ञानसागरीं त्या बुडवाया. १३
पथ हा धरितां नलगे तुजला, कृतकर्मांची भीति धराया. १४
शांतपणानें यमधर्माला, कांहिं न चिंता उत्तर द्याया. १५
घडतां हें तुज आळवीन मी 'बाबा, दादा, हे मनराया ! १६
बाळ, लाडक्या, बापू, बेटा, ' कुरवंडिन ही तुजवरि काया ! १७
भीति न लवही मग मज वाटे ' माझें मन ' तुज खास वदाया. १८

---

## ५. श्रीकृष्णभक्ति.

पद [ चाल—चंद्रकांत राजाची...... ]

मधुर मधुर ही मुरली वाजे पुनरपि त्या विपिनीं.
मन्मन गेलें, मीहि चाललें. ठरति न पद भुवनीं ! ध्रु०
श्याम कन्हैया उभा तिथें तो वाट बघत माझी,
येतां किंवा नाहीं सांगा विरह चित्त भाजी ! १
शब्द मात्र तो तुम्हां भासतो श्याम न हा आन,
जिवलग परि मज प्राणविसावा, माझा पंचप्राण ! २
तुमची वेणू वनीं वाजते परि माझी हृदयीं,
कर्णमधुर ते ध्वनी परिसतां तन्मय मन होई. ३
बन्सी हा बांसरी वाजवी मज कैसा बाही,
' बोरवनीं या कुंजा शोभा तुजविण लव नाहीं ! ' ४
चला चला कासया थांबता चित्तभृंग उडुनी,
कधींच गेला घालायातें रुंजी हरिचरणीं ! ५

---

१ ज्ञानरूप तरवारीनें.

## ६. शिव व शक्ति अभिन्न.

पद [ चालः—वसंतीं बघुनि मेन...... ]

मना श्रीकाली मम जननी,
काळी काळी कां वदसी बा ! अविवेका करुनी ? ध्रु०
भवानी विनटे दिग्वसनीं,
औदार्याच्या क्षमादयेच्या सुंदर आभरणीं.
दिसे ती श्यामल जरि वरुनी,
हृदयपद्म हें करी प्रफुल्लित तेज आंत भरुनी. १

---

## ७. आई व मुक्त जीव.

पद [ चालः—भूपती खरे ते वैभव...... ]

श्रीप्रणवरूपिणी शिवदा काली आई,
क्रीडनीं गुंग किति साद न ऐकूं जाई. ध्रु०
या विषम जगाच्या ऐन चव्हाट्यावरतां,
खेळते जिवाचा पतंग करुनी सुमतां;
बांधिला तयाला मायेचा हा दोरा,
बहु चढवी वरवर आशेचा त्या वारा;
वांकड्या सरळ दिसती ज्या, लोचना;
त्या वंशशलाकारूपी, वाहिन्या,
हें चर्मचि कागद नोहे, बा मना,
निर्मिलें पतंगा स्वगुणें निज लालांहीं,
या अन्य उपाधी कृत्रिम साऱ्या कांहीं. ?
या त्रिविधरूपि रे काचरसामाझारीं,
हा भिजवुनि दोरा मांजा केला भारी;
या लक्ष पतंगीं चुकोनि एकादाच,
होतसे मुक्त कीं तुटोनि दोरा साच;
हासते खिदळते माता, बहुपरीं,
वाजवी प्रमोदें टाळ्या, कितितरी,
बघुनि या पतंगा मुक्त, झडकरीं,
दाक्षिण्यसमीरें पतंग उडुनी जाई,
लंघुनी भवाब्धी लीन अनंतीं होई. श्री० २

## ८. भक्त आणि संसार.

पद [ चालः—जरि नाहीं कमल तें...... ]

या संसृतिसुखसागरीं, मोदमंदिरीं, विबुध रमती,
ते लुब्ध न परि त्याप्रती. ध्रु०
जैसें नलिनीदल, विमल सोज्ज्वल, जलीं वसुनी,
हो लिप्त न जलबिंदुनीं. १
तैसा जनक सन्मती, वसुमतीपती, भवीं रतला,
का निंद्य म्हणुनि भासला ?
शुकादि मुनि त्याप्रती, श्रेष्ठ मानिती, शिरीं धरिती,
त्या लवहि न अवमानिती. ३
तैसें भवीं राहुनी, रिझनि खाउनी, सुखें रमुं या,
परि मग्न नको व्हावया. ४

---

## ९ प्रेममौक्तिक.

पद [ हरि भजनावीण काळ...... ]

मार बुडी घेई ठाव रूपसागराचा. ध्रु०
अतल तलातल वितलीं, तेंवि रसातल सुतलीं,
शोध करीं पातालीं, प्रेममौक्तिकाचा. १
प्रेमाचें विमल भुवन, हृदयिं असे वृंदावन,
गवसे जरि करिसि यत्न, लाविं शोध त्याचा. २
ज्ञानदीप धडड जळे, षडरींची धुंदि गळे,
श्रांतितमा पद न मिळे, परम हा सुखाचा ! ३
नौकानय कोण करी, कठिण कठिण भूमिवरी,
सुलभ न गड्या तेविं परी, परिस कबिर-वाचा. ४
परिस परिस परिस सदा, त्याजिं खटपट चित्त ! सुधा,
आश्रय करिं सतत मुदा, सद्गुरूपदाचा ! ५

## १०. शांतियाचना.

पद [ चालः—तस्करा हातीं...... ]

**शिवद सन्मूर्ती, मूर्ति रम्यकांती, मनोहर विमल पूर्णदीप्ती,**
**चित्तगाभारीं, सांग कधीं शांती, प्रकाशुनि करिसि कार पूत, ध्रु०**

अनुदिनीं तुजला, तुजला निरखोनी, समुत्कट लोललोल नयनीं.
रूपसिंधूंत, तुझ्या कृपासिंधो, घडे कधिं मज्जन नतबंधो !
अनंत ज्ञान, ज्ञानरूप नाथा, उदित हो हृदयीं मम आतां.
बांवरें चित्त, चित्त मूक झालें, पदाब्जीं रंगुनि तव गेलें.
सच्चिदानंदा, नंदामृतानिलया, चिन्नभीं येसी जों उदया.
विधूदयीं जेंवी, जेंवि चकोरासी, होई. होय तसें मजसी.
पुरवि ही इतुकी, इतुकि तरी आर्ती. मंगला ! देइं मना शांती. १
परमशांत दांता, दांतराजराजा, अलौकिक दिव्य महातेजा;
चरणकमलीं या, कमलिं विजितमाया, मुदा ही कुरवंडिन काया.
तदा मानीन, मानीन जन्महेतू, सफल बा धरितां नच किंतू.
असा या जन्मीं, जन्मीं स्वभोग, सेवुनी समोदानुराग.
काय अधिकार, अधिकार असामान्य, असा ज्या लाभे तो धन्य,
यदा मी शुद्ध, शुद्ध निष्पाप, बघे तव रूप शार्ङ्गचाप !
अखिल मम दोष, दोष जाति पूर्ण, प्रकाशें जेंवि तिमिर तूर्ण,
कदा तो सुदिन, सुदिन परंज्योति, निवारी दासभयभ्रांती. २
ध्रुवासम अढळ, अढळ भक्तिभाव, वसो मम हृदयिं हीच हाव,
असे ही सकल, सकल माझि जोडी, सफल ती करीं हात जोडीं,
असा मी होतां, होतां सुखमग्न, अहर्निश करुनि तुझें ध्यान,
प्रभो विसरोनी, विसरोनि देहभान, होईन तूंच मी जाण;
परी तो दिवस, दिवस सोनियाचा, कधीं बा उगवे सौख्याचा;
तुझ्या हें हातीं, हातिं दीननाथा, उपेक्षूं नको भाग्यवंता,
पुरविं ही इतुकी, इतुकि तरी आर्ती, दयाघन, देइं मना शांती. ३

---

## ११. भक्त द्वैतीच !

पद [ चालः—चंद्रकांत राजाची.. ... ]

गौरांगाच्या प्रेमरसाच्या ऊर्मी मजसरसी,
येउनि भिडल्या, मज्जन घडलें, सुखकर या तनुसी. ध्रु०
प्रेमसागरा सखे तयाच्या भरती ही येतां,
पाखंडीजन त्यांत बुडाले बघ बघतां बघतां;
विश्वहि गेलें, विलीन झालें, गति होई कैसी ?
मीहि चाललें, गेलें, झालें समरस जलधीसी. १

बसुनि तळासी असेंचि ध्यावें सुख हें मनिं गमतें,
गौरांगाचा प्रेमनक्र हा गिळतो परि तनुतें;
होउनि दुःखें विव्हल माझ्या, ऐसा जगिं कोणी,
मनुज असे का? सांग सखे जो निजकर देवोनी—
उदधींतुनि या वर घे मज हें सुख भोगायासी,
धन्यवाद मी साच सांगत्यें देइन गे त्याशीं. २

---

## १२. उत्कंठा.

पद [ चालः—भूपती खरे ते वैभव...... ]

चल गडे बघूं ती गौरांगाची मूर्ती,
किति नयनमनोहर पुरवुं जिवाची आर्ती. ध्रु०
मज सखे दिसे हा सुविहित संगम घडला,
नवनील नीरदा आलिंगन दे चपला;
वाहते जणूं बघ लावण्याची सरिता,
ही कशी झुळझुळू कांतिसुधाजलभरिता;
भाजनें करुनि नेत्रांचीं, चल गडे,
प्राशुं तें रूपजल जेणें, सुख घडे,
मम मनोमीन जलिं जाया, तडफडे!
आकंठ सेवुनी रूप सखे हृदयांतीं,
साठवूं भरोनी करूं मनाची शांती. १
हा गौर गौर किति मदनाचा कीं पुतळा,
ओतिला गमे जणुं कनकाचा गे! सगळा;
हा हृदयसिंधु बघ उचंबळे कीं त्याचा,
जो सखे! महार्णव पवित्र मांगल्याचा;
येउनी तयाला भरती उठती भारी—
या प्रेमरसाच्या लहरी वरती लहरी;
मार्दवें प्रेमहृदयाच्या, साजणी,
तत्तनू त्रिभंगा झाली, शोभिनी,
मोहिनी मोहनी घाली मोहुनी,
गौरांगदर्शनें हरिली माझी वृत्ती,
कीं जादूनें या नयनिं पाडिली भ्रांती! २

माखिली गडे गे गौरांगाची तनु ही,
आलिता घालुनी दह्यांत त्यानें पाहीं;
पाहुनी मूर्ति ही प्रेमल माझ्या वृत्ती,
बघ कशा उसळुनी धांवति वरती वरती;
जें करी जगाला वेडें, रूपडें,
जें भल्या भल्या योग्यांना, नातुडे,
तें घडी स्वयें शिव पाहीं गे गडे!
दाखवी जशी श्रीभक्तिशालिनी हो ती,
वृषभानुनंदिनी सती राधिका सुदती! ३

---

## १३. दुर्लभ धन!

पद [ चालः—उद्धवा शांतवन...... ]

सकलांना काली-धन का, वद सहजासहजीं मिळतें? ध्रु०
हे मुग्ध मानसा माझ्या, सुलभ न तें जितुकें गमलें,
श्यामापदपंकजनमनीं, रिझवाया मन बा अपुलें,
दुर्घट तप सांबें केलें, साध्य न तें तरि त्या झालें,
इंद्राची सत्ता अतुला,
संपदा तयाची विपुला,
तुच्छ हीं खऱ्या भक्ताला,
जो ध्यातो श्रीकालीतें. १
प्रेमें जों श्यामा जननी, एकदांच मागें वळुनी,
निज भक्तीं पूर्ण कृपेनें, मधुकटाक्ष फेंकी हंसुनी,
मज्जन त्या ब्रह्मानंदी, लाभतें न मिथ्या मानीं,
योगीश्वर शिव तो अथवा,
मुनिहंस तपोनिधि बरवा,
विधिहरि कीं सुर-वर मघवा,
ध्याती जरि दुर्लभ पद तें! २

---

## १४. कळीचें यंत्र.

पद [ चालः—अभाग्याचें घरीं...... ]

किति मौजेचें यंत्र कळीचें कालीनें केलें,
परम चारुता बघतां त्याची स्तिमित चित्त झालें. ध्रु०
औट हात ही उंची त्याची बसुनि आंत माता,
खेळ खेळते नानापरिचे आवडतें चित्ता,
धरुनी हातीं सूत्र कळीचें चालवितें शांता,
नेणुनि परि हें, चालक माझा मीच यंत्र बोले. १
ज्या यंत्राला विश्वजनींचें ज्ञान पूर्ण होतें,
यंत्र न लागे कधीं व्हावया पुनरपि हो ! त्यातें,
दृढ भक्तीच्या अचल बंधनें ऐशा यंत्रातें,
कालीनें या बद्ध आपणा करुनि घेतियेलें ! २

---

## १५. हुरहुर !

पद [ चालः—उद्धवा शांतवन...... ]

काय म्यां करावें न कळे, नच सुचेचि कांहीं मजला. ध्रु०
बोलावें तरिही भीती, न वदावें तरि भय चित्तीं,
झाली स्थिति ऐसी कांहीं, शांतिलेश हृदयीं नाहीं,
हा विशाल वणवा इकडे, व्याघ्र महा निर्दय तिकडे,
हा अपार सागर इकडे, तो कडा भयंकर तिकडे,
चापातें लावुनि बाण,
व्याध हा मांडुनी ठाण,
टपला कीं घ्याया प्राण,
त्यांत मनोमृग सांपडला ! १
भीति हीच चित्तीं उपजे, जाशील हातचा माझे,
मोहिनी लाघवी वाणी, योजुनि तुज नेतिल कोणी,
लावण्यसरित्नवमूर्ती, आणुनि तव नयना पुढती,
हरिती मम सौख्यनिधान,
माझें चिच्छांतिनिदान,
हा माझा पंचप्राण,
या भयें जीव हुरहुरला ! २

मन तुझें कसाला माझे, उतरतां बालका ! चोजें—
ठाऊक मला जें कांहीं, देईन तुला लवलाहीं;
यांत न कांधिं अंतर होणें, वज्रलिपी माझें वदणें;
होतां ती मंत्र-प्राप्ती, तुज मिळेल अनुपम शांती;
हा योग स्वभूं यांचा, उत्कर्ष वस्तुलाभाचा,
भेदता जिरुनि भेदाची,
हो समता एकत्वाची,
भेट तीच सागरविधुची,
घनयोग मयूरा झाला ! ३
नववधूलोलदृष्टीशीं, दयितदृष्टिमीलन तें हें;
कीं चपला तेजोराशी, घनहृदया वेष्टीताहे;
वा गंगा रम्य शुभांगा, जलधिशीं रंग करिताहे;
कीं राधाश्रीकृष्णांचें, आलिंगन तें हें पाहें;
वा धनुर्भंगकर रामा, जानकी मनःसुम वाहे;
कीं विलाससेवनिं दंग,
कमलांतरिं असतां भृंग,
जें सेवी सुख अव्यंग,
तेंचि हें जीवशिवलीला ! ४
जाहलें अम्हां जें नाम, कर्णधार सुखविश्राम;
त्या विपत्सागरामधुनी, निज नौका नेली तरुनी;
यद्वलें नाम तें घ्याया, हो सिद्ध शिघ्र तूं राया;
हें सर्व तुजकडे आहे, मी निमित्त केवल पाहें;
दमयंतीधावितहंसा, धरिं या मन्मानसहंसा;
लोभवी पाहतां नयन,
जें क्षितिज तेंच हें जाण,
तें करीं धराया यत्न,
साधन नम वेंघायाला ! ५

---

## १६. खरा सुखी कोण ?

### श्लोक [ वृत्त शार्दूल विक्रीडित ]

जो बोले जणुं भाट कीं बडबडे, वा जो मुखें दुर्बळ,
यत्कर्णीं तुलसीदलें झळकती, चित्तीं परी वादळ,

काढी स्त्री बहु लांबसा पदर जी, कासार नीलान्वित,
पांचापासुनि दूर या मनुज जो, तो हो सुखी निश्चित. १

## १७. आधीं पोटोबा मग विठोबा!

साकी.

माध्यान्हींच्या पोटपुजेची चिंता दुर्घट भारी,
तिजपुढतीं श्रीकालिदासही विसरे कविता सारी! १

## १८. नामसुधा.

पद [चाल— स्फटिकाचे ते पदपथ......]

ध्याइं मना रे ध्याइं निरंतर कृष्ण मुरारी, कुंजविहारी. ध्रु०
वृंदकिशोरा, फणिवधचतुरा, कातरभवभयभंजनधीरा,
गोवर्द्धनधर यादववीरा, ललितराधिकाचित्तश्चोरा,
माधव मधुहर, नयनमनोहर, मोहनमंजुलमुरलीधारी. १
अंबुजनेत्रा! अंबुजवक्त्रा, नवशिखिपुच्छकभूषणशीर्षा,
गोपीमुखशशिचारुचकोरा, वनसुममालागलावतंसा!
केशव करुणा करिं कलिशमना, उद्धरिं दीना व्रजवनचारी! २
यमुनापुलिनक्रीडासक्ता, योगीजनहृन्मानसहंसा,
भामाधरमधुपानमिलिंदा, मधु गोविंदा हे धृतवंशा,
श्याम कन्हैय्या धरिं या हृदया, रामारंजनरासविहारी! ३

## १९. भक्तिपाठ.

पद [ चालः—माना मानुं नको...... ]

या हो! भक्तिलिप्सु हो या हो! प्रेम सुखाचा लाहो;
वृंदावनिं जे राधा देई भक्तिपाठ ते घ्या हो! ध्रु०
आली, प्रेमसागरा आली, महाभरति या कालीं,
परी ओहटी क्षणांत लागे, या भक्तिभाग्यशाली!
चाहे, भक्तिसुधा शतधा हे,
तुंद धुंद व्हा यथेच्छ पिउनी जितुकें निजमन लाहे;

साचें ! दिव्य मधु प्रेमाचें, भक्तिभाग्य राधेचें,
विमल भक्तमणिमालेमाजीं स्थान तिचें मेरूचें;
या हो ! श्रीहरी बोला हो !
राधाजीवन जीवें गाउनि फोडा हरिचा टाहो ! १

थोडी, प्रेमरसाची गोडी,
घेतां तुटुनी बंध जिवाचे फिटति अघाच्या कोडी;
प्राण, होति पूर्ण बेभान, आत्मानंदविलीन,
करितां प्रेमें विमल मनानें भक्तिसुधारसपान;
बाष्प, नेत्रीं गळति अपाप, प्राशुनि ते निष्पाप,
नाचे मत्त प्राणमयूरी विसरुनि चेतस्ताप;
या हो ! प्रेमानंदें गा हो ! म्हणुनी राधानाहो,
राधाजीवन जीवें गाउनि फोडा हरिचा टाहो. २

---

## २०. गौरांगप्रभु.

पद [ चालः—सुवर्ण केतकी परि...... ]

धरुनि कोणता फिरसी हेतू गौरांगाच्या वेशीं,
काय सुखाचा सौभाग्याचा लाहो तूं मिळवीशी ? ध्रु०
मज्जन घडलें भक्तिरसाच्या जलधीमाजीं तुजला,
उत्कंठेच्या महा मारुतें उदधि तरंगित झाला;
सोडुनि गृहकुल तुजसाठीं हें मिळतीलचि भक्त तुशीं,
केविं तरी रे मन हें माझें मोहुनियां घेसी ? १

गोकुळिं सखया, गोकुल चारुनि फिरशी रानोरानीं,
मोहित केल्या गोपी करिं तूं मोहनमुरली धरुनी;
मानभंगिणी गोपींच्या तूं पदिं लोळण घेसी,
त्या न ऐकतां खिन्न होउनी किति रडकुंडी येसी;
वदनशशी तव बाष्पसागरीं लागे पोहायासी,
केंवि तरी रे मन हें माझें मोहुनियां तूं घेसी ? २

---

## २१ मनःप्रार्थना.

पद [ चालः—झंपा...... ]

नमीं भगवती कालिका विश्वजननी,
धन्य होई मना तीस भजुनी. ध्रु०
कडकडुनि भेटुनी, हृदयिं आलिंगुनी,
बाष्पजलिं न्हाणुनी, तिजसि हर्षें;
पाहुं ती चिन्मया, तूं नि मी मिळुनियां,
तिजविना लोकिं या, बघुं न कोणी ! १
निरसुनी कामना, पाहुं मग चल मना,
तामरसलोचना, इंदुवदना !
घे परी संगतीं, स्वरसपटु जीभ ती,
कीं वदूं निश्चितीं, ' धांव जननी ! ' २
घोरपथगामिनी, वासना स्वैरिणी,
निकट निज वर्तिनी, करिं न तीतें.
कृष्णपददर्शिका, ज्ञानदृक्पोषिका,
होउं ती वीथिका, पापतरणी ! ३

---

## २२. मी मेल्यावर—

पद [ चालः—नृपममता रामा...... ]

आनंदमयी तूं जननी । कां न मिळे मज तो भुवनीं । वद तरी ?
पूज्यपादपद्मावीणें । माते मी कांहीं नेणे । खचितची ।
मग तपनतनयनयमूर्ती । कां दावी जीवा भीती ? ही अशी ।
शांकरी, भुवनसुंदरी, सगुणमंजरी,
देउं त्या जननि । उत्तर मी काय निदानीं ? वद तरी. १
नामाची नौका करुनी । हा भवाब्धि जावा तरुनी । ख०
हीच या मनाची आर्ती । आत्यंतिक उत्कट होती । ख०
परि अपार पारावारीं । बुडविशील मज निर्धारीं । ख०
मानसीं, स्वप्निं ही तशी, कुशंका अशी,
पालिनी जननी । आलि न कधिं मज लागोनी । ख० २
पूर्णकाम तव भक्तांशीं । ने करुनी जें मोक्षासी । जननि गे ।

स्या तुझ्या मधुर नामासी । घेतों मी रात्रंदिवशीं । ज०
दुःखांची तरि ही राशी । अद्यापि न सोडी मजसी । ज०
सुरनुते, मजसि वाटतें, दुःख हेंच तें,
यांत कीं जननी, मरतां मी न भजे कोणी । तुजसि० ३

## २३. बेहोष काली.

पद [ चालः—सुटला पितृ दिशेचा...... ]
असतां जननी शिवसंगतीं । होसी मोदमग्न तूं किती ध्रु०
जरि तूं प्रेमसुधा प्राशुनी । होसी धुंदचि रात्रंदिनीं,
किती नवल हे तरी न ढळे पद या क्षितीं,
परि पडे तळीं शिव हले न लव तो सती. १
विपरीत रतातुर तूं जनी । पदभर कांपावि तव मेदिनी ।
उभि तूं शिवहृदयीं मानिनी । चढली धुंदि किती लोचनीं ।
कमान चढली तुझी न बघवे मज संप्रती,
शिवदृष्टि पिशाची तशी ताठली किती ! २

## २४. विरहिणी राधा.

पद [ चालः—जन सारे मजला...... ]
वन दूर किती तें बाई गे. ध्रु०
जेथें माझा प्राणविसावा,
गाई चारित वाजवि पांवा,
तत्तनुचा ये सुगंध बरवा,
न चालवे मज पाउलभरही ! १

## २५. ब्रह्मानंद.

पद [ प्रिये पहा रात्रीचा...... ]
सुरेश्वरा ! धन्य दिवस उगवे हा चरण दाविले. ध्रु०
जितमाया सुखनिलया । सकल दुःख वारुनियां ।
दर्शनसुख देउनियां । प्राण मोहिले. १
पाहुनि तुज सप्तलोक । झाला हा विगतशोक ।
उपभोगी अतुल तोख । दैन्य लोपलें. २

राहो हा दीन हीन । तुझिच कृपा सत्य म्हणुन ।
सुंदर तव कमलचरण । आजि पाहिले. ३
मोहनिशा ती उडली । ज्ञानउषा ही फुटली ।
चित्ताची गांठ ढिली । प्रेम दाटलें. ४
विस्मृतिचें पटल गळे । दृष्टीसी दृष्टि जुळे ।
हृदयासी हृदय मिळे । शून्य राहिलें. ५

## २६. निद्राभंग.

पद [ चालः—तस्करा हातीं...... ]

मोडली माझी । माझि नीज आई !
पुन्हां मी ती न कधीं घेई. ध्रु०
जाहलों जागा । जागा मी जननी !
कसा दरि आज दैत्यमथिनी !
दिली मी परत । परत योगनिद्रा,
तुला लखलाभ असो भद्रा,
निजे निजवीलें । निजविलोंचि आई !
सदाचें अभय होय पाहीं ! १
निशेचें जेथें । जेथ नांव नाहीं,
तेथुनी कोणि गुरूभाई,
येउनी माते ! । माते प्रेमानें,
बोधिलें मजसि अहा त्यानें;
अनुभवद्युमणी । द्युमणि हृदाकाशीं,
तळपला पूर्ण दिव्यराशि;
स्नानसंध्याही । संध्याहि म्हणुनि आई !
गमे मज विफल साच पाहीं ! २

## २७. ईशरचना.

पद [ चालः—राधा-धर-मधु-मिलिंद...... ]

रचना तव अनिवार । भगवन् । तीस न पारावार । भगवन् ।
अपार शोभा—अगार केवल अतुल विश्वसंसार ! भग० ध्रु०

अनुपम तव भांडार । भगवन् । अनुपम तव भांडार ।
अनंत तारा नभीं चमकती सुरत्नकांचनहार । भगवन् ॥ १ ॥
तेजांचे संभार । भगवन् । तेजांचे संभार ।
चंद्र किती हे सूर्य किती हे नाहीं अंत न पार । भग० ॥ २ ॥
तूंच खरा दातार । भगवन् । तूंच खरा दातार ।
धनधान्यांहीं वसुंधरा ही सुंदर केली फार । भग० ॥३॥
गाति तुझा बडिवार । भगवन् । गाति तुझा बडिवार ।
अगणित जन हे देति धन्यता महेश ! वारंवार । भग० ॥ ४ ॥

---

## २८. जननीस्वरूप !

पद [ चालः—जरी कुणा श्रीमंताची...... ]

निबिड घोर तिमिरीं तुझा रम्य रूपराशी ।
कोटि सूर्यचंद्रा दिपवी भुलवि लोचनांशीं ॥ ध्रु० ॥
याच भागिं गिरिच्या कुहरीं ध्यानमग्न योगी,
अमर्याद अंधाराच्या खोल मध्यभागीं,
दिव्य महा निर्वाणाच्या समुद्रान्तरंगीं,
परम शांतिपरिमल वाहे खळ न लवहि त्याशीं ! १
महाकाल भीषणरूपा आजि तूं धरोनी,
तिमिररूप काजळि शेला, अंगिं पांघरोनी,
सुखसमाधिमंदिरिं माते ! एकली बसोनी,
करिसि काय सांगे तूं गे ! असासि कोण ऐसी ! २
तुझ्या अभय उभय मृदुल चरणपंकजान्तीं,
विनत वत्सवत्सलतेची ज्वलित विमलकान्ती—
चमचमाट चपला करिते वारिते अशान्ती,
चिन्मयमुखशशि पोहे अट्टअट्टहासीं ! ३

---

## २९. जर—

पद [ चालः—चंद्रकांत राजाची...... ]

पदारविंदीं मरंदपानीं जर नंदानंदा !
मनोमिलिंद न धुंद होय मम अक्षय गोविंदा ! ध्रु०

काय राहिला मला जीवनीं धणी चक्रपाणी,
नको नको हें करंट जीवित दुःखाची खाणी;
परम रत्न तूं त्या तुज यत्न न हो जरि रक्षाया,
बहु धनराशी धरुनि उराशीं जपणें किति वाया ?
सुंदरतर सुकुमार कुमाराननचंद्रीं नाहीं—
प्रेमसुखाची छबी जरी तव नेच्छि पहाया ही;
काम्य कौमुदी चारु चंद्रमा तिमिरविनिर्मित हीं,
प्रेमचंद्र तव हृदयनभीं जर उदयमान नाहीं;
प्रियतमपत्नी शुचिप्रेमही भासे मज मलिन,
प्रेमकनककोंदणीं तिच्या त्वत्प्रेमरत्न जरि न;
तुजविषयींची शंका जी कां मोहकन्यका रे,
कृष्णसर्पिणी चिरदंशापरि वाटे कंसारे !
काय वदूं तुज अधिक मुकुंदा मुचकुंदोद्धारा,
आनंदाचा कंद खरोखर तूं वृंदकिशोरा !
हृदयरत्न तूं स्वच्छंदा ! मम राधाधरछंदा,
मनोमिलिंद न धुंद होय मम अक्षय गोविंदा ! ॥ १ ॥

---

## ३० कधीं ?

पद [ चालः—अर्धतनू वारुळीं...... ]

प्रेमरसार्द्रा मंदसमीरणलहरी गुणसुंदरी,
वाहती कधिं या हृदयांबरीं ? ध्रु०
पूर्णकाम हरिनाम गात कधिं बाष्पाकुललोचनीं,
निरत हो प्रेमजलावर्जनीं ?
आत्मा मन कधिं शुद्ध होउनी जाइन वृंदावनीं ?
भुवनिं त्या प्रेमाच्या रंगणीं.
हे संसृतिमायाबंध सकल तोडुनी,
हें हरिमय सारें तसें विश्व मानुनी,
या भक्तिपथावरि सदा मुदा लोळुनी,
होइन केव्हां कंठमणी तव हीच आस अंतरीं,—
धरुनि मी झुरेन केव्हां हरी ? प्रेम० १
भक्तिशलाका कधीं घेउनी नेत्रतिमिरवारिणी,

घालिं मी ज्ञानांजन लोचनीं ?
स्पर्शमणी तूं तुझ्या स्पर्शनें लोहतनू कांचनी,
कधीं हो नयनमनोमोहिनी ?
हें धर्माधर्मी वेड सर्व सोडुनी,
या जातिकुलांच्या तटा त्वरित मोडुनी,
ही रूढि राक्षसी बया सपदि निवटुनी,
भीतिभावना लज्जाऽहंता चिंता नक्तंचरी,
कधीं या लंघिन मी श्रीहरी ? प्रेम० २
भक्तराजपदराजीवोध्दतधूलि स्वांगावरी,
कधीं मी घेइन नेणें हरी ?
शश्वद्वैराग्याचा शेला टाकिन खांद्यावरी,
कधीं मी सांगे मजला हरी ?
त्या प्रेमरूपिणी सुंदर यमुनाजलीं,
या उभय करांचा सवें जुळनि अंजली,
मी भरूनि उदकांजलीवरी अंजली,
प्राशुनि केव्हां प्रेमधुंद मी विहार हरिपादिं करीं ?
जसा कीं मधुकर कमलाकरीं. प्रेम० ३

---

## ३१. मधुरभक्ति.

पद [ चालः—अंकित पदांबुजाची...... ]

सुंदर दिसे किती ही कांती । काढिली नभाची कांती ॥ सुं० ॥ ध्रु०
सुंदर मुख हें स्वांतिं उपजवी । नवनीलनीरदभ्रांति । सुं० ॥ १ ॥
हृदयनाथ कीं प्राणनाथ ये । मम मंदिरिं एकांतिं । सुं० ॥ २ ॥
प्रेमसिंधु मम उचंबळे किति । भाग्य पिकेस वसंतिं । सुं० ॥ ३ ॥
हृदयवल्लभा ! काय घनें तुज । देतां हो तव शांति । सुं० ॥ ४ ॥
प्राण हृदय घे, घे मम सारें । माझी हीच विनंति । सुं० ॥ ५ ॥
अहा ! पहा मम स्पृहा महा नच । लाधो पादिं विश्रांति । सुं० ॥ ६ ॥

---

पद [ चालः—आजि अक्रुर हा...... ]

सखि ! गोकुळिंचा प्राण कुठें या गेला,
मनमोहन मुरलीवाला ? ध्रु०

हा विरह न गे ! हाक मृत्युची आली,
　　तरि वालि न ये वनमाली;
मी गवळ्याची कुरूप साधी मुलगी,
　　मग कैंची टिकणें सलगी ?
　　भाग्याची माझ्याहूनी,
　　नव लावण्याची खाणी,
　　नव गोपी दिसली कोणी,
मज वंचुनियां तिकडे माधव झुकला,
　　जातीवर भुंगा गेला ! सखि० १

जो भावाचा मात्र भुकेला भारी,
　　कोमल मन करुणालहरी,
तो भुलेल कीं लौकिक लावण्यातें,
　　कोणा हें ठावें होतें ?
　　परि मोहमूढ मी झालयें,
　　मी स्वतास विसरुनि गेल्यें,
　　मधुरूपा त्याच्या भुलल्यें,
निज हृदयीं म्यां धरिलें तत्पदयुगला,
　　वर्षाघन शारद ठरला ! सखि० २

या यमुनेच्या काळ्या डोहामाजीं,
　　जलसमाधि घेत्यें आजी;
कीं तीव्र महा गरल सखे पाजोनी,
　　सोडविं या दुःखांतोनी;
वनवल्लरि वा करुनी वलयाकृति गे,
　　आणुनि दे मजला वेगें;
　　दृढ बांधुनि तीच गळ्याला,
　　टांगुनि या कृष्णतमाला,
　　घेईन फांस अपुल्याला,
कीं गात सदा 'श्याम ! श्याम !' नांवाला,
　　झिजवीन देह हा अपुला ! सखि० ३

पद [ चालः—भूपती खरे ते वैभव...... ]

माधवा ! जिवलगा तूंचि विसावा जीवा,
आधार जिवा तूं भक्तभृंगराजीवा ! ध्रु०
तुज काय बोलल्यें म्हटलें तुज मीं काई ?
कशि काय बोलल्यें कुणास ठाउक बाई ?
हरि, अभागिनी किति विमूढ नारी जाती,
बहु भोळी तिज नरनीति न ठाव्या असती;
आदर्श करींचा पुष्प शिरीं ल्यायाचें,
तूं असशी माझें निधान सौभाग्याचें;
सुमन मी तुझें प्रेमानें, करुनियां,
लेईन तुला मी भारी, जपुनिया,
लपवीन सहज तुजलागीं, लीलया,
ठेवीन अशी या कृष्णकुंतलीं देवा,
कीं कोणालाही शोध न तव लागावा ! मा० १
तांबूल सुवासिक असशी तूं या वदना,
कां श्यामसुंदरा असशी अंजन नयनां,
घालीन लोचनीं अंजन तुज मी करुनी,
कीं कुणासही तव शंका यावी न मनीं;
तूं चंदनचर्चा चार्वी चर्चायाची,
नवनीलमालिका कंठीं घालायाची;
तूं कृष्णागरु मम त्यानें तनु माखोनी,
तव हार तसा या रुळेल हृदयावरुनी;
मी कुडी, प्राण तूं माझा, केशवा,
मी गेह, धिरा तूं माझा, माधवा,
मी पक्षि, पक्ष तूं माझे, यादवा,
मी मीन दीन, तूं जल या जीवन, जीवा,
मी पिका माधवा माधव मम तूं बरवा ! मा० २

---

## ८. विश्वोद्यान.

पृथ्वी



विशाल विषयाटवी कुणि वदोत विश्वास या,
वदोत कुणि दुस्तरा भवनदी सुदूरत्यया;
श्मशान अथवा कुणी, कुणि वदोत कीं नारक,
अगाध भवसिंधु वा सुखसमूहसंहारक. १

विचार अनुदार हे मज परी प्रभो ! वाटती,
तयांत ऋजुता[1] मुळीं नच दिसे, भ्रमे मन्मती;
दयार्द्र असुनी तुझा सम विशाल चेतोघन,
विषांबु वितरील ही मज शिवे न शंका क्षण. २

अनंत बलभाज तूं असिसि पूर्ण सर्वोपरीं,
अपूर्ण मनुजें तुझ्या कृति कशा तुकाव्या हरी ?
विलक्षण विचक्षणा करुनियां परी मानव,
सदोष तुज मानितों, किति अपूर्व हें लाघव ? ३

दिसे न मुळिंही जया असुनि अंध पूर्ण स्वयें
अचक्षु इतरां जनां हंसुनियां म्हणावें तयें;
तशीच कृति दुष्ट हें करुनि घोर मीमांसक[2]
वृथा तुजसि दूषिती, तव न काय हे द्रोहक ? ४

‘ रमेश परमेश कीं वदति दाखवा तो कुठें,
उगीच दुबळ्या मनें सभय निर्मिलीं हीं झटें;
असेल जरि भूतलीं प्रकट ईश कोणी तयें—
कसेंहि तरि एकदां मजसमोर यावें स्वयें. ’ ५

सपाद फणि हे असे गरलशब्द फूत्कारुनी,
प्रभो तुजसि निंदिती तव करोनि हेटाळणी
न वैर, धड भक्तिही मनिं अशा पिशा मानवा
कुठोनि दिसणें हरी ? नट न वीट तो चेट वा. ६

---

१ सरळता. २ वि-चिकित्सक.

नृशंस शिशुपाल वा दनुज कंस वा राधिका,
जरी न जगिं जन्मते करुण कृष्ण येतांच कां ?
दशास्य नसतां तरी कुठुनि राम कीं जानकी
अकारण न संभवे कधिंच कार्य हा न्याय कीं. ७

उदारकृतिसुंदरा ! तव कृती किती सोज्ज्वला,
अमंगल मनास त्या गमति मात्र दोषाकुला;
असह्यतरकश्मलाव्यथितें[1] नेत्र ज्यांचे तयां—
समस्त पिंवळे दिसे नवल काय हें चिन्मया ? ८

विचित्र मज विश्व हें उपवनापरी मोहवी,
प्रतीक्षणिं नवा नवा अतुल मोद हा मोह वी;
गुणाढ्य जन त्यांतले तरु विशाल चेतोहर,
विनीत ललना तशा ललित या लता सुंदर. ९

मुलें न परि कीं फुलें उमललीं जणूं हांसरीं,
गुणज्ञ सुरसज्ञही बघुनि डोलती अंतरीं;
मुलींस दुरितध्वजा कुणि गणोत वैतागुनी,
मरंदयुत मंजरी मजसि त्याच आमोदिनी. १०

वनस्पतिततींमधें विविधता जशी बा ! दिसे
तशीच तव लाडक्या मनुजकोटिमाजीं वसे;
सकंटकतरूपरी असति तींत जे दुर्जन—
निरर्थ नच ते, परी करिति वाटिकारक्षण. ११

असाधुविण साधु जे उदयमान होते न ते,
विनासुजन दुष्टही नुमगते तसे श्रीपते !
स्वतंत्रमधुवृत्तिचें सुख खरें किती तें असे,
कटूग्र परतंत्रतेविण परी कळावें कसें ? १२

परंतु दृढमूल जें तृण अपार तें वाढतां—
दिसे सुमनवाटिका अशिव लोपुनी चारुता
प्रमत्त तृणबीज वा गरलदिग्ध[2] तत्केसर[3],
समस्त तरुवल्लरी निवटितें क्षणीं सुंदर. १३

---

१ सोसावयास अति कठिण अशा कावीळ नांवाच्या रोगानें ज्यांचे डोळे पीडले आहेत. २ विषमय. ३ फुलांतले रेणु.

प्ररूढ नियमास या मनुजसृष्टि ही श्रीहरे!
असेल अपवाद बा! वद कशी दयाळा! बरें?
मदांधदश दुर्जुनीं सकल सृष्टि ही वेढली;
सचिंत सुजनावली अमित संप्रती जाहली! १४
कुशाग्रमति कैतवप्रवण विक्रमी केसर,
अघोरकृति दुर्जनप्रमुख दुष्टदुष्टांतर,
अमूल्य जनशांतिचा परमशत्रु आलें कळीं;
समस्त जनतेप्रती करि जणों सळों कीं पळों! १५
असे धरुनि जीव हें जरि जगत् तुझें आजला,
दिसे तरि तयावरी बघ किती मृतीची कळा;
अझूनि परमावधी तुज गमे न का जाहली?
सुरम्य सुखमंचकीं तुजसि नीज कीं लागली? १६
नवाब्ददिनिं आजच्या कळवळोनि केकारवीं,
अनन्यगति होउनी तुजसि मी प्रभो आळवीं.
परंतु तुज काय कीं अझुनि हांक ऐकूं न ये,
गमे मजसि हें असें परि कधींच होऊं नये. १७
बळेंचि अथवा असें करिसि तूं प्रभो! मानुं का?
कशास करशील तूं परि असें जगन्नायका?
रहस्य तव यांतलें मज परी कळावें कसें?
करीं नटवरा तरी तुज रुचेल आतां तसें! १८
सभक्ति करितां प्रभो! नियत आत्मकर्तव्य मी,
प्रबुद्ध हृदयाब्ज हें तुज समर्पुनी बा! नमीं;
कशास मजला हवी? इतर ही अटाटी फुका
नसेल तुज का तुझी सकल काळजी नायका? १९

---

## ९. जागृतजागृती.

**पद** [ चालः—दो दिवसाची तनु ही......]
जयोऽस्तुते श्रीनंदनंदना विश्वकारणा फणिशयना,
शत वर्षांची गाढ नीज तव दिसे उडाली दयाघना! ध्रु०

---

१ जर्मन बादशहा.

तुज उठवाया झोंपेंतुनि या, यादवराया, परोपरीं,
आळविलें किति परी न आली करुणा तुजला आजवरी;
तुझ्या रसाला परम सोज्ज्वला गातां लीला कवीश्वर,
तसे पवाडे वाडें कोडें थकले गाढ शाहीर;
ब्रीदावलि या, तुज उठवाया सदा गायिल्या जरि सदया,
यश नच कोणा यशोधना तूं दिलें हीच ना भक्तदया ?
असो कसेंही, असो कांहिंही झोंप उडे तव सुलक्षणा !
जयोऽस्तुते श्रीनंदनंदना विश्वकारणा फणिशयना ! १
रथा कुशिवरुनी या कुशिवरती वळलास न जों गोपाला,
पालटला मनु सर्व पूर्विचा भारत जीवन नव प्याला;
प्रेमदिठी जों तुझी किलकिली सहज जाहली वनमाली,
चैतन्याची छवी पसरली, लहरी आनंदा फुटली,
भारतभास्वद्भाग्यभानु हा उदयोन्मुख मज आजि दिसे,
प्रेमकटाक्षाविना तुझ्या का तेज तन्मुखीं तळपतसे ?
समग्र धरणी आंदोळुनि या सभरसली ती एकरसीं—
पहा बुडाली सुखदुःखांच्या संधिकालिं या हृषिकेशी !
असो कसेंही असो कांहिंही झोंप उडे तव सुलक्षणा,
जयोऽस्तुते श्रीनंदनंदना विश्वकारणा फणिशयना ! २
पश्चिम लालीलाल जाहली मांसशोणितीं ती न्हाली,
अस्थिवसांच्या भूषा ल्याली कुरुणदेवी जणुं झाली;
पूर्वभूमिही लाल जाहली प्रेमरसीं ती परि न्हाली,
स्वराज्यभव्यध्वजेखालतीं देवी जणुं ती अवतरली;
ऊर बडवुनी रडे पश्चिमा घळघळ अश्रू ती गाळी,
होउनि बाष्पाकुल ही प्राची हृदय पिटी या सुखकाळीं;
पश्चिम सोडी दीर्घ उसासे हायहायसे तिज झालें,
पूर्व निःश्वसे, आशांदोलीं वरखालीं घे जणुं झोले;
असो कसेंही असो कांहिंही उडे झोंप तव सुलक्षणा,
जयोऽस्तुते श्रीनंदनंदना विश्वकारणा फणिशयना ! ३
पश्चिमजनता परस्परांची गळचेपी ही करावया,
सिद्ध संगरीं पाठ तुझी जों फिरली तिकडे यदुराया;
प्रभासतीर्थीं जशी द्वापरीं करुक्षेत्रिं वा पूर्वि जशी,

घडे यादवी सर्वभक्षका सुरू पश्चिमीं आजि तशी;
बघ पूर्वेला भेदभाव तो सर्व आजला मावळला,
एकत्वाची श्रेष्ठ भावना इथें आज दे गोड फला;
हिंद यवन कीं ख्रिश्चित पारशी अन्योन्यांचे गळ्यामधें—
हात घालुनी भावी स्थितिचा विचार करिती आनंदें;
असो कसेंही असो कांहिंही उडे झोंप तव सुलक्षणा,
जयोऽस्तुते श्रीनंदनंदना विश्वकारणा फणिशयना ! ४

स्वातंत्र्यातें नृपति विघातक तिकडे ठरुनी जगार्दना,
राज्यक्रांत्या कितीक झाल्या नृपति पळाले तपोवना;
सत्त्वविशेषीं भारतदेशीं ‘ विभूति राजा तुझी असे, ’
पूर्व भाव हा सुस्थिर राहे अंतर पडलें यांत नसे;
निज सम्राटा साह्य कराया जनें मनें कीं तनूधनें,
भारतवर्षें कमाल केली साक्षाद् भूपहि धन्य म्हणे;
‘ स्वराज्य हाचि प्रसाद द्यावा सम्राटें त्या मोदभरें, ’
आशा करि ही दीन बिचारा पूर्ण होय ती कधीं बरें ?
असो कसेंही असो कांहिंही झोंप उडे तव सुलक्षणा,
जयोऽस्तुते श्रीनंदनंदना विश्वकारणा फणिशयना ! ५

अत्रिमुनीची सती प्रियतमा सत्त्वाढ्या ‘श्री अनसूया’,
पश्चिम देशीं ‘अनु’ नामें ये अनसूया त्या शिकवाया;
भौतिकवादी जडवादी ती कशी पश्चिमा गोपाला,
हिला बधावी ? परतुनि आली साध्वी भारतसेवेला;
‘ बाल पाल नी गांधि अशी ही त्रिमूर्ति सांप्रत कलिमाजीं,
अभीष्टवरदा असे खरोखर द्याया स्वीकृत यश काजीं;
जें हें कथिलें, आम्हां पटलें नृपा न खपलें अकारण,
तोंड दाबलें स्वस्थ बसविलें करीत देवा, त्वद्ध्यान;
असो कसेंही असो कांहिंही झोंप उडे तव सुलक्षणा,
जयोऽस्तुते श्रीनंदनंदना विश्वकारणा फणिशयना ! ६

जाच भयंकर बंदी दुर्धर जों जों कोणी योजितसे,
मनुज तयांतुनि मुक्त व्हावया पथ बहु यत्नीं काढितसे;
आत्यंतिक जी गाढ निराशा जन्म देतसे आशेला,
निबिडघोरशा तिमिरामाजीं प्रकाश सुखवी नयनाला;

आत्यंतिक जें दुःख तेंच दे जन्म सुखाला नियम असा,
प्रहर रात्रिचे गेल्यावरती उदयाचलिं ये रवि सहसा;
हाचि क्रम परि उलटा होता सर्वचि उलटें होत असे,
तयाहि कारण तुझीच इच्छा तदनुरोध जग चालतसे;
प्रेमदिठी ही सुहास्यमुख हें पुन्हां न फिरवीं गोविंदा,
दुजें न याची भारत याहुनि या घटकेला सुखकंदा !
असो कसेंही असो कांहिंही उडे झोंप तव सुलक्षणा,
जयोऽस्तुते श्रीनंदनंदना विश्वकारणा फणिशयना ! ७

---

## १०. उपालंभभक्ति.

[ विरोध-भक्ति म्हणजे द्वेष्य भावानें आत्मनिवेदन; हा भक्तीचा प्रकार धार्मिक दृष्ट्या सर्वविश्रुतच आहे. त्याचप्रमाणें प्रेमळ भक्त कवींच्या ग्रंथांत ईश्वरालाच कोठें कोठें भक्तिकौतुकानें नांवें ठेवून त्याच्या उखाळ्या पाखाळ्या काढून तद्द्वारां भक्तिप्रेम वाढविण्याचाहि एक प्रकार सर्वविदित आहे. याच प्रकाराला उपालंभ भक्ति नांव देणें अयथार्थ होणार नाहीं; तशासारखा अल्प प्रयत्न नम्र सद्भावानें प्रस्तुत कवितेंत केला आहे. ]

श्लोक [ वृत्त शार्दूलविक्रीडित. ]

श्रीरामा ! ‘अगदीं न राम उरला आर्यामधें संप्रती,’
जो तो विंधितसे असें वदुनियां दुःशब्द आम्हांप्रती,
व्हावें दुःख मनास हें परिसतां कां तें ? मला ना कळे,
नाहीं कीं वचनीयता वचनिं या आम्हीच आहों घळे ! १
आहे हें जरि सत्यतथ्य सगळें आम्हां न तें साहवे,
दोषारोप वृथा जरीहि नसला कोणास तो सोसवे ?
व्यावें कीं जगतीं बरें म्हणवुनी ही आस कोणा नसे ?
रूढीला अपवाद या प्रभुवरा, आम्हींच व्हावें कसें ? २
येतो राग पित्याप्रतीहि वदतां जें सत्य आहे तसें,
अत्युक्ती नच ही न लाघव तसें, हें रूढ लोकीं असे;

---

१ निंदा.

वाटावा न विषाद कां तरि अम्हां ? आम्ही नसूं कीं मृत,
झालों बुद्धचि अप्रबुद्ध अथवा कीं सुप्त कीं जागृत ! ३
रामा ! 'राम तुझ्यामधेंचि न दिसे' कां मी न ऐसें म्हणूं ?
येते हे तरि येरवीं दिवस कां कीं सुप्त तूतें गणूं ?
पोवाडे तव आज जे रघुपते ! गातात मोदें कुणी,
वाटे ते पिउनी तुझी बरळती प्रोक्कीर्ति संमोहिनी ! ४

कोठें ती अभिमानिता तरि तुझी जी रावणा दीपवी ?
कोठें श्रीरविवंशदीप्ति तुजला जी संगरीं जागवी ?
कोठें तें जनतानुरंजन तुझें ? कोठें तुझी दिव्यता ?
कोठें वत्सलता तुझी ? वद तशी कोठें तुझी न्यायता ? ५

केले त्वां नळनीलवानरगणा झुंझारसे झुंजते,
ज्यांचें सद्यश आजही तुजपरी रामायणीं गाजतें;
ज्यांनीं सेतु महा त्वदर्थ रचुनी सिंधूस संरोधिलें,
त्यांच्याहूनहि आजच्या जनगणा क्षुद्रत्व बा त्वां दिलें ! ६

माते आज इथें पुरी अवदसा होती जशी द्वापरीं,
आहे किंबहुना भयंकर विभो ! साक्षात् जणूं आसुरी !
आवृत्ती गतकाळची पुनरपी होते जरी हें खरें,
आला तो तव काळ हा परतुनी शंका न मातें उरे ! ७

सर्वंध्येय उदात्त एकचि असे व्हावी स्वराष्ट्रोन्नती,
साधाया परि साधनें विविधशीं स्वेच्छेपरी योजती;
झाला आज मतीं मतीं गलबला तेणें कली मातला,
जो तो उत्सुक बंधुकंठरुधिर प्राशावया जाहला ! ८

झाले पक्ष अनेक त्यांत बलि जे 'राष्ट्रीय नेमस्त' ते,
श्रीरामा, तव काळिंचे मज गमे सुग्रीव वालीच ते;
राष्ट्राचें मुख जी स्वराष्ट्रपरिषद् 'तारा'च कीं आजची,
दासी तीस करावयास अपुली, विद्वान जो तो रची. ९

सीता त्या समयीं तुझी हरुनियां नेली दशास्यें जशी,
नेली आज हरून हाय ! अमुची बा, भारतश्री तशी;

---

१ मागील कीर्ति.

आपत्ती उभया, परंतु तुळितां वाटे जगन्नायका;
प्राग्वैयक्तिक ती तुझी असुनिया ही हानि सार्वत्रिका![1] १०
वाली निर्दळुनी तदा मिळवुनी सुग्रीवसाहाय्य तूं,
सीता शोधुनि आणिलीस करुनी लंकेंत युद्धक्रतु[2];
सीता ही अमुची कधीं वद तशी येणार आणावया?
अत्याचार करूं नकोस परि तूं पूर्वीपरी चिन्मया! ११
नाना आणि महादजी उभयतां पंतप्रधानाप्रती,
होते कीं प्रिय सारखेच अगदीं, जागा न भेदास ती;
एकाचीं नृपनीतिकार्यपटुता संग्रामपारंगता—
अन्याची; गुण हे स्वराष्ट्रविषयीं आवश्य कीं तत्त्वतां! १२
राहावी बलशालिनी स्वतनु ही ज्यांचा असा हेतु कीं,
राखायास हवींत देहकरणें[3] सारींच त्या सारखीं;
राष्ट्राचेंहि तसेंच मात्र परि हें जे जाणती जाणते,
तंतोतंत अशी स्वदेहतुलना राष्ट्राप्रती शोभते. १३
वाली आजि हवा अम्हांप्रति जसा सुग्रीवही तो हवा,
शिष्टाई स्वयमेव पाहिं करुनी दे भीक ही राघवा!
'सीताशोधन' याच ते उभयही ध्येयाप्रती चिंतिती,
दोघेही बळि एकजीव घडतां हातीं यशःप्राप्ति ती. १४
रामा, आज तुझ्याच जन्मदिवशीं भक्त्या तुला प्रार्थितों,
दे दे या गणपद्वया सुमति दे हें एक मी मागतों;
नाहीं आणिक मागणें मम तुला, देणार दे हें झणीं,
याच्ञा[4] ही मम आजची तव कृपें होवो यशोमालिनी! १५

---

## ११. आजचें ईशस्तवन!

### श्लोक—( शार्दूलविक्रीडित )

वंदाया तुजला जुळोनि कर मी जों शीर्ष हें वांकवी,
जिव्हेला मथवोनि जों तिज तुझ्या संकीर्तनीं जागवी,

---

१ पहिली आपत्ति तुझ्या एकट्यावर असून ही दुसरी सर्वांवर आहे हा अर्थ.
२ रणयज्ञ. ३ देहाचीं इंद्रियें. ४ विनंती.

माझ्या शांत मनें मला चकविलें उन्मत्त तें जाहलें,
  वांकोल्या मज दावुनी भडकलें, बोलावया लागलें ! ॥ १ ॥
'माझ्या पाठिस हात तूं धुउनियां कां रे असा लागसी ?
  डांबोनी मज का असा वरि वरी वांकावया लावशी ?
केलें आजवरी प्रभुस्तवन जें तें काय झालें कमी ?
  नाहीं ज्यास दया तया नमुनियां होसी वृथा का श्रमी ? ॥ २ ॥
'देवांचा सुखसन्निवास म्हणुनी सर्वत्र जो गाजला,
  अन्ना भारत तोचि आज अगदीं मोताद कीं जाहला !
सोन्याचा म्हणतात धूर सगळे जेथें निघावा सदा,
  नांदावी अजि त्याच भारतभुवीं का दुःसहा आपदा ? ॥ ३ ॥
'होतें धान्य जिथें पुरा मिळत कीं मुद्रेस एका मण,
  तेथें आज न षोडशांशहि पुरा; देवा तुझ्या भूषण !
अन्नें सात्त्विक दूध तूप असलीं सोन्यापरी दुर्मिळ,
  वस्त्राचें तर नांवही न वदवे ! ऐशी स्थिती सोज्ज्वळ ॥ ४ ॥
'पोटा अन्न नसे तसें वसनही झांकावया ही तनू
  हीही काय कृपाचि सांग तुझिया देवेश्वराची म्हणूं ?
ईशाज्ञापर वारिवाह न कधीं वेळेवरी वर्षतो,
  कोठें वृष्टि अती अवर्षण कुठें हा योग कीं भोग तो ? ॥ ५ ॥
'देती वृक्ष न पत्रपुष्पसुफळें पूर्वीपरी आजला
  माता भूमि न तेंवि आज पिक वा वापी न देती जला,
घेतां हातिं उद्यम अंगलट ते येती अशी ही स्थिती,
  सेवा काय वदूं ? सुळावरिल त्या पोळीपरी धन्य ती ! ॥ ६ ॥
'कोणी विप्रयुवा अकालिं पडतां क्रव्याद् कालाननीं
  'राजा कारण यास खास,' जनकें तें प्रेत भूपांगणीं—
टाकोनी वदला, 'अधर्म घडला, राजा ! तुझ्या रे करीं,
  त्याचें हें फल !'—गोष्ट एक परिसूं झाली अशी द्वापरीं ! ॥ ७ ॥
'आतां रोज पहा युवेयुवतिही जाती अकालीं किती ?
  आहे यास हिशेब कांहि नच कीं ? ही योग्य कीं दुःस्थिती ?
याचा दोष नृपावरीच तव कीं या दिव्य देवावरी ?
  ओढावें किति कातडें प्रतिदिनीं डोळ्यांवरी रे तरी ! ॥ ८ ॥
'कोठें बाप मरे कुठें तनय वा दोघेहि किंवा कुठें,
  एकाकी जननी कुठें दिसतसे कीं पोरटें एकटें !

कोठें कांत झुरे प्रियेस्तव कुठें कांता रडे त्यास्तव.
ऐशी ही विपरीत बा ! स्थिति इथें मी बोलतों वास्तव. ॥ ९ ॥
' नाना रोग नवे नवे निघुनियां संत्रस्त झाली प्रजा,
डोळे फाडुनि देव हा तरि तुझा अद्यापि पाहे मजा !
ऐशा या अदया शठा म्हण म्हणे ' बापा कृपासागर, '
अंधा डोळस मी म्हणूं तरि कसा मूकासि वागीश्वर ! ॥ १० ॥
' ऐसा निर्दय देव हा मज नको केव्हां न त्या वंदिन,
स्वामी मी तनुचा तुझ्या; नच तुझा केव्हांहि बंदीजन;
पाहूं हात तुझे कसे जुळति हे, वांके कशी कंधरा,
शब्दोच्चार कशी करोनि रसना प्रार्थील विश्वेश्वरा ?' ॥ ११ ॥
गेलें दुष्ट वदोनि चित्त इतुकें; मी हा पिसाटापरी !
तेव्हांपासुनि बा ! उभा तुजपुढें आहें असा श्रीहरी !
अंगीं शक्ति नुरे न हात वळती झाले जणूं हे लुले,
ताठे मान, लवे न हाय ! रसना दुर्दैव हें पातलें ! ॥ १२ ॥
येवो येइल जें पिशाच्च मन तें स्वेच्छेपरी स्वस्थला,
माझी त्यास जरी नसे गरज ती व्हावी कशाला मला ?
शंका एक परी प्रभो ! मज पुढें राहे उभी या क्षणीं,
चित्ता सुंदर माझिया वद दिलें पैशाच्य ऐसें कुणीं ? ॥ १३ ॥
कर्ता एक जसा तसा करविता बा ! तूंचि एक क्षितीं,
वेदांचें करुनी निमित्त कथिलें हें तूंचि सर्वांप्रती !
आले जे सदसद्विचार सहसा माझ्या मनोऽभ्यंतरीं,
श्रेयोऽश्रेय तदीय तें तुज; मला चिंता कशाला तरी ? ॥ १४ ॥
चित्तोद्गारित उग्रदर्प सुमनें किंवा विरोधी म्हणा,
देवा अर्पितसें तुझ्याच चरणीं तैसें सवें या मना;
पूजा ही असलीच आज घडली याला कसें मी करूं ?
माझा दोष तुला, तुझाहि तुजला, तूं तात मी लेंकरूं ! ॥ १५ ॥

---

## १२. भरतभूमि–भाग्य.

**पद** ( चाल—अभिनव मधुलोलुप...... )

जय जय जय भरतभूमि, भाग्यशालिनी ।
तूं विमला तूं कमला कमलवासिनी ॥ ध्रु० ॥
परम रम्य तव मंदिर । लोभनीय किति सुंदर ॥
भूषविती रविचंदिर । पुरवि काम जणुं मंदर ।
तूंच उमा तूंच रमा स्वजनपालिनी ! ॥ जय० १ ॥
वर्षुनियां जल अपार । संमार्जी घन उदार ।
प्रातर्निशि तुझें द्वार । काय न हा चमत्कार ? ।
मल लोटी मलयवायु विश्वमोहिनी ! ॥ जय० २ ॥
द्विज पिकादि वंदीजन । करिती नव नित्य गान ।
करि मयूर मधु नर्तन । महिमा हा काय सान ? ।
भुलवि नयन डुलवि सुमन मधुरहासिनी ! ॥ जय० ३ ॥
श्रीशिवसम नृप महान । दास राजनीतिनिपुण ।
बाजीपरि गुणनिधान । रक्षिति तव कीर्तिमान ।
पुण्यभूमि पावन तूं दुःखवारिणी ! ॥ जय० ४ ॥

---

## १३. भरतभूकृत—ईशवंदन.

श्लोक [ वृत्त—पृथ्वी. ]

‘ अनन्य गतिनें तुला करिति जे प्रभो वंदन,
तदीय करितोसि तूं सकलकामसंपादन; ’
तुझेच जन सांगती परि खरें न कीं वाटतें,
मला न अनुभूति ये मज गमे निराधार तें ! १
तुझे भजक बापुडे मतिविहीन भोळे पिसे,
त्वदीय कृति नाटकी कळति त्या न मातें दिसे;
वृथा तुजसि वानिलें अझुनि वानिती मोहुनी,
परी न गमसी मला अधिक जादुगाराहुनी ! २
स्वकीय हितसाधनीं असुनि दक्ष तूं सारखा,
जनांत परि दाविसी स्वहितपालना पारखा;

परार्थ जगणें हें तुझें सकल चाललें नाटक,
न वह्निविण ये कळों मलिन शुद्ध कीं हाटक ! ३
प्रसंग हरि जोंवरी तुजवरी नसे बेतला,
दया न उपजे तुला तिळहि; ठाउकें हें मला;
न मी बरळ बोलत्यें, तुजसि या क्षणीं दाखले,
शतावधिहि देउनी करिन सिद्ध हें चांगलें ! ४
तुझ्याच जननीप्रती दुरितदक्षसहस्रार्जुनें,
यदा हरि ! विडंबिलें, उघडलीं तुझीं लोचनें;
स्वशत्रु वधिल्यावरी तुज मदीय झाली स्मृती,
तुझी न सुटली अशी स्वपरभावदर्शी मती ! ५
त्वदीय जननीपित्या बहुत मातुलें गांजिलें,
तुझा वध करावया कुजन गोकुळीं धाडिलें;
तशीच तव रुक्मिणी तुज विवरुनी यादवा,
रिपूसि तव द्यावया उघड योजिलें माधवा ! ६
अकीर्तिकर हे असे विषम योग जैं पातले,
स्वतां तुजवरी हरी; असह ते तुला जाहले !
स्वशत्रु वधिल्यावरी तुज मदीय झाली स्मृती,
तुला न सुटली अशी स्वपरभावदर्शी मती ! ७
मनोज्ञतनुशोभिनी नवमृणालिनी केतकी,
सुमंजुमधुभाषिणी हृदयहारिणी जानकी;
विदेहनृपनंदिनी, रघुसुकीर्तिसंवर्धिनी,
तुझी सुभग गेहिनी गुणखनी मनःस्वामिनी ! ८
दशास्य हरुनी तुझी गुणवती अशी भामिनी,
यदा रडत हिंडवी तुजसि दंडका काननीं !
अनावर कसा तुझा तुजसि कोप तैं जाहला,
अजांडचि गिळावया प्रलयकाल कीं पातला ! ९
प्रचंडरणसंगरीं अतुल शौर्य तैं वेंचिलें,
सबंधुसुतपौत्रही दशमुखा तुवां मर्दिलें;
स्वशत्रु वधिल्यावरी तुज मदीय झाली स्मृती !
तुला न सुटली अशी स्वपरभावदर्शी मती ! १०
जशी शिशुपणामधें स्वपरभावद्वयभावना,
कधीं न सहसा वसे जनमनांत नारायणा !

समग्र सम बालकां, निजसुखांत तीं रंगती,
न भेद रिपुमित्र हा, तुळिति त्या तुझ्मा संगतीं ! ११
असेच अवतारिं त्या प्रथम पंच मत्स्यादिकीं,
तुला न शिवली कधीं स्वपर भावना घातकी;
मदर्थ किति तेधवां अमित कष्ट तूं सोसिले,
बटुत्व सरतां परी स्वपरभूत संचारलें ! १२
नकोचि परि आज बा, तुजसि कांहिं बोलावया,
न शक्ति उरली दिसे तुज मदर्थ धांवावया;
जनापरि तुलाहि कीं जरठता गमे पातली,
म्हणोत कुणि बुद्धता परि तिचीच ती सावली ! १३
तुझ्यांत मनुजांत या म्हणुनिया अगा दांभिका,
नसेचि मजला परी तुज तरी दिसे भेद का ?
तरीहि तुज वंदितां मजसि धन्यता वाटतें,
विपत्तिनिवहीं मना किमपि शांतता लाधते. १४
म्हणोनि तुज चिंतित्यें स्मरुनियां तुझीं पावलें,
असह्यतर यातना सहत भावि आशाबलें;
कधीं वद तरी विभो ! दशम कल्कि तूं होउनी,
विमुक्त करशील या मज कटूग्र दुःखांतुनी ? १५

---

## १४. अभीप्सिताष्टक.

**श्लोक** [ वृत्त मंदाक्रांता. ]

इच्छा कांहीं धरुनि हृदयीं आपुल्या विश्वकर्मा,
घाली मातें भरतभुवनीं श्रेष्ठ मानुष्यजन्मा;
आहे मातें उदरभरणावेगळें कर्म कांहीं,
राहो याची स्मृति मज विभो नित्य विज्ञापना ही. १
मिथ्याभाषी विमति शठ कीं, कृष्ण बाह्यांतरांत,
ठेवो कोणी अशिंच दुसरीं निंद्य नांवें अनंत;
आहें बापा, तरिहि तव मी पुत्र याची सदा ही,
राहो माझी स्मृति मज अशी नित्य विज्ञापना ही. २
मातेहूनी प्रियतर दुजी मानवां वस्तु नाहीं,
तैसा त्यातें प्रियतर सखा एक तो धर्म पाहीं;

दोहोंहूनी गुरुतर परी मूल्य तें जन्मभूचें,
वागो माझ्या स्मरण सदया, मानसीं नित्य याचें. ३
कांहीं केलें तरि मनुज तो पंगु तेंवी अपूर्ण,
ब्रह्मांडांचा अधिपति खरा एक बा, तूंचि पूर्ण;
पूर्णासंगें तुशिं न समता म्यां अपूर्णें करावी,
याची माझ्या स्मृति परि विभो नित्य चित्तीं वसावी. ४
पापात्मे ते विभवशिखरीं पाहतों नांदतांना,
तेवीं पाहीं सतत बुडतां आपदीं सज्जनांना;
बाह्यान्न्यायी गमसि, तरिही पूर्ण तूं न्यायशाली,
निष्ठा माझी दृढबल अशी राहुं दे सर्वकालीं. ५
दैवासंगें जरि झगडतां हातटेंकीस आलों,
वस्त्रान्नातें जरिहि अथवा पारखा आजि झालों,
माझ्याहूनी कितितरि दुजे देशबंधू सुदीन,
राहो त्यांचे असुखहरणीं चित्त हें स्वार्थहीन. ६
ईशल्लाभें किति हुरळतों आपणां मानिं धन्य,
किंचिद्धानी तशिच घडतां होतसें विश्व शून्य;
दोहोंचाही जनक परि तो तत्त्वतां एक मीच,
राहो याची स्मृति मज तुला प्रार्थना नित्य हीच. ७
सांगायातें परहित जनां जीभ सैराट धांवे,
कार्याकार्यीं निजगत परी मन्मती मोह पावे;
हस्तें कांहीं कृति न घडतां बोलणें वाउगें तें,
राहो याची स्मृति मज सदा मागणें हेंच तूं तें. ८
आपत्कालीं स्मरुनि तुजशीं फोडुनी दीर्घ टाहो,
सैरावैरा तुज हुडकतों जेथ तेथें पहा हो;
हा! हा! बापा, असुनि परि तूं नित्य माझ्याचपाशीं,
याची ही का स्मृति वद तुला भाकुं मी द्यावयाशीं? ९

---



# तरंग २ रा.

## १. विलक्षण कैदी !

अभंग.

विश्वकारागारीं । देहाचे पंजरीं,
पांखरूं निर्धारी । बंदी एक. १
पंजर सुदृढ । चर्मे मढवीला,
अस्थींच्या आगंळा । अवजड ! २
नाड्या, मज्जा, तंतू । ऐशा शृंखळांनीं,
पंजर बांधोनी । दृढ केला ! ३
ऐसा बंदोबस्त । जरी अटोकाट,
पांखरूं अफाट । अचाट ही ! ४
कैसें कुठोनीयां । निघे बाहेर तें,
वेगें जातें येतें । स्वेच्छेपरी ! ५
निर्भय चित्तानें । प्राज्यीं अविभाज्यीं,
स्वानंदसाम्राज्यीं । बैसोनीयां ! ६
दावोनी वांकोल्या । धाकी ब्रह्मांडासीं,
खंडी तें काळासी । सामर्थ्यानें ! ७
पडे विश्व थीटें । खेळतां लिंगोऱ्या,
काळाच्या भिंगोऱ्या । करोनीयां ! ८
देई झुगारोनी । समाजबंधनें,
राजाचीं शासनें । पायीं घाली ! ९
मानी ना तें कोणा । विलक्षण ऐसें,
जोविलें बारसें । देवांचेंही ! १०
देवांचा तें देव । राजांचाही राजा,
लावी सर्वां बाजा । करायासी ! ११
सर्वां धिक्कारोनी । बोले तें हासत,
या हो ! भालाईत । राऊतांनो ! १२

विश्वींच्या राजांनो । राजसेवकांनो,
कर्णचर्वकांनो । या या वेगें ! १३
ज्याची माय मज । त्यालीसे धराया,
पाहूं द्या कीं तया । एकवार ! १४
धरूं जातां मशीं । काय लागे हातीं ?
पंजराची माती । घ्यावी सुखें ! १५
मोडक्या तोडक्या । देहाच्या कोठड्या,
हाडें काड्या मोड्या । पंजराच्या ! १६
बोलोनीयां ऐसें । चावी रद सदा,
हासे खदखदा । तिरस्कारें ! १७
काय त्याची कांती । काय त्याचें रूप,
काय त्याचा हूप । विलक्षण ! १८
काय त्याची कळा । काय त्याची लीळा,
जाणे तो सांवळा । परब्रह्म ! १९
याची रूपरेखा । केली नारायणें,
सहाच शब्दानें । गीतेमाजीं ! २०
जगाच्या मोक्षाला । किंवा बंधनाला,
कारण एकला । हाच कैदी ! २१
ऐशा बंदिवाना । घाली कडसणी,
धन्य तोचि प्राणी । लोकीं तिन्ही ! २२
त्याच्या पायीं करी । मनसा-काया-वाचा,
नति अनंताचा—। तनय हा ! २३

---

## २. मुक्त कोण ?

पद. ( धांव रे राम राया...... )

सावधान सावधान । कसें ठायीं न भान ? ॥
घरांत यादवी ही । काय जाळिलें ज्ञान ? ॥ ध्रु० ॥
इंद्रियें भिन्न भिन्न । अंग परंतु एक ।
दांतांहि आपुल्याच । ओठ का व्हावे भग्न ? ॥ साव० १ ॥
अंग हें माझें माझें । म्हणतसुं जरि चोजें ।
हातांत गोसाव्याचे । परि शेळीचे कान ॥ साव० २ ॥

मातींत घोळसीली । पाठ परंतु नाक—।
आमुचें वरि खासें । काय हा अभिमान ? ॥ साव० ३ ॥
एकाच दावणीचीं । गुरें हीं चेंगरलीं ।
एकाच जुवाखालीं । बांधिलीं मुक्त कोण ? ॥ साव० ४ ॥
बोलतां उणेंदूणें । बंधूच रिपु झाले ।
हातां न कांहि आलें । किति करूं बुझवण ? ॥ साव० ५ ॥

---

## ३. *परिस्थितिप्रभाव.

साक्या.

विलासभुवनीं स्वर्णपंजरीं श्रुतिहरवाक् शुक नामी,
होता, ज्याची सदैव रंगे वाणी विठ्ठलनामीं. १
' लटपटपंची, तूं कोणाचा, ' शब्द मधुर हे त्याचे,
गृहस्थ जन ते सुखें परिसतां हर्षति मनिं बहु साचें. २
एके दिवशीं विपिननिवासी नव शुक त्या स्थलिं आला,
पंजरबद्ध स्वबंधु बघतां खिन्न अंतरीं झाला. ३
स्वतंत्रतेचा तनय लाडका बोले तो शुक त्याला,
' चल रे भाऊ, चल रे जाऊं अपुल्या मूळ घराला. ' ४
पंजरवासी वदे शुक तया ' ये या सुखभुवनांत,
राहूं आपण आनंदानें मधुर फळें बा खात. ' ५
' कारागृहिं या तुजहि न जागा पंख पूर्ण पसराया,
कशास आणिक मला बाहसी ? चल त्या वनिं विहराया. ' ६
' हा ! हा ! भाऊ, गगनमंडपा कैसें वेंधुनि जावें,
न कळे मातें थकतां दमतां सांग कुठें बैसावें ? ' ७
' गा गा अपुलीं वनस्थलींचीं स्वातंत्र्याचीं गाणीं,
पुरे, मुळमुळू नको रडत ही कथुं मज कर्म-कहाणी. ' ८
' ये ये दादा मज शेजारीं बैस सौख्य हें पाहीं,
विद्वानांचीं चतुर भाषणें ऐकवितों तुज कांहीं. ' ९

---

* वंग कविसम्राट् रविन्द्रनाथ टागोर यांच्या ' गार्डनर ' काव्यापैकीं एका चुटक्याचें रूपांतर.

'हा! हा! वेड्या निसर्गगान न शिकवूं येई कोणा,
कितिही पोहो मनुज तरीही मत्स्यसाम्य पावेना.' १०
'दुर्दैवी मी वनस्थलींचीं येति न गीतें मातें—
गाया, आतां काय करूं मी लज्जाकुल मन होतें!' ११
अन्योन्यांच्या सहवासाची उभयांही बहु आस,
लाभावा परि कसा तयां तो? जे का स्वस्थितिदास. १२
जाति-गोत-कुल-रूप एक, तरि मुळींच त्या उभयांना,
पंखाशीं निज पंख भिडवुनी नभिं उडतां येईना! १३
परस्परांचा परिचय व्हावा, सुंदर हेतु मनीं ते—
धरुनि निरखिती मुधा तृषाकुल नयनीं अन्योन्यांतें. १४
पुनः पुनः फडफडवुनि पंखा जणुं ते अन्योन्यांशीं,
वदति 'सख्या ये, गड्या झणीं ये प्रेमें माझ्यापाशीं.' १५
वनशुक बोले, 'काय करूं बा! येई मज तव कींव,
द्वार-आर्गळा, लोहशलाका भिववीति जीव अतीव!' १६
केंविलवाण्या दीनविरावें पंजरशुक त्या बोले,
'सजीव माझे पंख परी हा! विलुलित मृतसम झाले!' १७

---

## ४. चित्रमय जगत्.

पद [ चाल:—भूपती खरे ते वैभव...... ]

कां सया मानसा! कुढशी कढशी जळशी?
कासया स्वतांशीं खाशी रात्रंदिवशीं? ध्रु०
हा नियम जगाचा खेद कशाला त्याचा,
व्यवहार तयाचा असाच चालायाचा;
हें नव्हें आजचें कैक युगें बा झालीं,
ही रीत तयाची अशीच चालत आली;
काल बा चित्रमय होतें जग जसें,
आजला चित्रमय पाहीं तें तसें,
राहील चित्रमय उद्यांहि वाटे मजशीं,
ही पुरे खिन्नता मुळीं न शोभे तुजशीं. १
चालतां पुढें तूं ओढिल तुज तें मागें,
चालतां बरोबर भरील तुज तें रागें;

चालतां भिवोनी हळूंच मार्गे मार्गे,
तें काढुनि चिमटे करील तुजला जागें;
　　नयनिधी रामचंद्रा तें निंदितें,
　　नळनृपा न्यायनिपुणाही निंदितें,
निंदितें तसें श्रीकृष्ण कर्मकुशलासी,
तव कथा बापुड्या ! तुळितां काय तयाशीं ?　　२

राहोत कथा या जुन्या; भोंवतीं पाहीं,
ही सृष्टि आजची दुजें न शिकवी कांहीं;
ते दादा, माधव, लाल, बाल कीं पाल,
ते सुरेंद्र, मेथा, वाच्छा, बसु, गोपाल;
　　हे लाल भरतभूमीचे आजचे,
　　सर्वदां निरत कल्याणीं ते तिचे,
परि, असा न कोणी वंद्य सकल लोकांसी,
जाहला यांतला मौज पहा ही कैशी !　　३

'छूः' म्हणेल तुजला पाठलाग दुसऱ्याचा,
हें करील पळही धरिं न भरंवसा त्याचा;
रडवील तुला हें रडेल तुजसांगातीं,
हंसवील तुला हें हंसेल तुजला वरती;
　　'मोरया' करिल तुजलागीं हेंच बा,
　　कीं करील तुजला वेडा 'गावबा';
परि त्याच जगाचा तूंहि घटक रे असशी,
बा, कधीं पडोना विस्मृति याची तुजसी.　　४

———

## ५. भारतसंदेश.

श्लोक—[ वृत्त—शार्दूलविक्रीडित. ]

राष्ट्राच्या कलहानलीं भयद या विश्वास जो आक्रमी,
व्हावा भारत नामशेष नच हा त्याच्यासवें कीं तुम्हीं;
हाडाचे असतील जे मम खरे सत्पुत्र मानी महा,
त्यां सर्वां कथि मी स्वयेंचि अपुला निर्वाण संदेश हा.　　१

स्वार्थातें अपुल्या तुम्ही न बघतां अत्यल्पही यापुढें,
राष्ट्राचे हितपालनीं निरत व्हा द्या दृष्टि त्याच्याकडे;
जाऊं द्या चमडी परी न कवडी सोडा तयाच्याविणें,
व्हावें सौख्यद आपणां जरि गमें हें राहिलेलें जिणें ! २
घेवोनी परकीय वस्तु सदना शृंगारिलें आदरें,
अंधांनो ! दिसते न का ? परि तुम्ही कंगाल झालात रे !
आतां सावध व्हा अझूनि तरि कीं वस्तू विदेशी जरी,
नेत्रां मोहक भासल्या किति जरी घ्या त्या न तुम्ही तरी— ३
वागा स्वैरपणें यथारुचि सदा माझी नसे त्यास ना,
ठेवा केश शिरीं सुखें विनटुनी नाचा जशा अंगना;
काढा भांग कचानुरंजन करा कीं लुक्कैणें लावुनी,
घाला जाकिट कोट कीं खमिसही टोपी रवी-रक्षिणी; ४
रूपीं बाह्य तरी न भेद विलसे नारीनरीं संप्रती,
काढा पौरुषचिन्ह, हें, उपटुनी दावावया निश्चितीं,
नाहीं गोफ जरी नसोचि तरि तो बांधा गळांबांधणी,
आहे मान तुम्हां करा विदित हें माना अशा बांधुनी ! ५
शेंडी गोष्पदमात्र कीं निजशिरीं ठेवा सुखें मापुनी,
मुंडा क्षौर करोनि तुंड अवघें ठेवा मिशा दाभणी;
बंड्या अंगरखें तशीं उपरणीं घेवोनियां आदरें,
नेसा पातळ छान छान हलकीं प्रेमें तुम्ही धोतरें; ६
काढा रुंद भल्या यथारुचि निऱ्या मोजोनि वीतेवरी,
किंवा बारिक बोट बोट अगदीं काढा छक्कोपरी;
लावा लाल ललाटिं गंध अडवें किंवा उभें साजिरें,
तैशी रेखिव बिंदुमात्र टिकली ठेवाचि वा पांढरें; ७
जोडा लाल चढाव कीं चरचरा दीर्घारवें गर्जता,
घाला छान खडाव जी चटचटा वाजे पथीं चालतां;
बूटांहीं अथवा पदें विनटवा घ्या हौसही फेडुनी,
बाह्यीं वेष कसाहि घ्या परि असा हो हिंदवी आंतुनी. ८
बाबांनो ! तुमचा हितप्रद सदा हो स्वार्थ आयाप्रती,
जावो एक कपर्दिका न सहसा अन्यास कीं संप्रती,

१ पोम्याटम्. २ सोलर किंवा सन्-ह्याट. ३ नेक्टाय.

जाडा कीं भरडा स्वदेशि कपडा मानोनियां पावन,
घ्यावा तोचि सदा, विदेशवसनीं पावा न संमोहन! ९
मद्यावांचुनि यांसही न मिळवें कीं मांसखंडाविणें,
राहे भोजन यांवुनीच जरि तें, माझें तुम्हां सांगणें—
धर्माधर्म तुम्ही मुळीं न बघतां जें जें मना आवडे,
भक्षा चीनजनापरी सकलही मानूं नका वावडें! १०
सेवावें न विदेशि अन्न परि कीं गेला जरी प्राणही,
प्यावें पेय तसें कधीं न परकीं जावो लया देहही;
'आहारापरि बुद्धि ही घडतसे सिद्धांत हा प्रांजळ,
खातां भक्षुनि दीप तो वमतसे काळें न का काजळ?' ११
जें कांहीं निजदेशभू निपजवी वाईट कीं चांगलें,
याचा ना करितां विचार कधिंही तें पाहिजे भक्षिलें;
वाढो तेविं तनू अणू न तुमची दुष्टान्न कीं सेवुनी,
होवो रक्त तसें न दूषित कधीं अन्यासव प्राशुनी. १२
देशी कागद कृष्ण धूर्ण जरिही कृष्णापरी मानुनी,
घ्यावा तोचि, तशीच देशि मशिही, देशीच घ्या लेखणी;
येवो अक्षर चांग दीन अथवा वाटो न तें सांकडें,
भाषा लक्ष शिका परी सतत द्या लक्ष स्वभाषेकडे! १३
अन्यांच्या स्तुतिनें अवास्तव अशा संमूढ होवोनियां,
माझे बोल न हे तिरस्कृत करा द्या एक हें आजि या;
कोणी कांहिं वदो नका ढुरळुं कीं संक्षुब्ध संमोहुनी,
पाळा हे नियमें सुनिश्चितपणें कर्तव्य संमानुनी. १४
जें कांहीं निजदेशभू निपजवी सर्वंसहा निश्चिती,
सेवायास खरें असें उचित कीं तें भारतीयांप्रती;
चित्तेवाचि सतेज आर्यसुत जे ते यापरी वागुनी,
माझे कष्ट निवारणार्थ झटती सोत्साह रात्रंदिनीं. १५
ऐकोनी मम हा विलक्षण असा संदेश जो आजचा,
निंदाया सजतीलही मज कुणी उच्चारुनी दुर्वचा;
'एकांगी' उपहासुनी वदति कीं 'स्वार्थी' तसेंही कुणी,
याचें मर्म परंतु जाणति खरे जे भारती वाङ्मनीं! १६

---

१ काळसर म्हणून त्याज्य.

## ६. माझा वसंत.*

श्लोक [ वृत्त शार्दूलविक्रीडित. ]

१

कोणी लावुनि साश्रु दृष्टि अपुली त्या भूतकालावरी,
बोले निःश्वसुनी, 'अहा! किति तदा होतों सुखी मी तरी';
होता तोच खरा वसंत मम हें आलें न तेव्हां कळों,
होतें छान किती जरी मज पुन्हां येईल मागें वळों! १
झाला जो हुत काल कालदहनीं आतां न त्याच्यास्तव,
कांहीं लाभ रडून, वास्तव, गमे वा गाउनी गौरव;
गेला काल पुन्हां कधीं न परते येई न वा जावया,
त्याच्यासन्निध आपणांस कधिं ही सत्सौख्य सेवावया! २

२

कोणी सोत्सुक साभिलाष नयनीं पाही पुढें सारखा,
बोले आज उद्यां वसंत म्हणिं तो येईल माझा सखा;
आनंदी सुखमग्न कीं बहुपरी तेव्हांच होईन मी,
कालाची गति आजि कां परि अशी झाली कळेना कमी? ३
भावी काल तसा कळे न कधिं तो येणार केव्हां कसा,
नाहीं ठाउक रूपही, भरंवसा द्यावा तयाचा कसा?
रूपें दिव्य सतेज दीप असुनी पोटीं निघे काजळ,
कोणा ठाउक कीं निघेल म्हणुनी शंभू[1] दुरात्मा खळ! ४

३

पाहें मी परि आजच्याच सुखद प्रेमी वसंताकडे,
वाटे वोगरिलें वदान्य विबुधीं पीयूष माझ्यापुढें;
खंडे भूतभविष्य दोन जुळवी मध्यें कडी होउनी,
लाभो ही घटिका सदैव मजला वासंतिका मोहिनी! ५
कालाचें किति भाग्य वानुं तरि या नाहीं तयाला तुला,
आहे तो प्रिय बंधु मित्र अथवा कीं शत्रुही आपुला;

---

* 'Ella Wheeler Wilcox' च्या 'Now' या चुटक्याचा अनुवाद.
१ संभाजी.

प्रेमें देइ नरा सहाय्य सहसा व्हायास नारायण,
किंवा लोळवि नारकीं करवुनी कर्में करीं भीषण! ६

---

## ७. परतंत्र कोण ?



साक्या.

" चल रे राजा सरजा माझ्या किती राहसी मागें.
ओढ लागली गळयास माझे देह ओढतां भागे ! १
पाय जरासा उचल भराभर नको अंग रे काढूं,
सर्व भार हा नको नको मज एकावरती पाडूं. २
मुक्कामातें गांठूं वेगें पुरेत आढेवेढे,
अल्प विसावा घेऊं चवळत चाल चार करवाडे. ३
अपुल्या योगें दुःख परांना होइल करणी ऐशी—
कधिं न करावी ऐक सांगतों तव मी मित्र हितैषी. ४

गोड असावें ज्याला त्याला हवें हवेंसें व्हावें,
डोळ्यांमध्यें जरी घातलें तरिहि न त्यांत खुपावें. " ५
" गड्या प्रधान्या ! वागुनि ऐसें काय मिळविलें ? सांग,
नीतिनिपुण तूं कार्यकुशल तूं तुझा न लागे थांग ! ६
तूं न जेवशी कधीं तुपाशीं मी न उपाशी राहें,
तुजला मजला एक निवारा एकचि गोठा पाहे ! ७
द्वाड, मारका, चुकार म्हणुनी फार न देती कामा,
तूंचि कामसू तुझ्याच भोंती घालिति सर्व हमामा ! ८
तूं गाड्याला, तूं नाड्याला, नांगरठीला तूंच,
वेळपरत्वें माकणीसही येशी कामा तूंच. ९
'गरीब हा बहु ' नांवाजुनि तुज चटोर पोरें सारीं,
बैसुनियां तव पाठीवरती सदैव भरती स्वारीं. १०
शिंग शेंपटीं धरती कोणी, टोंचि पराणी कोणी;
वशिंड हलवी, ओढी रोषें वेसण-दोरी कोणी. ११
कोण दरारा माझा,--माझ्या वाऱ्यालाही कोणी,
उभे न राहे; फूं फूं करितां पळती दहा दिशांनीं ! १२
शुद्ध बैल मी जरी तरीही कथितों रे तुजलागीं,
मलाहि कांहीं असे भावना वृत्तिहि माझी जागी. १३
पर्यायानें सर्व जिवांचे मनोधर्म ते एक,
सुखदुःखांची जाणिव सर्वां समान असते देख. १४
क्षुधातृषांच्या पीडा सर्वां समान होती पाहीं,
श्वापदपक्षी पशुमानव हा भेद तयांना नाहीं. १५
चर्मचक्षुला असा विशद परि भेद दिसे जो कांहीं,
गमे साधनाविणें तयाला कारण दुसरें नाहीं. १६
फलें विहंगा, तृण आम्हांला अन्न तसें मनुजांना,
उदकवायु हीं, पहा चमत्कृति, एकचि परि सकलांना. १७
वस्तुस्थिति ही, का मग मनुजें आम्हांला दडपावें ?
जीवसृष्टिचा राजा म्हणुनी काय तयें मिरवावें ? १८
नसे मनोहर रंग रूप, कीं वाणी मधु, यासाठीं--
मतिमन्मनुजें काय तडाखे द्यावे अमुचे पाठीं ? १९
रात्र न म्हणतां दिवस न म्हणतां कृतघ्न मनुजासाठीं,
नानाविध रे कष्ट करूं जरि गेलें पोट खपाटीं. २०

नाना धान्यें शेतीं पिकवूं, परंतु आम्हांलागीं,
धान्याचा कण कधिंहि न मिळतो; जन्माचे हतभागी ! २१
गाड्यामधुनी, विमानांतुनी, बसुनी आरामांत,
फिरती मानव, ओझें आम्ही ओढूं धुरळा खात ! २२
जुलुम भयंकर, असह अनादर, मला तरी ना सोसे,
'प्रतिकारा'नें 'विना शस्त्र' मी त्यांस करीन नकोसें. २३
'सत्याग्रह' हा हटातटानें चालवुनी वा स्वांगें,
रंकमेवरती आणावें त्यां, हेतु मनीं हा वागे." २४
"प्रथमाचि कळले असे तुझे हे राजा आज विचार,
न कळे कोठुनि तुझ्या मस्तकीं शिरले वेडे चार. २५
स्वातंत्र्याची आवड तुज बहु, मोलमर्म परि त्याचें,
नसे तत्त्वतां ठाउक तुजसी कौतुक वाटे याचें. २६
स्वातंत्र्याचे पुतळे ऐसे गमती, मनुज तुला जे,
तसे न ते परि पहा अंतरीं; दास नाम त्यां साजे. २७
आम्ही जेवीं दास तयांचे, तेहि आमुचे तेवीं;
अन्योन्याश्रित असूं परस्पर, तत्त्व मनीं हें ठेवीं; २८
भर्ताभार्या, पितापुत्र, हीं अन्योन्याश्रित नातीं;
एकाभावीं एक शून्यता पावे; शोधीं स्वान्तीं. २९
नियमित कालीं चारापाणी आम्हां घालायास—
बांधिल मानव, तो त्यापुरता न का आमुचा दास ? ३०
थंडीवाऱ्यापासुनि यत्नें आम्हां रक्षायास,
बांधिल मानव, तो त्यापुरता न का आमुचा दास ? ३१
विमार्गगामी होउनि आम्ही भ्रष्ट न व्हावें, यास,
बांधिल मानव, तो त्यापुरता न का आमुचा दास ? ३२
बेंदुर पोळा दसऱ्याला कीं आम्हां सजवायास,
बांधिल मानव, तो त्यापुरता न का आमुचा दास ? ३३
शेंड्या शिंगीं, शिरिं बाशिंगें, भिंगें बांधायास,
बांधिल मानव. तो त्यापुरता न का आमुचा दास ? ३४
घंठा कंठीं पायीं पैंजण झूलहि घालायास,
बांधिल मानव, तो त्यापुरता न का आमुचा दास ? ३५
दुष्काळीं बघ जीवित अमुचें सयत्न रक्षायास,
बांधिल मानव तो त्यापुरता न का आमुचा दास ? ३६

मार्ग आमुचा कुणीं रोधितां दूर कराया त्यास,
बांधिल मानव, तो त्यापुरता न का आमुचा दास? ३७
दोषी आम्ही, उजू तरीही बाजू दावायास,
बांधिल मानव, तो त्यापुरता न का आमुचा दास? ३८
पात्रीं उष्टें उरलेंसुरलें आम्हां चारायास,
बांधिल मानव-तो त्यापुरता न का आमुचा दास? ३९
निर्बल आम्ही, अबुद्ध आम्ही, आम्हालागीं म्हणून—
सांभाळाया मनुज धाडिलें देवें स्वर्गांतून. ४०
ईशेच्छेचे विरुद्ध यास्तव कधीं न जावें आम्हीं,
हेंचि भूषणास्पद रे आम्हां, हितकरही परिणामीं." ४१
"गड्या प्रधान्या, एकतंत्र तूं, कळे न तुजला कांहीं;
पायापुरतें मात्र पाहसी दूरदृष्टि तुज नाहीं! ४२
वनिंविपिनीं वा कंदरकुहरीं वसती भाईबंद,
आप्त आपुले, बघतां दिसती मूर्तिमंत आनंद! ४३
सुधातुल्य जल यथेच्छ पीती यथारुचीनें खाती;
धुंद; दृष्टिही ठरे न बघतां सतेज ऐशी कांती. ४४
पुच्छ उभारुनि पाठीवरती स्वैर उधळती जेव्हां,
काय मौज ती? काय वर्णवे! तृप्ति न बघतां तेव्हां! ४५
लालबुंद ते नेत्र भयंकर साक्षात् खदिरांगार,
मत्त गजापरि धुंद सदोदित भीती पशुही क्रूर. ४६
उभे करोनी तयासंन्निधीं आम्हां चित्र लिहावें,
खुशाल मग तूं स्वातंत्र्याचे गोड गोडवे गावे. ४७
स्वातंत्र्याचे खरे पुत्र ते, आम्ही मानवदास;
काड्यामोड्यांचीं रे औतें, होतो जीव उदास! ४८
पशुपक्ष्यांना जड भूतांना केले ज्यानें स्वाहा,
स्वातंत्र्याचा साक्षात् रिपु नर वाटे साधु तुला हा! ४९
चराचरान्वित जग हें न पुरे स्वार्थि नराला खाया,
दाबुनि नरडें स्वबांधवांही लावी जो रावाया! ५०
जातिबंधुची ओळख नाहीं असा प्राणि हा एक,
वाटावा तो तुला महात्मा; हाही एक विवेक! ५१
स्वार्थापुढती निजधर्माची, निजदेशाची ज्यास,
ओळख नाहीं, ऐसा प्राणी एकचि मानव खास! ५२

ईशनियोजित अन्नपानही न रुचे बापा, ज्यातें,
ऐसा प्राणी नर प्रधान्या ! एकचि दिसतो मातें ! ५३
यथाऋतू जे विहार सुंदर, ओळख ज्या न तयांची,
ऐसा प्राणी एकचि नर तव; सीमा स्वैरपणाची ! ५४
' बुद्धिज्ञानप्रधान मानव ' स्वयेंचि वदुनि विवेक,
दिवा आपुला अपुल्याभोंतीं ओवाळी नर एक ! ५५
जशी न कामा आम्हां अमुची पाठीवरची गोणी,
ज्ञानी मनुजा तसें ज्ञान तें; फोल न माझी वाणी ! ५६
भिन्नाकृतिच्या जातभाईंनीं—छे ! तव मानवदासें,
अपूर्व खंडी स्वातंत्र्यास्तव युद्ध मांडिलें खासें ! ५७
आप्त जिवाचा तूं तर त्यांचा साह्य कराया त्यास,
चल रे दाऽदा करीं तांतडी पाउल उचलायास. ५८
शांतवृत्ति, तूं प्रेमळ भाविक, सात्त्विक, तत्त्वविचारी,
तुझी नि माझी जोड न जमणें; केवळ मी व्यवहारी. ५९
दास नराचा तुझ्या प्रधान्या ! आला चाबुक पाहीं;
वाजत गाजत सणण ! परी बा चिंता नलगे कांहीं. ६०
बहुविध रंगी बेरंगी, बघ गोंडे छान तयास;
खुळ खुळ खुळ त्या कड्या वाजती लागेल न तो खास!" ६१

---



# तरंग ३ रा.



## १. वंचित शकुंतला !*

[ महाभाग दुष्यंतानें ' मी तुला ओळखीत नाहीं, ' असें बोलून धीक्कृत केलेली शकुंतला ' आतां पुढें काय करावें असें चिंतन करीत असतां स्वतःशीं म्हणतेः—]

पद [ चालः—अर्धतनू वाळलीं........... ]

झालें, सरलें, शकुंतले तव काय राहिलें तळां,
सुखाचा पर्वकाल संपला ! ध्रु०
प्रणयपत्रिका प्रणयभरें जी प्रेष्ठ[1] प्राणेश्वरा,
प्रेषिली§ प्रियंवदेसह पुरा;
फाडुनि तुकडे तिचे उधळिले त्वेषें वाऱ्यावरी,
भाजिली अथवा अग्नीवरी;
गवससी मृगीपरि तूं या दावानलीं,
कीं पडे गळोनी गुलाब–कोमल–कळी,
लागली जणूं कीं शफरी धीवर–गळीं,
बरोचि हेंही प्रणयमुद्रिका गळली यमुनातळां.
वृथा जी गमती त्या अर्गळा !
प्रणयपत्रिका, प्रणयमुद्रिका विस्मृतिकुंडामधें—
जाळिली ज्या त्वां आतां सुधे !
गतकाळींचीं मधुवचनें ज्या भरलीं हृदयामधें,
जाळिलें तेंही त्वां का सुधे !
अन्योन्यसंगमीं प्रणयमूढ होउनी,
गुरुजना वंचुनी, विषयरस प्राशुनी;
वेंचिल्या विशेषें वासंतिक यामिनी,

---

* 'Ella Wheeler Wilcox' च्या 'Is it done ?' या चुटक्याचें रूपांतर. १ अत्यंत प्रियकर. § पाठविली.

काय जाळिल्या ज्या सोंवियल्या गळयांत घालुनि गळा,
तसाही स्वप्नसुखाचा मळा ! २
सहृदयगात्रें स्फुरित करोनी पुलकित आकंपनें,
करिति जीं प्रणयाचिन्ह चुंबनें;
आत्मसंयमाभावीं मधुतर विगतसुखाचा जया-
वीट ये हृदया नृपराजया !
तें उष्ण मनोहर मृदुल करस्पर्शन,
उसळवी रक्त जें धमनीधमनींतुन,
कीं घुमे अजुनि जो ध्वनि या कर्णांतुन,
पंचु ! पंच या विषयसुखांचा अभिनव सुंदर कळा,
जाळिला काय तुवां सोज्ज्वळा ? ३
आयुष्याची रम्य नाटिका काय आज संपली,
इतिश्री सर्वचि का जाहली ?
दिवे फुंकुनी जरि हा पडदा तुवां ओढिला पहा,
तरी का जातिल नट हे गृहा ?
छे ! नव्हे; निजेंतहि जागृत ते होउनी,
अपमानविद्ध ते त्रुटित खिन्नशा मनीं,
या निबिड तमींही विलपुनि करुण स्वनीं,
कामें अपुलीं करतिल ढाळित बाष्पबिंदु ढळढळा,
पहा तूं मौज सुखें ती खळा ! ४

---

## २. हृदयराग !*

पद [ चालः—अजि अकुर हा...... ]

तव दृष्टि सख्या मोहक लोलविलोल,
निस्तेज आजि का बोल ? ध्रु०
ती शोधितसे माझा अंतःसिंधु,
सागरास जैसा इंदु;

---

* डॉ. रवींद्रनाथ यांच्या गार्डनर काव्यापैकीं २८ व्या चुटक्याचा अनुवाद.

मी माझ्या या जीवित-पाटावाचा,
तंतु तंतु उकलिला साचा;
मीं तुझिया सर्व समोर,
केला कीं करुनी धीर,
हृदयाचा आविष्कार,
तुज म्हणुनि न का वाटे माझें मोल ?
बोल बा एकदां बोल ! १
जरि असतें तें माणिक बहु मोलाचें,
शत तुकडे करुनी त्याचे;
ते गुंफुनियां—सुंदर त्यांची कंठी,
घालित्यें अशी तव कंठीं;
तें असतें कीं जरी मनोहर सुमन,
अशि देत्यें मुरडत हंसुन;
तो हृदयराग रमणीचा,
ना अंत पार ना ज्याचा—
कधिं कोणा लागायाचा,
तूं शोधुं नको; तें तुज कधिं न दिसेल,
सांभाळ, जाइल तोल ! २
जरि सौख्याची झुळुक गोड ती असती,
तरि सहजीं हास्यीं फुलती;
जरि दुःखाचि तें असतें तरि विरघळुनी,
दिसतें तुज असुरूपांनीं;
मग अंतरिंचें गुपीत सारें कळुनी,
शब्दाविण येतें ध्यानीं;
तें प्रेम परी रमणीचें,
उपमान एक त्या त्याचें,
साम्य त्या नभाला कैंचें ?
तें जवळ तुझें थांग न परि लागेल,
यत्न सर्व होतिल फोल ! ३

---

## ३ श्रीकृष्णदर्शनोत्कंठिता राधा !*

पद [ चालः—प्रीति जी तुजावरि.......]

‘ कृष्णाची स्वारी अपुलया । जाणार मंदिरावरुनी ’ ॥ जननि गे ॥
शब्द जों न कर्णी आला । जीव जणूं वारा प्याला ॥ जन० ॥
लागे न हात कामाला । कांहींहि न सुचे मजला ॥ जन० ॥
वद कैशी वेणी घालूं ? । नेसुं का काजळी शालू ? ॥ जन० ॥
चंद्रकळा नेसूं काळी ? । कोणती घालुं कांचोळी ? ॥ जन० ॥
मजकडे । अशी का जडे ? । दृष्टि तव गडे ।
सांग कीं जननी । हंसुं कां तव चमके वदनीं ? ॥ जन० ॥ १ ॥
एकदांहि डोळे नुसता । उचलुनी कन्हय्या पुरता—॥ जन० ॥
पाहील न मुळिंही मातें । जाणोनि असें मी पुरतें ॥ जन० ॥
निमिषांत डोळियापुढुनी । जाईल दूर तो निघुनी ॥ जन० ॥
ध्वनि मात्र दुरुनि वेणूचा । स्फुंदत कीं येइल साचा ॥ जन० ॥
व्रजलाल खास गे जननी । जाइल कीं दारावरुनी ॥ जन० ॥
संग्रहीं । असे जें कांहिं । सर्व तें पाहिं ।
आजि काढूनी । लेइुन मी माझीं लेणीं ॥ जन० ॥ २ ॥

× × ×

सूर्य जों न उगवे गगनीं । रथ गेला दारावरुनी ॥ जन० ॥
बघुनि कृष्ण डोळेभरुनी । सांठविला अंतःकरणीं ॥ जन० ॥
पदर झणीं तोंडावरुनी । न भितां मी दूर करोनी ॥ जन० ॥
कंठांतिल माणिकमाळ । तोडिली न करितां वेळ ॥ जन० ॥
मणि दिले सर्व उधळोनी । ओवाळुनि त्याच्यावरुनी ॥ जन० ॥
कां अशी ? । टकमका मशीं । सांग पाहसी ।
नवल का जननी ? । वद वाटे तुजलागोनी ? ॥ जन० ॥ ३ ॥
घेतली न माझी माला । त्यानें हें ठावें मजला ॥ जन० ॥
गवसुनि रथचक्राखालीं । माणिकें सर्व तीं फुटलीं ॥ जन० ॥
पथिं उठे चिन्ह आरक्त । दावि किती मन आसक्त ॥ जन० ॥
अर्पिलें काय म्यां कोणा । ठावें हें नाहीं कोणा ॥ जन० ॥
परि गेला दारावरुनी । दडवित रथ गोकुलरमणी ॥ जन० ॥

---

* डॉ. रवींद्रनाथ यांच्या गार्डनर काव्यापैकीं ७ व्या चुटक्याचा अनुवाद.

ओढुनी । हृदयिंचा मणी । दिला उधळुनी ।
त्यास चिंतोनी । ओवाळुनि त्याचे वरुनी ॥ जन० ॥ ४ ॥

---

## ४. वंजुलकुंज.

[ भक्तमाणिमालामेरु राधा श्रीकृष्ण विरहानें व्याकूळ होऊन मधुवनांत भटकत असतां सहजगत्या ती श्रीकृष्णाचे आवडत्या वंजुल कुंजाजवळ आली, त्यावेळीं त्या उभयतांचा जो संवाद झाला तो असाः—]

श्लोक—( वृत्त शार्दूलविक्रीडित )

राधाः—' हा ! कुंजा, जगलासि केंवि अझुनी तूं श्रीहरीवांचुनी,
मातें गूढ निगूढ हें, न उकलें, मी मूढ संमोहुनी;
कुंजा, तूंच सुखैकवास हरिचा रात्रंदिशींचा असा,
त्याचें अल्पहि भान नाहिं; अससी होतास पूर्वी जसा ! १
' वारा, पाउस, थंडि ऊन अथवा कांहीं न हें पाहतां,
केला वास तुझ्यासमेत हरिनें सर्वश्रुता ही कथा;
ऐसें हें असतां वियोग तुजला त्याचा कसा सोसवे ?
कैसे तेविं विलासभोग तुज हे रोजीं सुचावे नवे ? २
' वेणू वाजवते कशी तुज ? तुझी शाबास कीं वंजुला,
तैसा हा तरुवृंदही तव किती सोत्कंठ आनंदला,
वेली या फुलनी कशा डंवरल्या उत्साह कीं मांडिला,
गुंजारंजि मिलिंद मंजु करिती कुंजीं निकुंजीं तुला ! ३
' नोहे हा परिहास हास अथवा उल्हास नोहे तसा,
कुंजा, हा उपहास खास हरिचा त्वां मांडिला कीं असा !
कृष्णाच्या विरहें बरीच तुज ही आली उदासीनता,
शोभे त्वत्सम भाविकांस, नितरां नाम्या उदासी नतां ! ' ४
वंजुलः—' बोले का वृषभानुचीच दुहिता श्रीकृष्णसंमोहिनी ?
गोपीगोपहि जीस आज गणती ' श्री ' गोकुळाची जनीं !
ब्हावें दीर्घ युगासमान पळही जीतें हरीवांचुनी,
ती तूं का अनयप्रिया गुणमयी आनंदसंवर्धिनी ? ५
' छे ! छे ! हें नच संभवे तिळभरी त्याच्या वियोगामुळें,
सांडी ती जड जीवितास अपुल्या हें आजि मातें कळे,

श्रीराधा गुणशालिनी विजयिनी ती तूंच साक्षात्स्वयें !
वाटे हें न खरें वदे न तुशिं मी; तूं तापिशाची अये ! ६
' हा ! हा ! या करुणस्वनीं विलपुनी संग्याकुले राधिके,
कोणी दाउनि दर्शनीय असलीं क्षुद्रापरी नाटकें,
धीरोदात्त उदारधी सुकृति जे त्यांचें न हें शील कीं,
दुःखें ते झुरती, मनांत झुरती, ना दाविती लौकिकीं ! ७
' दुःखानें जळतो किती निज मनीं रात्रंदिनीं हा गिरी,
दावी तो न कधीं परंतु वरती, तो चूर चित्तांतरीं !
एकांतीं परि गे निशीथ समयीं जाऊनि राधे ! पहा,
दुःखाचा कटु तीव्र उष्ण किति तो निःश्वास सोडी महा ! ८
' दुःखाचा वडवा कसा कढतसे क्षीराब्धिचे अंतरीं,
मर्यादा त्यजुनी कधींहि तरि का तो दाखवी तें वरी ?
तेंवी भूजठरा कितीक पडल्या खांचा तरी त्यांप्रती,
दावी काय कधीं तुझ्यासम अहा ! आक्रंदुनी ती सती ? ९
' माझ्या काय मनांत कृष्णविरहें होतें दिसे तें तुला,
सारें हा ! विपरीत, योग्यचि असे, वाटे विचारें मला;
' नाहीं मत्सम मान्य अन्य हरिला, ' गर्वांध तूं या भ्रमें,
किंवा तूं अपल्यावरूनि करिसी माझी परीक्षा गमे ! १०
' राधे, काय गमे तुलाहि जगिं मी माझ्याचसाठीं जगें ?
सांगाया जनते स्वदुःख अथवा मी जीवितों काय गे ?
झालें आज जगास दुःख अपुलें वाटे तुला का कमी ?
सारावा निजदुःखभार वरती त्यांच्यापुढें कीं अम्हीं ! ११
' राधे, त्वत्सम द्रवचित्त विरहें येतील जे जे कुणी,
सांगाया स्वमनव्यथा मज, मला मित्रापरी मानुनी;
त्यांना शांतविणें धरोनि हृदयीं देऊनि आलिंगना,
हें मद्ध्येय, असे न वेळ मजला मद्दुःखसंलापना ! " १२

स्रग्धरा.

अन्योन्यां विंधितां तीं त्यजुनि सदयता तीव्र शब्दप्रहारें,
रागाची त्याच कालीं अवशलहरि ती संपली या प्रकारें;
दुःखानें जों द्रवोनी विहगरव मिषें कुंज लागे रडाया,
राधाही त्या विलापीं विरहरव तदा लागली मेळवाया ! १३

## मधुवन.

[ वरील वंजुलकुंज ही कविता आरंभीं लिहिली तेव्हां खालील स्वरूपाची होती. माझे सन्मान्य कविमित्र रा. रा. ए. पां. रेंदाळकर यांच्या सूचनेवरून तिला मागून वृत्तस्वरूप दिलें. माझ्या पुष्कळ मित्रांना वंजुलकुंजाचें मूळचें स्वरूपच विशेष आवडलें असल्यामुळें तेंहि येथें दाखवीत आहे. ]

पद [ चालः—दे रे हरि संतपदाची........... ]

" हरिविण सांग कसा जगलास ? मधुवन. ध्रु०
कुंजवना तूं रात्रंदिसचा हरिचा सौख्यनिवास. १
ऊन न वारा, पाणि न पाउस, हरि करि तव सहवास. २
हरिविरहाचा गंधहि नच तुज, असलि जसा होतास. ३
सुचती रुचती पचती कैसे तुज हे भोगविलास ? ४
मुरलीरव तूं आजहि घुमविसि. धन्य तुझी शाबास ! ५
निलाजरे हे तव तरु सारे, दाखविती उल्हास. ६
फुलवेली चौंफेर फुलोनी, आला बहर उतास. ७
परिहास न हा उल्हास न हा, हा हरिचा उपहास ! ८
कुंजनिकुंजों गुंजारुंजी, सुचती तव मधुपास ! ९
हरिविरहाचे छान मधुवना, भरलें तुज औदास्य ! " १०
" कोण वदे वृषभानु-लाडकी, हरिचा जीस ध्यास ? ११
परिसें परि मी हरिविरहें ती होउनि पूर्ण हताश-- १२
धरुनि धोसरा श्रीकृष्णाचा सांडी कीं जीवास. १३
कृष्णसखी राधाच काय तूं, बोध न होय मनास. १४
मी न वदें तुशि. राधेची तूं असलि पिशाची खास ! " १५

---

## ५. गलिताभिमान राधा !

पद. ( घनश्याम सुंदरा...... )

हरिणकिशोरीपरी भिरिभिरी बघतां मी त्या वनीं,
दमलें बसलें, हताश झालें उदासमन होउनी; ध्रु०
कुठें असावा मना विसावा मनोभृंग तो हरी,
शोधित होत्यें डोळे मिटुनी लावुनि हृदयांतरीं;

कसा काय कीं, कुठुनि काय कीं एकाएकीं गडे,
चोर पावलीं, ये वनमाली माझ्या मागें दडे;
झांकायातें मन्नयनांतें विलासलीलापरें,
वृंदामिहिरें मदनसुंदरें दवाग्निदामोदरें,
गालीं हंसुनी कर लांबवुनी नयनाब्जें झांकलीं,
अद्भुत घडलें, कधिं न पाहिलें. विकसित तीं जाहलीं;
कोण असे तें ठाउक होतें दचकुनि तरि त्या क्षणीं,
वदलें 'मेला कोण दांडगा येइ इथेंही वनीं ?'  १
मिथ्या कोपें प्रणयविकोपें खवळुनि जणुं नागिणी,
वदलें त्याला 'मातलासि तूं कथित्यें गृहिं जाउनी; '
त्वरित निघालें पुढं चाललें परि या दुबळ्या मनें,
वळुनि पहाया परत चिथविलीं लोललोललोचनें;
तोंचि माधवें येउनि माझे धरुनी दोन्ही कर,
वदे 'जाउनी मीच सांगतों चल गे गृहिं सत्वर; '
पुन्हां लागतां तत्कर हातां प्रेमरोमहर्षणीं,
बाहुमृणालयद्वय हें माझें कंपित झालें क्षणीं;
तेंहि दाबलें परि बहु यत्नीं 'सोडिं मला' बोलुनी,
'काय बाइ ही अशी धिटाई कथित्यें गृहिं जाउनी'!  २
'थांब थांब कीं गडे राधिके ऐक एक गोष्ट ही,
कीरें इकडे तो कान सांगतों जाई मग तूं गृहीं;'*
वदुनि असें जों कानापाशीं मुख तो आणि हरी.
श्वसनें त्याचीं उष्ण लागलीं बावरलें अंतरीं;
'इश्श काय हें' वदत्यें जों मी 'विद्रुमफलरक्तिमा—
बघुं दे' वदला 'कितिक लाजवी गुलाब-सुमनोत्तमा; '
बोलुनि ऐसें गालासरिसें ओष्ठ आणि जों बळें,
काय जाहलें, नच वदवें तें माझें मज ना कळे;
विद्युल्लेखेपरी चमकुनी कांहीं क्षणिं मन्मनीं,
थरें जाहलें, रुधिर धांवलें धमनीधमनींतुनी;  ३
तनू प्रस्फुरे. चित्त बावरे मोदभरें मी डुलें,
प्रसन्न झालें, भान हरपलें, आह्यंतर रंगलें;

* डॉ. रवींद्रनाथ यांच्या गार्डनर काव्यापैकीं ३६ व्या चुटक्याची किंचित् छाया.

करपदनयनें हृदयमनोसुख मोहनशीलेंद्रियें,
प्रफुल्ल होउनि फुले तडागीं जेविं पद्मिनी अये !
मधुर माधवा मोहुनि तत्करजालीं लोटावया—
तनु मीं सजलें तों अभिमानें जागृत होवोनियां;
पूर्व वंचना स्मरवुनि मातें मागें मज ओढिलें,
मीहि तेधवां लटिक्या कोपें हरीस झिडकारिलें;
सखि त्या सरसीं अकरुणराशी अदृश झाला हरी,
सोडुनि गेला मला ठेवुनी विलपत करुणस्वरीं;
भानुदर्शनोत्सुका विरहिणी जेविं पद्मिनी सरीं,
अक्षमिषानें भृंगावलिची स्मरणी ओढुनि करीं;
व्रजभानूस्तव मीहि तपतसें प्राण नयनिं आणुनी,
अश्रुबिंदुच्या मणिमालेचे पटपट मणि ओढुनी ! ४

---

## ६. वद वाट किती तव पाहूं* ?

[ श्रीकृष्ण भक्तमणिमालामेरु राधेस कुंजवनांत एकाकी सोडून गेले असतां ती श्रीकृष्णविरहानें वेडी होऊन म्हणते:— ]

पद. ( चाल:—उद्यां बघ जातें..... )

कशी मी राहूं । वद वाट किती तव पाहूं ? ॥ ध्रु० ॥
मधेंच कृष्णा टाकुनि मजसी,
कसा कुठें गा ! वद तूं रमसी ?
स्मृतिहि न माझी हो का तुजसी ?
धीर धरवेना । कशि कृष्णा येई न करुणा ? ॥ १ ॥
प्रातःसंध्या ही सुकुमारी,
रत्नाभरणीं नटली भारी,
ठुमके मुरडे किती मुरारी !
मात्सर्याचें । हास्य तिच्या वदनीं नाचे ! ॥ २ ॥
बघुनि बावरी माझी वृत्ती,
उच्छृंखलशा बालेपरि ती,

---

* Ella Wheeler Wilcox च्या Impatience या चुटक्याचा अनुवाद.

थांबुनि चेष्टा करि मम कुमती,
कशी वद साहूं । विरहभार कुठवर वाहूं ? ॥ ३ ॥
संध्येनें या सुख सेवावें,
परि मीं दुःखें मात्र कढावें,
भिरिभिरि तुजला बघत फिरावें,
'हरपलें काय '। पुसतां हृदिं पडती घाय ! ॥ ४ ॥
दीर्घ उसासे किति सोडावे,
मधेंच घळघळ रडत बसावें,
वेड्यापरि हें गाणें गावें—
' कशी मी राहूं । वद वाट किती तव पाहूं ! ' ॥ ५ ॥
पूर्वी मधुवनिं मंजुलकुंजीं,
मधुरालापीं प्रेमल गुंजीं,
घालविल्या ज्या घडि माधवजी !
किती वेगें त्या । भर भर भर धांवत होत्या ! ॥ ६ ॥
थांबत नव्हत्या 'थांबा' म्हणतां,
विरंगुळा ज्या ठावा नव्हता,
खेळ तयांना सुचती आतां,
भोग दैवाचे । दूषण परि त्यांना कैंचें ! ॥ ७ ॥
घाई हा त्या शब्दाचि नाहीं,
आतां अठत्रे लंगडशायी,
ओंजळ भरुनी नवपुष्पांहीं,
सांजसकाळ । उधाळिति या रानोमाळ ! ॥ ८ ॥
डोळे मिचकित खुदुखुदु हंसती,
वसंतकुंजीं लपती छपती,
गाणें माझें परि न ऐकती,
' कशी मी राहूं । वद वाट किती तव पाहूं ? ' ॥ ९ ॥
स्वप्नीं दर्शन तव गोविंदा !
घडवी जी मज नंदानंदा !
निशा मात्र ती भासे सुखदा,
मूढ मी होतें । तव संगीं रंगुनि जातें ! ॥ १० ॥
भावि सुखाशा उदित होउनी,
रमतें जों तव मधुरदर्शनीं,

काळ जातसे भरभर सरुनी,
' कशी साहूं, ' तें । गान न या वदनीं येतें ! ॥ ११ ॥
गतरात्रीची मंत्रावलि ते,
प्रभात होतां विलया जाते,
संनिध मम तव मूर्ति न दिसते,
कशी मी राहूं । वद वाट किती तव पाहूं ? ॥ १२ ॥
संयम आतां प्राणविसावा,
कळुनि चुके हें मजसि माधवा !
दुर्लभ दर्शन तव या जीवा,
कशी मी राहूं । वद वाट किती तव पाहूं ? ॥ १३ ॥
तव मधु दर्शन पुनरपि व्हाया,
हवा कितीतरि काल जावया,
दिवस मास कीं वर्षें लया !
कशी परि साहूं । वद वाट किती तव पाहूं ? ॥ १४ ॥
सूक्ष्म तमोमय जीवित ऐसें,
तव दृष्टीच्या रविप्रकाशें,
होय समुज्ज्वल तोंवरि खासें,
कशी मी साहूं । वद वाट किती तव पाहूं ? ॥ १५ ॥
येउनि गाढालिंगन देउनि,
करशिल राधा भाग्यशालिनी,
तोंवरि एकाकी या विपिनीं,
कशी मी राहूं । वद वाट किती तव पाहूं ? ॥ १६ ॥

## ७. राधाप्रसादन. *

[ लोकप्रवादानें विषण्णचित्त झालेल्या भक्तमणिमालामेरु राधेची श्रीकृष्ण समजूत घालीत आहेत. ]

पद [ चालः—अंमळ अंगाई......... ]

राधे, हिमकाल, विलयास, जाइल दुःख कशास,
कथिलें तुज होतें, हा खास, जाइल मृत्युपयास. राधे०

* Ella Wheeler Wilcox च्या I told you या चुटक्याचा अनुवाद.

मलयानिल मंद, सानंद, वसंतजीवनकंद,
येतां स्वच्छंद, समरंद, घेउनि चंदनगंध;
वृषभानू-बाळे, वेल्हाळे, करील मुख हा काळे,
कथिलें तुज ऐसें, सोल्हास, केला त्वां मधु हास;
वदलिस मजलागीं, मृदुलांगी, वृंदाचपलकुरंगी,
मलयजलहरीला, हा मेला, वश्य न होइल काळा;
केवळ फूत्कारें, गरलभरें केले विहत क्रूरें—
वनतरुसुमनांस, विहगांस, जीं कां मदनविलास ! १
होतें तुज कथिलें, इंदुकले मन्मतिमोहनशीले,
शांत मनें लक्षीं, मीनाक्षी, रविच्या प्रेमकटाक्षीं,
विरतिल हीं अभ्रें, एकसरीं, दिगंत जातिल दूरी;
प्रसन्न हें गगन, होऊन, विमल दिसेल वितान;
हांसत मधु गालीं, सुखदोलीं, बसतिल वसंतवेलीं;
डुलतिल वनांतरीं, सुमभारीं, शीतल मंद समीरीं;
मधुबंदीभृंग, सुखदंग, गातां चढेल रंग,
करुनी पिक कूजा, सुखभाजा, करतिल माधवपूजा;
आला सत्यपणा, वचनास, बघ हा नच आभास. २
अयि लीलागाधे, प्रेमसुधे, राधे बुधानुराधे,
मद्वच जरि साधे, ऐक मुदें, त्यांतचि तव हित साधे;
दुर्दिन लवलाहें, सखि पाहे, जातिल विलया तव हे,
शंका तुजविषयीं, जन विषयीं, घेती अकरुण हृदयीं;
संशय परि त्यांचे, अनयाचे, तैसे व्रजवनितांचे,
मिथ्या आरोप, अपलाप, जातिल आपोआप;
भक्तिसुधासरिता, उसळोनी, तव हृत्कुहरांतोनी,
मंजुलमधुमुखरा, मजलाही, बुडविल निजप्रवाहीं;
तव मुखिं पावेल, ती भद्रा, माझ्या हृदयसमुद्रा,
होइल पूर्ण सुख, घे भाक, तव मुखिं मोदमयूख,
करुनी नृत्यास, सविलास, होइल दुःखनिरास ! ३
सुखदुःखीं भेद, नच विलसे, कथिलें तुज मीं ऐसें,
व्याकृत सुखरूप, दुःख असे, दुग्धाचें दधि जैसें;
दुःखें जीव जरी, विमोहितो, विहत न तरि तो होतो,
मूर्च्छित हृदय जरी, निमिषभरी, झालें गे सुकुमारी;

चित्रमयी जगती, मूर्तिमती, भुलवी रमवी सुमती,
स्निग्ध प्रेमरसें, ती विलसे, दुःखा विश्रम भासे,
काल तसा चतुर, दुःखहर, पाडी दुःखा विसर;
काव्यमयी सृष्टि, प्रेमदिठीं, कालासहित समष्टी,
दुःखाकुल हृदया, उठवोनी, जागृत शीघ्र करोनी;
बैसविती प्राज्यीं, अविभाज्यीं, अभिनव सुखसाम्राज्यीं,
मोदें हांसविती, गुंगविती, दुःख दिगंता नेती,
भविष्यवादि असा, चतुरतर, काय न वद मी सुगिर ?
बघतां बघतांना, विकासलें, फूल तुझें हें फुललें,
गेलें दुःख तुझें, वोसरलें, अवघें विलया गेलें;
भ्रुकुटी विस्तरल्या, तरतरल्या, हास्यनिमग्ना झाल्या,
नयनाब्जें फुललीं, बघ पडली, गोड खळी या गालीं;
सुंदर चिंचोळी, हनू–कळी, हास्योद्रेकें फुलली,
आतां बघ बघ हा, मधु हास, आला खास उतास ! ४

---

## ८. गुपित ! *



[ चाल—तुझ्या गळां माझ्या गळां.........]

मौजेचा, सौख्याचा, दिवस खरा आनंदाचा,
कितितरि बाई सोन्याचा, माझ्या दुर्लभ भाग्याचा !
नका पुसूं, नका पुसूं, गालीं खेळे कसें हंसू,
आनंदाचे झरति असूं, कारण त्याचें नका पुसूं !
जीवाच्या, जीवींचें, गुपीत माझ्या हर्षाचें,
कुपींत भरलें हृदयाचें, कधिं न कुणा सांगायाचें ! १

शेलारी, अंजीरी, लेइ मही हिरवी गुजरी,
गगनाखालीं निळया निळ्या, वृक्ष लाविती झिलमिल्या—

---

* Ella Wheeler wilcox च्या A maiden's secret या चुटक्याचें रूपांतर.



पानांच्या हिरव्या पिंवळ्या, मधें जाइच्या गोड कळ्या !
पूर्वि अशी, सुखराशी, सृष्टि न दिसली कधीं मशी,
कशी कशी गे कशी कशी, राणी राजाचीच जशी !
दिवसभरी, खरोखरी, जरी राबल्यें परोपरी,
फुटल्या हर्षाच्या लहरी, शीण न झाला हृदंतरीं !
ते बोल, बिनमोल, सांठविले हृदयीं खोल,
त्यांहीं पडली मज भूल, हृदयाला जडलें खूळ !
मुखिं बसले, मनिं मिनले, शब्द तेच गाणें झालें,
गुणगुणतां तें मन डोले, सुखदोलीं घेतें झोले !
शब्दासीं, जरि परिसी, शुकाचार्य पंजरवासी,
बोलाया ते परि त्यासी, येतिल नच वाटे मजसी !          २

सखु वन्से, दीर तसे होतीं खेळत ओटिवरी,
मामंजी ते देवघरीं, सासू तांदुळ–डाळ करी !
पुतळीशी, त्या दिवशीं, कोपऱ्यांत दारापाशीं,
उभि होत्यें गे अपुल्याशीं, खेळत मी सासुरवासी !

प्रेमखनी, हृदयमणि, स्वारी आली तों सदनीं,
बघतां सहजी निरखोनी, अंधारांतिल त्या कोणीं—
मी दिसलें, फुल फुललें, 'कोण उभें तेथें' पुसलें,
'मी आहें' तों मीं म्हटलें, आनंदें वेडी झालें !
अगबाई, हें कायी, सांगितलें सगळें कांहीं,
शब्द एकही परि पाहीं, यापुढतीं कळणें नाहीं !
अळीमिळी, गोपचिळी, आतां अगदीं मूग गिळी,
ओठांच्या या दोन्हि फळ्या, घट्ट पहा पुरत्या मिटल्या ! ३

---



# तरंग ४ था.

## १. मा-झें-कुं-ड-ल !*

पद ( चाल--चंद्रकांत राजाची...... )

पानिपताच्या पुण्य पुरातन त्या धारातीर्थीं,
निजला शयनीं वीर मृत्युचे प्रथितोज्ज्वलकीर्ति ! १
तिथें न होतें कुणी तयाचे जवळ आंतड्याचें,
कठिण समय तो—अशा प्रसंगीं कोणि न कोणाचें ! २
अश्रुजलाचे दोन बिंदुही कोणी गाळाया—
मायामोहें नव्हतें तेथें भीषण रणठायां; ३
मित्र तयाचा परंतु होता जवळ उभा तेथें,
करुण दृष्टिनें बघत त्याकडे ढाळित अश्रूतें; ४
धीर देउनी वदे ' काळजी नको करूं लेश,
असेल कांहीं सांग तरी तव अंतिम संदेश; ' ५
बहु दीनत्वें अश्रुसमाकुल नयनें मित्राचे--
लावुनि वदनीं वदे धरुनि तो स्वकरीं कर त्याचे; ६
' पुन्हां न आतां दर्शन होणें मला जन्मभूचें.
घरीं जाउनी सांग शब्द हे माझे शेवटचे; ७
तसेंच माझें स्मरणचिन्ह हें दे त्या प्रीतीचें,
कुंडलचा मी—माझें कुंडल कृष्णा-कांठींचें ! १
' घरापुढील त्या विशालांगणीं बकुलतरूखालीं,
दुःखदवार्ता परिसाया मम जमतिल ज्या कालीं; १
सांग बंधुंना आप्तां सुहृदां रण बहु शौर्यानें,
केलें आम्हीं ' मारूं मरूं कां, ' अशा निश्चयानें; २
अस्ताचलिं जों चढे दिवाकर संध्या समयासी,
अगणित पडल्या वीरशवांच्या राशीवर राशी; ३

---

* Hon. Mrs. Norton च्या Bingen on the Rhine या सुंदर कवितेचें रूपांतर.

झाले काळे केश रुपेरी ज्यांचें समरांत,
असेहि होते शवांमधें त्या कीं मरणारांत. ४
ओठावरचा जार जयांच्या नसे वाळलाही,
असेहि होते नव्या दमाचे तरुण त्यांत कांहीं; ५
त्यांतचि होता ' शंभु सितोळा ' नांव असें ज्याचें,
कुंडलचा त्या–सुंदर कुंडल कृष्णा–कांठींचें ! २
' सांग जाउनी आईला कीं, मुलें तुझीं दुसरीं,
येतिल कामा तुला वृद्धपणीं चिंता तूं न करीं; १
' रक्त लागलें वाहूं पुनरपि भिजलें बघ कुडतें,
शिणका सणणण अंगीं मारिती गोळी ती सलते; ' २
' भिजलें कुडतें ? काढुं काय मी ? ' ' नको राहुं दे कीं,
भाड्याचें घर झालें खालीं नको व्यर्थ शोखीं; ' ३
' खुशालचेंडू सदा वागलों—कैंचें घरदार !
बंदीखान्यापरी गमे तें दुःसह अनिवार ! ४
बाबा माझा मर्द मराठा खरा शूरवीर,
स्वप्नांतहि ज्या अयश न ठावें समरधीरहीर; ५
स्वानुभूत ज्या भयद रणकथा त्यानें सांगाव्या,
बालत्वींही समुत्कटमनें त्या मीं परिसाव्या; ६
विभक्त झालों आम्ही, जातां बाबा स्वर्लोकीं,
खड्गाविण या अन्य वस्तुंना नच मी शिवलों कीं; ७
बालपणींची हौस काय ती–माझी तरवार,
प्राणाहुनिही प्रिय मज होती केवल सुखसार; ८
चमकति रविकर तिथें टांगली भिंतीवर घरचे,
रम्य कुंडलीं—कुंडल माझें कृष्णा–कांठींचें ! ३
' मस्तक झालें सुंभ बहिरलें, सुचे न रे कांहीं, '
' हात देउनी उठवूं का तुज ? ' ' शक्ति गड्या नाहीं ! १
काय खुपे बघ कमरेखालीं, ' ' तुझीच समशेर, '
' सार दूर ती, गुंघडति डोळे सगळा अंधेर ! २
आनंदानें ' हर हर ' गर्जत नाचत डौलानें,
येतां गांवीं विजयमदोत्कट सैनिक मजवीणें; ३
सांग ताइला माझ्यासाठीं स्कुंदस्कुंदोन,
नको रडूं तूं नको बसूं तूं पदिं घालुनि घोण; ४

अभिमानानें विलोलनयनीं तूं त्यांना पाहीं,
वीरबंधु तूं नच तव भ्याला बंधु मृत्युलाही; ५
एकासाठीं जीव तुटे हा परि आतां काय ?
सर्वस्वीं मी ताई झालों हताश निरुपाय; ६
जन्मांतरिंचा वैरि तिचा जणुं सोडुनि असहाय,
परलोकातें सजे जावया हाय करूं काय ? ७
भाविसुखावरि दृष्टि ठेवुनी दुर्धर हा काळ--
लोटाया तिज नसे एकही हाय ! पोरबाळ ! ८
' घसा कोरडा न बोलवे दे पाण्याचा घोट,
बोलायाचें पुष्कळ, शक्ति न, कोरडले ओठ ! ९
' नाहिं येंबही, ' ' नसो बरें तर-तिज सांभाळावें,
सांग ताइला हेंचि मागतों तें त्वां पुरवावें; १०
रहा पतीसह घरीं येउनी घे तें घर तुजला,
भाउबिजेची हीच देणगी चोळिबांगडीला ! ११
एक याचना तुला आणखी, माझी समशेर,
बाबांची कीं केवल जी का आम्हां सुखसार ! १२
ठेवीं होती जिथें तिथें ती मानास्तव साचें—
कुंडलच्या गे—कंडल माझें कृष्णा-कांठींचें ! ४
' सांग सखीला-ता-रे-ला.........
मृगबाला ती अकपटहृदया दुर्दैवी अबला ! १
जिला न ठावे चाळे नखरे तरुण अंगनांचे,
पापभीरु ती भूषण आम्हां शूर सितोळ्यांचें; २
कळतां माझें निधनवृत्त ती वक्षःस्थल पिटुनी,
करील कांहीं जीवाचेंही दुःखानें झुरुनी; ३
सांग तिला कीं, आज रात्रि मी-कारण वटकेंत,
जाइल माझा प्राण खरोखर सोडुनि तनु येथ; ४
जों न वेंघतो इंदु गगन हें इहदुःखांतूनी,
जाइन वरती स्वर्भुवनीं मी विमुक्त होऊनी; ५
' घंटा घण घण कर्णीं वाजे खेळ संपलाच,
रुम् झुम् रुम् झुम् ऐक अप्सरा करिती वरि नाच; ' ६
' वेड्यापरि का असें वरळसी ? जाऊं का निघुनी ?'
' थांब जरासा, तारा आली, जा तिज भेटूनी; ' ७

'खूळ लागलें तुज, मी जातों.' 'नको थांब थोडा,
काय बोललों ? अमल विसावा घेऊं दे थोडा; ८
हं; आठवलें; सांग तिला कीं ताई तुजसि सदा,
करील जीवप्राण खरोखर दुखविल लव न कदा; ९
तंत्रानें परि तिचे वाग, मच नणंद तिज मानीं,
बहिणीपरि ती वागवील तुज, धरिं वच हें ध्यानीं; १०
स्वप्नसुखीं मी धरुनि तिचा कर हरिखें हातांत,
किती विहरलों गात गात ही द्राक्षवाटिकांत; ११
वन्यवल्लरी वसनाच्छादित गिरिशिखरावरती,
अनुपम शोभा सखे निरखिली काय वर्णवें ती ! १२
जियें लकाकति पीत किरण ते बाल भास्कराचे,
सुंदर कुंडलि—कुंडल माझें कृष्णा—कांठींचें ! ५
'लग्नापूर्वी कृष्णेकांठीं खेळ खेळलों जे,
दिसले मज ते जणूं आजही खेळतसूं चोजें; १
दरड्यांवरुनी कसे घसरलों कांव्यांचीं वोडीं,
कशीं उधळिलीं; अनुभविली ती आज पुन्हां गोडी; २
ईशभक्तिच्या नव पेडांचें, नवल—पांखराचें,
अक्रूराचें तसें धनुर्धर वीर अर्जुनाचें; ३
कोकिलकंठे ! गमे परिसिलीं आजचि हीं गाणीं,
शब्द न शब्दहि इतुका त्यांचा पूर्ण घुमे कानीं; ४
वद आईतें, बंधूंनाही,' 'कथिलें तें मातें,'
'होय ? काय कीं,—स्मृति भ्रंशली गेली विलयातें !' ५
'थांब; वाजलें काय बघूं दे कोणी शत्रूचें—
आलें; मारिल; कसा कथूं मग वच तव शेवटचें ?' ६
'गमे खातसूं मळईमधल्या शें—गा—च—व—
सुंदर—वां—गीं ... ... कांकडीच्या;' ७
'ऐकुं न येई काय बोलसी,' 'साऱ्या अंगासी,
गड्या वेदना ! गोळी वाटे भिडे काळजासी ! ८
दहा जाहला कोरड पडली जीभहि जड झाली,
कान जवळ घे, शेवटची रे ! वेळ गमे आली, ९
सांग सखीला, पुन्हां न आतां मीलन व्हायाचें—
वरीं कुंडलीं,—कुं—ड—ल—मा—झें——. ६

पद [ चालः—उद्धवा शांतवन करिं जा........ ]

'गोखल्का बापू है ये,' शब्द आजि कर्णी घुमती, ध्रु०
पडसाद उठोनी हृदयीं, मावळे मनींची शांती,
बेभान होउनी वृत्ती, मज उदास वाटे जगती,
भडभडुनी अंतःकरणीं, नेत्रांना लागे गळती;
शतवर्षांमागिल काळ,
ठाकुनी उभा विक्राळ,
नाचतो अश्या वेताळ,
अंगास इंगळ्या डसती. १
अष्टीचे रणसंग्रामीं, शेवटचा करुनी हात,
शत्रूस चारिली धूळ, शौर्यानें केली मात,
कीर्तिचा उजळिला दीप, परि पडतां भीषण रात,
त्या हीनजाति-वातींनीं,
दीपींचें स्नेह पिवोनी,
टाकिलें त्यास विझवोनी,
आपण ही जळल्या वरतीं! २
बारगीर भोजनभाऊ, समयाला कोणी नाहीं,
अंगचोर सेवाचोर, स्वार्थभूत खाई डोई,
येइ राष्ट्र डबघाईला, अवनतिची ही भरपाई,
नव रंग तमाशामाजीं,
दंग गुंग झाले गाजी,
बाजीहि न लमरा राजी,
घर फिरतां वासे फिरती! ३
बाजीची बाजी गेली, पाजींची भरती झाली,
नशिबाची सद्दी सरली, शूरांची बुद्धी फिरली,
भीतीच्या नांवाखालीं, पळतां भुइ थोडी केली;
समशेरहि हातामधली,
बादलीं जणूं जी बिजली,
नागीण वारुळीं शिरली,
हृदयीं परि नाहीं खंती! ४
फौजेंत फितूरी झाली, दारूंत बाजरी भरली,
स्वत्वाची ओळख सुटली, अब्रूची चाडहि उरली,

राज्यश्री विटली चळली, अवदसा पुरी आठवली,
केरसुणी मोकळपोटीं,
काजळी दिव्याचे आंठी,
भांगेंतहि कधि उकराटी,
तुळस कीं उपजते म्हणती— ५

पाणिदार सुरती मोतीं, शूर मर्द ब्राह्मणभाई,
स्वामीस्तव राष्ट्रास्तव कीं, पर्वाहि तनूची नाहीं;
रणधुंद मतंगज शिरला, एकाकि रणाचे डोहीं.
रिपुशिरें कंदुकापरि तीं,
उडविलीं भराभर वरतीं,
रणनदींत तरतांना तीं,
कमलापरि शोभा देती. ६

रण घुमलें नादित झालें रणसरिता वाहिली वेगें;
रण-नवरा शूर मराठा; बापु तात लागवेगें;
शिरतां तैं ' हरहर ' घोषें, गर्जुनियां क्रोधावेगें;
दैवाची अघटित करणी,
केतूनें गिळिला तरणी,
जलजन्य जलींच निदानीं,
हा ! कैसें विरलें मोतीं ? ७

भाग्यभानु भारतभूचा, अस्ता जणुं निश्चित गेला,
तिलक कीं स्वामिनिष्ठेचा, दुर्दैवें निश्चित पुसला,
शिवसम्राट्साम्राज्याचा, शेवटचा चीरा पडला.
हा अंतिम समरोन्माद,
हा अंतिम समरानिनाद,
हा अंतिम करुनी वाद,
दे भीति धृतीला माती ! ८

ज्योति ही आत्मतेजाची, मूर्ति कीं स्वाभिमानाची,
चित्कला पूर्ण शौर्याची, कीं स्वराज्यपूर्णेंदूची,
राज्याशालतिका गळली, उमळुनी बाजिरायाची,
स्वातंत्र्यदेवता खास,
होउनियां कासावीस,

अंतिम हा श्वासोच्छ्वास,
सोडी जणुं भासे मज ती. ९
आतां न लढाया पुढतीं, भारतीं कधीं व्हायाच्या,
शब्दही न येतिल कानीं, तरवारी भाले यरच्या,
आतां न भिमथडी घोडे, बैसाया कोचं खुर्च्या,
कागदी समरभूवरतीं,
टाकांचे घोडे पळती,
शाईच्या सरितीं न्हाती,
आजची शूरता ही ती ! १०
वांकवुनी मुखचापाला, जिव्हेची शिंति ओढोनी,
दुरभिमान तूणीरींचे, वाग्बाण विषें योजोनी,
अन्योन्यां विंधूं आम्ही, आपुलेपणा विसरोनी,
तत्कालिन घरभेद्यांनीं,
करुनियां घोर बेमानी,
बापूंची केली हानी,
आजही तयांची भरती ! ११
शूरता आणखी तैशी, दृश्य आजि दुसऱ्या रीती,
सरवाच्या होळी वरती, करमुखें आमुचीं भिडती,
गर्जतों विशेषें वरतों, बैसुनि कीं पाटावरतीं,
लाडूंचे कुलपी गोळे,
वजनांत दहाविस तोळे,
कोंबतों मुखीं जणुं बोळे,
तोफांची मग सरबत्ती ! १२
द्रोणभीष्मतट फोडुनी, जल-जयद्रथा शोषोनी,
गांधार खडे वेंचोनी, खलशल्यग्रह मर्दोनी,
द्रौण्यादिनक्र पळवोनी, दुर्योधन मामा शकुनी,
कर्णादि भोंवरें चिरिले,
रणसरिता पांडव तरले,
कारण त्या एकचि घडलें,
कर्णसूत्र कृष्णा-हातीं. १३
श्रीकृष्णासम या काळीं, नौकानयकुशली वरदी,
नय-दर्यासारंगहि वा, नानापरि कोणी दर्दी,

साह्यास न होता सचिवा, चोर सर्व दर्यावर्दी;
घरच्याच चोर चांच्यांनीं,
छिद्रान्वित नौका करुनी,
आपेंच बुडविली तरणी,
घालुनि रिपु–खडकावरतीं. १४
अंशमात्र उतराई बा, व्हाया तव हा मतिमंद,
स्मृतिरूपें—निष्क्रिय जरि ही,--घालुनियां प्रेमळ साद,
श्रद्धामय अंतःकरणें, शतवार्षिक तव हें श्राद्ध,
काव्यरूप तिळ घेवोनी,
नयनांबू वरि ढाळोनी,
उदकांजलि तुजलागोनी,
अर्पितो हाच या हातीं. १५

---

## ३. रावबाजींचें राज्यदान !

पद ( चाल.—मज गमे ऐसा... )
सोडितों आजी उदक मी, राज्यदानीं ॥ ध्रु० ॥
म्हणोत कोणी मजला पाजी,
कुलांगार कीं दिवटा बाजी,
प्रजाजनांची हो इतराजी,
साहिन सगळें एक वेळ मी. १
निंदो जनता सुखेनैव या,
चिंता त्याची नकोचि वाया,
आप मरे पर डुब गइ दुनिया,
राहुं कासया परी लगामीं ? २
मंत्रीकरिंचें परी खेळणें,
फिरतिल भुवया तसें नाचणें,
नको जिणें तें लाजिरवाणें,
बरवी भिक्षा ती परधामीं ! ३
अपथ्य कृत्यें जरि मम सारीं,
कां न सूदिलें कारागारीं ?

जसा पंजरीं राघु भरारी,
बारांपुढती काय करीं मी ? ४
सप्त समुद्रां उल्लंघुनियां,
विधु धूसर ये अतिथि गृहीं या,
विन्मुख कैसें दवडुं तरि तया,
दोषाचा धनि होउं काय मी ? ५
कर्णे देतां कवचकुंडलें,
काय तनूला तयें पाहिलें ?
बलिनें याचकपद शिरिं धरिलें,
कशास व्हावें तरी श्रमी मी ? ६
पात्रापात्र न बघते धरणी,
श्रेष्ठ नीच कीं बघे न तरणी,
सकलां हो शशि समसुख किरणीं,
प्रकाश दीपहि देइ सम तमीं ! ७
दारिं वागलें सदैव अमुचे,
शागीर्दापरि पूर्वज ज्यांचे,
करीं धरूं का पद मी त्यांचे.
नको मना मज वुडवुं संभ्रमीं ८
मन्नयनांनो कां डबडबतां ?
थरथर कांपसि कशास हाता ?
हुरहुरसी का हृदया आतां ?
नको ओढुं मज दुःखकर्दमीं ! ९
मम षट् पूर्वज नरवीरांनीं,
मेळविलें जें रक्त शिंपुनी,
बिळांत त्या तूं नाग होउनी,
बसतां गमलें तुज सुख नामी ! १०
शस्त्र न धरवे हातीं धड कीं,
तोफ ऐकतां भरते धडकी,
राजनीतिही नसे ठाउकी,
नृपतिपदा मी पुरा निकामी ! ११
गोधुमभावें सक्तु पेरिले,
उपाय केले अपाय झाले,

दुःख कशाला आतां वहिलें,
शुभाशुभ अतां तुल्य गणों मी ! १२
जन्मगुणें मी ब्राह्मण असतां,
स्थितिवश चिकटे बळें क्षात्रता,
तें न साधिलें हेंहि न होता,
त्रिशंकु ऐसा सहज होय मी ! १३
ज्यांना प्रेमें अपुले म्हटलें,
तेच आज परि मजवरि फिरले,
परघरचे त्या दैवत गमले,
लोकविलोचनिं सले शल्य मी ! १४
जरी नको मी असे प्रजेला,
व्हावी तरि ती मला कशाला ?
महार मेला विटाळ फिटला,
राज्यव्याप हा त्यजीं तसा मी ! १५

---

## ४. कल्याणची कल्याणी !

[ आबाजी सोनदेव नामक एक शूर सरदार श्रीशिवछत्रपतींचे पदरीं होता. महाराजांनीं कल्याण सुभा घेण्याचें काम त्यांजवर सोंपविलें होतें. त्यांनीं कल्याणचा सुभेदार मुल्लाना अहमद यास जिवाची शर्थ करून लढाईंत जिवंत पकडलें. पुढें सुभेदाराचा वाडा लुटीत असतां त्यांत त्यांस एक तरुण सुंदर यवनकन्या सांपडली. ही त्या सुभेदाराची सून होती. ' असलें रत्न महाराजांसच योग्य ' असें मनांत समजून त्यांनीं तिलाहि गिरफ्तार केलें व त्या उभयतांना महाराजांपुढें उभे केले. यापुढील वृतांत खालील कवितेंत दिला आहे. ]

पद [ चाल:—अर्धतनू वारुळीं........ ]

रत्न खरोखर रत्न अबाजी, गमतें या पाहतां,
नसावा नित्याचा निर्मिता ! ध्रु०
सतेज सुंदर नक्षत्रांचें तेज गाळुनी जणूं,
ओतिली मूर्ति इची कीं म्हणूं ;
शिरीषकुसुमांची ही किंवा मोहक छंवि काढिली;
कोठली मृदुता तरि येतुली;



सौभाग्य सृष्टिचें काय पुढें ठाकलें ?
मांगल्य महीचें मूर्त उभें राहिलें ?
पावित्र्य पृथ्विचें प्राक्पुण्यें पातलें ?
कल्पलतेची मधुर मंजरी चंद्राची चारुता,
काय वा स्वर्गीची दिव्यता ? ' १
क्षणैक थांबुनि दीर्घ उसासा टाकुनि भूपति तदा,
वदे ' ही अतुल रूपसंपदा !
जशी भूमिका पिकें लाधती अनुभवि जन सांगती,
नीति कीं खाण तशी माति ती;
का गंगासंभव विंध्याद्रीचे कुशीं ?
पावतें जनन का सारस आयसरसीं ?
वारुणीजठरिं का जन्म मिळे भानुसी ?

सौभाग्यशालिनी अपूर्व पूर्वा एक योग्य सर्वथा,
द्यावया जन्म तया भास्वता ! २
दुर्दैवी मी ! जन्म लाधणें निर्मल उदरांत या,
प्राक्तनीं असतें जरि माझिया;
परम मनोहर रूपराशि मी तेजोनिधि कीं हिरा,
इच्छापरि दिसलों असतों खरा !
हें असो; तिज्ञ द्या पातळ नव भर्जरी,
कासार बोलवा भरवा चूडे करीं,
हा शालु बुटीचा घाला अंगावरी,
मध्यामधुनी माय पोंचवा पतिसदना ही अतां,
पळाचा वेळहि नच लावितां ! ३
* * * *
काय अन्नाजी, अनीतिपर ही करितां कृति राक्षसी,
वाटली लाज न तव मानसीं ?
बाल्यापासुनि जया नीतिचें बाळकडू पाजिलें,
काय हें कर्म तया साजलें ?
शिकवुनी शिकवणें स्वधर्मपरिपालन,
हें कर्म जयाचें स्वाभाविक, वाद न,
भूषण क्षमा हें शोभे ज्यालागुन,
ब्राम्हणवंशीं ईशकृपेनें जन्म तया लाधतां,
वरावी काय तुवां हीनता ? ४
राजपुरुष ज्या राज्यामधले नीति न सांभाळिती,
वीर कीं रणनय अवमानिती;
असोत किति ही सचिव धुरंधर नृपनयपारंगत,
वीर कीं रणशास्त्रीं पंडित;
खेळोत बुद्धिनें कितीहि नृपकारणीं,
दावुनी तेज कीं, तरवारीचें रणीं,
लाधोत विजय ते कितीहि वीराग्रणी,
फोल फोल तो राज्यपसारा त्यातें चिरकालिता,
कोठची तैशी अभिवादिता ? ५
शिवाभवानी कृपाप्रसादें महाराष्ट्र आजला,
जरी हा दास्यमुक्त जाहला,

तरी जोंवरी धाराव्रतपर नायक त्याचे गुणी,
ढळति न नीतिपथापासुनी;
येवोत शेंकडो अदिलशहा चालुनी,
येवोत हजारों दिल्लीपति धांवुनी,
येवोत कुणीही दांतओठ खावुनी,
स्वातंत्र्यशालिनी राज्यश्री जी नीतिप्रस्थापिता,
काय ती होईल सत्त्वच्युता ?　　६
नर जे कोणी महाराष्ट्रभू मुक्त करूं इच्छिती,
असो त्या कितीहि संगररती;
अनयीं यवनापरी परी ते जर करतां वागले,
अबाजी, सर्वांचिं आ–टो– – –
जे दिनीं तयांची जाइल नीती लया,
ते दिनीं–पण नको पुढलें बोलावया,
चाचरे जीभ ही शाप तीव्र द्यावया,
नको नको जा तोंड दाखवूं कांहीं दिन तरि अतां,
वीट ये मजला तव तत्त्वतां !　　७

---

## ५. केवळ स्वराज्यासाठीं !

[ कथासूत्रः—बजाजीराव निंबाळकर म्हणून श्रीशिवछत्रपतींचे वेळीं एक मातबर मराठा सरदार होता. कांहीं अदावतीनें बजाबाचे थोरले बंधूनें त्यास धरून विजापुरास नेऊन बादशहा अदिलशहाचे स्वाधीन केलें. बादशहानें त्यास आपली मुलगी देऊन मुसलमान केलें. बजाबा जातिवंत असल्यामुळें त्याला या धर्मांतराचा पश्चात्ताप झाला व त्याप्रमाणें त्यानें देशीं आल्यावर राजमाता जिजाबाईसाहेब यांजजवळ उद्गारहि काढिले. जिजाबाईंनीं ' हा मातबर सरदार तूं अनुकूल करून घेतल्यास स्वराज्यस्थापनेच्या कामीं तुला त्याचें फार साह्य होईल. करितां तूं आपली मुलगी त्याचे मुलास देऊन त्याला जातींत पावन करून घे, ' असें शिवाजी महाराजांस सांगितलें. ' न मातुः परदैवतम् ' मानणाऱ्या श्रीशिवाजी महाराजांनीं आईची आज्ञा मान्य-करून, सर्व मराठे मंडळी बोलावून आपली मुलगी सक्वारबाई बजाबाचे चिरंजीव महादजी

नाईक निंबाळकर यांस सर्वांसमक्ष अर्पण केली व त्यास पुनः हिंदू करून घेतलें. कन्यादान करतांना छत्रपतींनीं काढलेले उद्गार प्रस्तुत कवितेंत गोंविले आहेत. ]



**पद** [ चालः—उद्धवा शांतवन करिं जा........ ]

सकूवार कुमारी माझी केवळ जी पंचप्राण. ध्रु.

घालितों बजाबा पदरीं घ्यावें तिज सांभाळून;

जरि तुम्ही विधर्मी असला तरि काणा डोळा करुन ;

व्यवहार करुनि रोटीचा,

हा करीं वरी बेटीचा,

न मुलाजा मज जातीचा,

घेतलें सतीचें वाण ! १

हृदयाचे कुंडामाजीं अनुताप वन्हि धगधगित;

पेटला भडकल्या ज्वाला पूर्व कर्म झालें हूत;

कश्मल कीं किल्मिश आतां इवलेंही नुरलें त्यांत;

लेंकरूं जातिवंताचें,
नाईक बजाबा अमुचें,
म्हादबा लेंकरूं तुमचें,
सकु ध्या ही सून करून ! २

हा ब्राम्हण, हा चांडाल भेद न हा पाही सविता;
हिमकरी सुधेची वृष्टी शशि करितो भेद न बवतां;
एकचि ना खेळे वायू मंदिरश्मशाना भंवतां ?
भूमाय गाईंना तारी,
म्हणुनि काय वाघां मारी ?
परि घेई कोण विचारीं ?
काय तें जाळणें ज्ञान ? ३

साधूंची तृष्णा शमवी जल तें का शूद्रां दापी ?
वेदशास्त्रिं शब्दब्रह्म भरलें तें सर्व व्यापी;
आकाश रक्षि जें आर्यां काय तें विधर्म्यां शापी ?
आम्हि मात्र जाती जाती–
करुनियां मरूं दिनरातीं;
जातीस्तव खातों माती;
पिळ कायम सुंभ जळून ! ४

मायभू मुसलमानांनीं घालुनियां पायांखालीं;
बटिक तीस केलें; अमुची– काय ही धन्यता झाली ?
उज्ज्वल मुख काळें केलें भूषण जें गणुं या कालीं;
हें दिसतें परि ना कळतें,
हें कळतें परि ना वळतें,
हें वळतें परि ना जळतें,
मन मेलें दास्यिं कुजून ! ५

देहेंच न अंतर्यामें आधीन परांचे झालों !
दरबारिं न घरिंदारींही भाषाहि परांची बोलों !
नखशिखान्त काय दिसेना पेहेरावें परांचें फुललों !
का स्वधर्मलक्षण हेंच ?
का स्वधर्मभूषण हेंच ?
का स्वधर्मरक्षण हेंच ?
वाणीहुनि करणी कठिण ! ६

जाडनी काप कानींचे भोकेंही वरतीं बुजलीं;
जाहलें दुधाचें पाणी फॅसानें चरवी भरली;
ज्ञानाची कलिका गळली वादरता वाणी फुलली;
शिरं गेलें पगडीकरितां,
मरमरुनी खातों खस्ता,
धडपडतों काडीकरितां,
टाकुनियां माडि गहाण ! ७

हे कुलाचार कुलधर्म वाहिले मायभूपायीं,
हें वर्म मनाचें मर्म वाहिलें मायभूपायीं;
हें शर्म तसें कुलकर्म वाहिलें मायभूपायीं;
मायभूच माझी जात,
मायभूच माझी गोत,
मायभूच प्राणज्योत,
तिजपुढें तुच्छ मज आन ! ८

---

## ६. छत फोडतांना—

पद [ चालः—मज गमे ऐसा...... ]

घाव हा आधीं, घालितों, मीच आतां. ध्रु०

हिंदुद्वेष्टया पादशहाचें,
गाई चरचर चिरणारांचें,
सिंहासन हें छत त्यावरचें,
दिवसा ढवळ्या भाउ फोडितो ! १

अष्ट दिशांच्या दिक्पालांनो,
गंधर्वांनों मरुद्गणांनो,
हे श्रीकृष्णा पंडु-सुतांनो,
द्या तुमचें बल शौर्य मागतों ! २

छत्रपती शिव तान्हा बांका,
वीरांसह या आपा, काका,
बसुनि विमानीं स्थालिं या ठाका,
द्या आशी कृतकार्यी होतों । ३

मात्रागमनी सैतानांनो,
कुतुब नजीब्या उन्मत्तांनो,
यवनांच्याही अफलादींनो,
वज्रबाहु हा पहा उचलतों ! ४
या या सारे डोळे उघडा,
केश उपटुनी दाढ्या तोडा,
तशीं मनगटें चावा फोडा,
पहा छताला कर हा भिडतो ! ५
काका तुमचा पगडी-भाऊ,
दावितसां मज ज्याचा बाऊ,
सगळा कीं तो अर्धा खाऊ,
बोला का तो तोंड लपवितो ? ६
गात बढाया नृपनिष्ठेच्या,
गोष्टी आत्याबाइपणाच्या,
सांगे जो मज थोर नीतिच्या,
दिसे न कोठें सुरजमल्ल तो ? ७
कोठें काका तुमचा कलिजा,
जाट हजारों आणा जा जा,
हात धराया आतां माझा,
माय कुणाची व्याली बघतों ! ८
आणुनि दौलत रूमशामची,
सिंहासन का शाहा विरची ?
फोडाया मग भीति कुणाची ?
निष्ठा कसली मला शिकवितो ? ९
श्रीकृष्णाचीं मथुरेमधलीं,
श्रीरामाचीं अयोध्येंतलीं,
वदा मंदिरें कुणीं फोडिलीं ?
कोण परी हा विचार करितो ? १०
श्रद्धापूर्वक पूजा-अर्चा,
सदा करितसां तुम्ही जयांच्या,
पहा पायऱ्या केल्या त्यांच्या,
पदीं शाहा त्या नित्य तुडवितो ! ११

खांब कळसही हे सोन्याचे,
काबुलचे कीं इस्तंबुलचे,
सलति न का हे नेत्रीं तुमचे ?
कींव वदा अपमान गिळवतो ? १२

जागा अमुची, पैसे अमुचे,
मालमसाले तेही अमुचे,
महाल मग हे वदा कुणाचे ?
काय बायकी नीति शिकवितो ! १३

जिकडे जिकडे दृष्टी फिरते,
तिकडे तिकडे मजला दिसतें,
अमुचें सारें भरलें येथें.
काय न बोला जीव जळे तो ? १४

जाट × × तो; जावो निघुनी,
जिवंत सुटलों जरी यांतुनी,
पुढचें पुढतीं घेउं पाहुनी,
काय फोडुनी धरणी जातो ? १५

पहा हात हा खालीं आला,
निशाणिंचा हा घाव बैसला,
गोरगरिब या वेंचायाला,
रत्नमण्यांचा पाउस पडतो ! १६

* * * * *

खळळ धप्प तों छत कोसळलें,
सिंहासन त्यायोगें फुटलें,
मणिमोत्यांचे पर्वत खचले,
कोण कितिक त्या तरी वेंचितो ? १७

## ७ महाराष्ट्र विदुला.

[ कथासूत्र—कर्नाटकांत धोंडी वाघ नांवाच्या एका पेंढारीवजा पुंडानें मनस्वी पुंडाई मांडली असतां श्रीमंतांनीं त्याच्या पारिपत्याकरितां धोंडोपंत गोखले या शूर सरदारास पाठविलें. धोंडोपंतांनीं या मोहिमेवर जातांना आपल्या पुतण्यास—महाराष्ट्राचे शेवटचे सेनापति बापू गोखले यास—लढाईचें बाळकडू देण्याकरितां बरोबर घेतलें होतें. धोंडी वाघाशीं झालेल्या चकमकींत दुर्दैवानें धोंडोपंत कामास आले. बापू त्यांचा दहनविधि आटपून उत्तरक्रिया करण्याकरितां पुण्यास परत आले. अपेश पदरीं बांधून बापूस घरीं परत आलेले पहातांच लक्ष्मीबाईनें—बापूंच्या वीरमती चुलतीनें—अत्यंत संतप्त होऊन 'धोंडी वाघाच्या शिरच्छेद केल्याशिवाय पतींची उत्तरक्रिया होणें शक्य नाहीं' असें बापूस निक्षुन सांगून घरांत न घेतां त्यास त्याच पावलीं परत मोहिमेवर पाठविलें. प्रस्तुत प्रसंग खालील कवितेंत रंगविण्याचा प्रयत्न केला आहे. ]

श्लोक [ वृत्त शार्दूलविक्रीडित. ]

'हो मागें फिर पाउलीं परत या आलास जाईं तसा;<br>
काळें घेउनि तोंड हें मजपुढें येसी कशाला असा ?<br>
माझा तूं असतास पुत्र जर का जाऊं न देतां क्षण,<br>
तूतें मीं असतें उभें चिरियलें एकथाच घावें पण— १

'पोटीं या—नव्हतेंच शक्य असला येणें दिवा माझिया,<br>
आतां जन्मि निदान या तरि नको शंकाहि ती घ्यावया;<br>
ज्यांची दिव्य तनू रणीं पहुडली शत्रूसवें झुंजतां,<br>
त्यांचें उत्तरकार्य या तव करीं होणें नसे सर्वथा ! २

'तोंडें मी कवण्या म्हणूं न कळतें कीं गोखल्यांचे कुळीं,<br>
झाला जन्म तुझा, न जीभ उचले बोलावया हें मुळीं;<br>
खेपेला तुझिया गरोदरपणीं—मातेवरी सावली,<br>
भीरूची पडली असेल म्हणुनी—आलास पोटीं बळी ! ३

'ज्या शापादपि वा शरादपि अशा सद्विप्रवंशांतरीं,<br>
झाले द्रोणकृपादि वीर बलधी कीं जामदग्न्यापरी—<br>
त्या तूं विप्रकुलामधें निपजुनी केलेंस हें काय कीं,<br>
नाहीं शास्त्र, नसो, न शस्त्र धडही येई धरूं हस्तकीं ! ४

‘ ज्यांचें खाउनि अन्न पुष्टतनु तूं झालास पोळापरी,
झाले त्या भटसत्कुलीं सकलही संग्रामजित्केसरी;
ओठाचें वरचाहि जार नव्हता ज्याच्या पुरा वाळला,
विश्वासें निजदेह पावन कुरुक्षेत्रामधें ठेवला ! ५

‘ होता काय तुझ्याहुनी अधिक तो विश्वास मोठा तदा,
गेला तो मिळवूनि, तूं मळवुनी; वेल्हांटिचा फायदा !
नाहीं भेद विशेषसहि उभयीं जीवंत तो तूं मृत,
नाहीं अक्षर एक यांत लटिकें बोल्यें न मी अनृत ! ६

‘ बुंदेले पटवर्धनादि फडके. बक्षी, सिंधे. फाळके,
पेठे, पुंड, पुरंदरे, परचुरे, भावे, खळे, घोडके;
नारोशंकर, पानसे, घडफळे हे सर्वही ब्राह्मण,
होते ख्यात विशेष शूर म्हणुनी ठावे तुला काय न ? ७

‘ पापी घोर खरोखरीच कुल हें मातें गमे आमुचें–
जें दे त्वत्सम जन्म नीच कुलजा ! दुर्भाग्य ना कोणचें !
खाया काळ भुईंस भार असलें निर्माल्यवत् वांचणें,
कोणा उक्त गमो मला न खपणें ऐसें कलंकी जिणें ! ८

‘ वांचो वर्ष सहस्र काक, बलि वा भक्षो जयां ना मिती,
स्वप्नींही तरि भोगिभोगिबलता लाधेल का त्यास ती ?
रे तूं याहुनि पावतास म्हणतें जन्म स्त्रियांचा जरी,
कोणाला उपयोग खास घडता अल्पप्रमाणीं तरी ! ९

‘ झाला वा असतां जरी वध तुझा त्यांच्यासवें संगरीं,
त्याचाही घडता शताधिकगुणें आनंद या अंतरीं;
पुत्राची जननी अशा म्हणविण्यापेक्षां गमे सर्वथा,
वांझोटेपणही बरेंच इतुकें देतें न तें खिन्नता ! ’ १०

‘ झालें काळिज हें विदीर्ण शतधा काकू पुरे गे करीं,
शिक्षा घोर घडे अतीव, तितुका दोषी नसे मी परी;
आतां शब्द न एकही सहवणें निक्षून मी सांगतों,
कांठोकांठ घडा सपूर्त भरला बिंदू न सामावतो ! ’ ११

‘ ज्या अंतःकरणा न शब्द सहवे माझा तयालागुनी,
कैसा सोसवला पितृव्यवध तो ? कोडें पडे मन्मनीं !

१ गरुडाचें बळ.

डोळ्यांनीं उघड्या कसा बघवला ? जो घात झाला कुळीं;
इच्छी काय वधूं ? मला गतधवा त्याची जशी माउली' १२
'पाया मी पडतों पुरे जननि ! पुरे वाग्बाणसंधान गे–
मेलेल्यावरि काय हाय ! धरसी ? बापू न आतां जगे !'
थांबोनी क्षण एक तो पुनरपी काकूस बोले तया,
'जातों मी नच थांबतां पळ इथें पाणींहि गे घ्यावया !' १३
दृष्टिक्षेप करूनि तीव्र सहसा व्याजें वरी हांसुनी,
बोले त्याप्रति वीरवाग्विजयिनी ती धैर्यसंजीविनी;
'जासी सांग कुठें ? रणीं किं मसणीं रानीं वनीं कीं जलीं,
जीवा आड करावयास अथवा भिक्षार्थ भूमंडलीं ?' १४
'आतां आवर मर्मभेद वच हें पाण्याहुनी पातळ,
काकू तूं मज टाकिलेंस करुनी; दे शीघ्र आशीर्बल;
जातों मी समरा असाचि बघ हा;' 'ना लाडक्या ! कासया ?
होवोनी मुडदेफरास मुडदे ओढोनि टाकावया ? १५
'होणें काय तुझ्याकडोनि दिसलें, रे मीच एकाकिनी, ?
घेतें सूड अनेक यत्न करुनी दुष्टास त्या मारुनी;
रक्तानें रिपुच्या तिथें रणभुवीं हे हात माखोनियां,
येतें देउनियां तिलांजलि पहा संतोषवाया तयां; १६
बापूनें उपसूनि खड्ग अपुला, शस्त्राग्र वक्षावरी,
बोले ठेवुनि 'भ्याड मी जरि तुला वाटेन वाटो तरी;
जाणें इष्टचि गे जरी तुज रणीं प्रेतावरी पाय या
जावें देउनियां सुखें जननि गे माझी न नाहीं तया !' १७
कर्णीं जों रिघलें न हें वच तिचे हेलावली अंतरीं–
वात्सल्यें, मन दाटलें गहिंवरें, अलिंगुनी त्या उरीं;
बोले बाष्पनिरुद्धकंठ जननी व्यामोहितें मानसें,
'लाधे आज नवाचि पुत्र मजला बापू गमे कीं असें ! १८
'जिव्हाळीं बसतां त्वदीय शर तो प्राणग्रास लाधे मृती,
केलें तीव्र शरें मदीय परि मी जीवंत मेल्याप्रती !
लाधे त्या तव बाणभग्नबलिंना बा कल्पनागौरव,
माझ्यांना इहलोकभोग मिळती आसूंयसें वैभव ! १९

---

१ चुलत्याचा घात. २ हेवा करण्याजोगें.

पूर्वीं द्वापरिं गोष्ट एक घडली; रामें अहिल्या-शिला,
केली जागृत उद्धरोनि सबला ज्ञानी तशी निर्मला !
एका या मृतमानवाप्रति तरी चैतन्य देऊन मीं,
झालें धन्य रघूत्तमा ! फळ तुला अर्पूनि हर्षें नमीं ! २०

'माझा आशि तुला असे सुतवरा ! जा तूर्ण जा येथुनी,
दुष्टाचें शिर आण त्या, स्वरिपुचा सैन्योदधी मंथुनी;
स्वामींचे पदिं रक्तसिक्त शिर तें वाहोनियां सादर,
सारीं तें मग और्ध्वदेहिकें[1] सुखें, होतील तुष्टांतर !' २१

'जें कां पाउल शत्रुशीर्षिं पडतां निःपात त्याचा करी,
भक्ता स्पर्श परी तदीय घडतां त्यालागिं तें उद्धरी;
देवी त्वच्चरणप्रतापमहिमा आला कळोनी अग्रें !
येतों होउनि सत्यसंध[2] समरीं त्याच्या बलें निश्चयें,' २२

'बापू हा समरप्रसंग सहजीं बाल्योंच लाभे तुशीं,
स्वर्गद्वार विशाल कीं उघडलें; जा झुंज जा शत्रुशीं;
लाभाया अभिमन्युची स्मृति रणीं सौभाग्य जें लागतें,
मोठाल्या रणकेसरीसहि पहा अत्यंत दुष्प्राप तें ! २३

'मृत्यूचें भय मानुनी दवडितां संधी अशी राजया !
सारा जन्म तुला असें रडत रे लागेल बैसावया;
जें धाराव्रत हें अनर्घ[3] तुझिया स्वीकारिलें पूर्वजें,
हर्षें चालविणें तसेंच पुढतां कर्तव्य आहे तुझें ! २४

'लेती जे नरपुंगवोचित कुणी सौभाग्य-लेणें असें,
देई दुःख अपेश त्याप्रति जसें ना मृत्युही दे तसें;
सांगावें तुज काय रे अधिक मीं हें एक चित्तीं धरीं,
दंतिध्वंसन जन्मकर्म हरिचें तें तो स्वभावें करी !' २५

---

१ उत्तरक्रिया. २ सत्यप्रतिज्ञ. ३ बिनमोल.

# तरंग ५ वा.

## १. सांत्वन. *

पद [ चालः—उद्धवा शांतवन करिं जा........ ]

हं पुरे पुरे हें रडणें किति सांगूं समजावोनी ! ध्रु०
का तुझींच हानी झाली मजला का लाभ सुखाचा ?
का तुझ्याच सखये पडला हृदयाला दुःसह खाचा ?
का तुलाच अपयश आलें मजला का लाभ यशाचा ?
का तुझेंच होतें बाळ ?
मज का तें होतें काळ ?
का तुलाच मायाजाळ ?
चल आंवर टाक गिळोनी. किति सांगूं समजावोनी ! १

भिडनियां दुष्ट रोगाला घेतलें शिरावरि रान,
साधिला डाव दैवानें पाठलाग अमुचा करुन,
येथेंहि घातला घाला प्रिय बाला नेली हरुन,
त्याचें न मारितां घोडें,
मुरगळलें फल जों दोंड,
सदुपाय न केलें थोडे,
यश देणें देवाधीन किति सांगूं समजावून ! २

बालिका कशानें गेली कळतां हें शेजाऱ्यांस,
भयभीत होउनी सारीं होतिल मनिं फार उदास,
होईल किती त्या त्रास कर याचा कांहिं कयास,

---

* माझे रसिक व मर्मज्ञ मित्र रा रा. पांडुरंग विष्णु ऊर्फ तात्यासाहेब जोशी यांची अत्यंत आवडती कन्या सौ. कृष्णाबाई घारे ही शके १८३८ त एकाएकीं वारली; त्यावेळीं ते आपल्या पत्नीचें सांत्वन करीत आहेत या दृष्टीनें प्रस्तुत कविता लिहिली आहे.

अपुल्यास्तव अन्य जनांस,
व्हावा न अल्पही त्रास,
व्रत हें तव पाळायास,
हें सारें टाक गिळोनी. किति सांगूं समजावोनी ! ३
अल्प का अपत्यें झालीं होतीं या घरभर भरलीं,
मुकुलित कीं अर्धीं फुललीं दैवा त्या नच पाहवलीं,
सुखनिधान गोकुळगेहा कशि कळा श्मशानी आली,
परि चुकून त्यांतुनि उरलें,
फुलुनियां परिमलीं भरलें,
देवाच्या तुज तें मिळलें,
प्रभुकृपा काय ही सानी ? किति सांगूं समजावोनी ! ४
किति आतां रडसी कढसी येणार काय ती मागें ?
आहे का तुझिया हातीं तिजलागीं आणणें सांगे ?
का उगाच लोळण घेसी का तुला वेड हें लागे ?
कन्या ही परधनराशी,
ठेवेपरि अपुल्यापाशीं,
असते हें कथिलें तुजसी,
उपजल्या क्षणापासोनी. किति सांगूं समजावोनी ! ५
जे दिनीं तिच्या दानाचें उदक या सोडिलें हातें,
ते दिनींच तिजविषयींचें होतें तें सरलें नातें,
परक्याचे हानीसाठीं तुझिया का दुःख मनातें ?
परधना तृतीयें नेलें,
आमुचें न कांहीं गेलें,
का हें मग दुःख उदेलें ?
हीं टाक आसवें पुसुनी. किति सांगूं समजावोनी ! ६
गत वसंतिं आंब्याला या अनिवार बहर येवोनी,
वरपासुनि तळपावेतों लवला तो गोड फळांनीं,
त्यांतुनि परि अपुल्या हातीं किति आलीं सांग निदानीं ?
वाऱ्यानें गळलीं कांहीं,
भक्षिलीं कीटकीं कांहीं,
नासलीं पिकूनहि कांहीं,
फेंकिलीस तूंच उचलोनी. किति सांगूं समजावोनी ! ७

मृग-तोंडीं गेल्या वर्षी  परज्यांत आपुल्या मागीं,
नानाविध फळवेलींच्या-  तुळशीच्या-वपुनी स्वांगें,
किति, बिया लाविल्या होत्या  आनंदें; आठिव ना गे,
किति रोपें त्यांचीं परि तों,
उगवुनियां आलों वरतों,
त्यांतूनहि जगलीं पुढतीं—
किति, आणिं विवेकें ध्यानीं.  किति सांगूं समजावोनी ! ८

ही अफाट सृष्टी वाटे  फुलबागचि देवाजीचा,
नरनारी तरुवन-वेली  खुलविति हा बागबगीचा,
नेमिला काल हा माळी,  त्यानें या बागेवरचा.
प्रतिदिवशीं सांज सकाळीं,
गोड गोड पुष्पें सगळीं,
तोडुनि हा वाही माळी,
प्रभुराया माळ करोनी.  किति सांगूं समजावोनी ! ९

ठेविलें अनंतें तैसें  आपण या दीन जनांनीं,
राहावें आनंदानें  सुखसमाधान मानोनी,
शांतिची धरावी कांस  प्रभुराया आराधोनी,
हेंच एक अपुल्या हातीं,
करितां तें लाधे शांती,
जीवांच्या वांच्छा पुरती.
लाभ न गे शोक करोनी.  किति सांगूं समजावोनी ! १०

---

## २. भगवद्भक्त भिषग्वर अण्णासाहेब पटवर्धन यांचा शोचनीय मृत्यु.

श्लोक—[ वृत्त मंदाक्रांता. ]

प्रातःकालीं प्रमुदित मनें पाहुनी पूर्वभागीं,
वंदाया जों कर वर करीं भानु तो त्या न जागीं !
हास्यीं लास्यीं निरत दिसली मेघमाला विशाला,
झ्यालें माझें मन चरकलें, मोद गेला लयाला ! १

नाचे कां ही अशिवद अशी नीरदाली अकालीं ?
रूपें या कीं नभिं अवतरे वंगदेशीय काली ?
ऐशा या कां पवनलहरी वाहती गारगार ?
एकाएकीं अशुभद असा कां घडे हा प्रकार ? २

स्फुंदे वाटे गगन जणुं कीं मेघवाणीमिषानें,
झाल्या दुःखाकुल जणुं दिशा मोहमूढा तमानें !
पक्ष्यांचा हा विरव मज कां हा ! करी, व्यर्थकाज,
वाटे जाणो असुखकर कीं केतु येणार आज ! ३



दुश्चिन्हीं या हृदयकलिका हाय ! झाली विदीर्ण,
जैशी व्हावी शिशिरमथिता पद्ममाला विशीर्ण !
कांहीं केल्या उमज न पडे चित्त झालें उदास,
द्यावा पृथ्वी स्थिरचर दिसे सर्व कांहीं भकास ! ४

व्यावृत्ती या कुदिनविषयीं मानसीं जों न चाले,
अण्णा गेले. ' श्रवणिं पडलें, अंतरीं घस्स झालें !
गात्रें सारीं शिथिल पडलीं शब्द तोंडीं निघाले,
' वाला कैसा अवचट असा घातला क्रूर कालें ' ! ५

अस्ता गेला विबुधरवि कीं ब्रह्मवित् सव्यसाची,
पुण्याईच प्रकटित लया काय गेली पुण्याची ?
वैराग्याचा अचल वसला तुंग मैनाक खालीं,
जिज्ञासूंची हर ! हर ! कशी कल्पवल्ली निमाली ! ६

भक्तीचा का निखळुनी पडे मूर्तिमान् दिव्य गाभा,
नैःस्पृह्याची उलुनि पडली दीप्तिमान् चारु-आभा?
गाभारा का सदुपकृतिचा कोसळे येइ खालीं,
पावित्र्याची परम पदवी काय हा! हा! बुझाली? 　७
गेला देवव्रत कुरुगुरू माघ-एकादशीस,
हाही त्याच प्रियरुम भिषग् भीष्म पुण्या तिथीस!
झाली वाटे अहह! अमुची वैद्यविद्या अनाथा,
आतां आम्हां कवण कथितो स्वानुभूत्युत्थ गाथा! 　८
आयुर्वेदप्रवणपरिषद् वैद्यपंचाननास,
झाली इच्छा कुठुनि न कळे येथ आणावयास!
झाला इच्छाप्रसव तरि हा हाय कोण्या मुहूर्तीं,
गेला मुक्तामणियुग अहा काय ही कामपूर्ती! 　९
'प्राणाचार्य' प्रथित विरुदें ख्यात जे बाळशास्त्री,
मेधा ज्यांची अकपटपटू भारती वैद्यशास्त्रीं;
झाले ज्यांना अझुनि न पुरे जाउनी चार मास,
अण्णांचाही समय नसतां काय व्हावा विनाश! 　१०
कां हा ऐसा कुदिन उगवे आजि ह्याचा कयास,
एकाएकीं स्फुरुनि पडला चित्तिं माझ्या प्रकाश!
अण्णांची जी उपकृतरता मूर्ति पंचत्व पावे,
वंदायातें तिज उचित कीं पंचतत्त्वींहि यावें! 　११
येतां गेहीं दहन करुनी दिव्य मूर्ति श्मशानीं,
मध्या रात्रीं अनवरत तैं वृष्टि केली घनांनीं;
स्वर्गंगा ती मजसि गमते पातली भूमिठाया,
पुण्यात्म्याची शिवकर तया देहरक्षा स्नपाया! 　१२
स्वर्गामाजीं विबुधिं अथवा दाटि केली म्हणोनी,
फाटे वाटे मज नभ चमत्कार ऐसा बघोनी!
नेत्राश्रू कीं सुर टपटपा गाळिती वृष्टिवाटें,
किंवा धाराकरिं उचलुनी स्वांश नेतात वाटे! 　१३
राहो आतां कितिहि रडुनी दीर्घ केला विलाप,
येवोनी ते परत तरि का वारिती चित्तताप?
गेली जावो जडतनु लया आजि तत्कीर्तिरूपा,
वाहूं प्रेमें असुजलधुता पद्यमाला अपापा! 　१४

साधो ! शेवीं तुजसि विनती हीच या अर्भकाची,
स्वार्थी कोणी वदुं मज सुखें ना मला लाज त्याची;
जातां स्वर्गी प्रभुस विनवा द्यावयातें अभाज्य,
सम्राटातें विजय समरीं भारतीयां स्वराज्य ! १५

पृथ्वी

सदा बहुत दाउनी निजजनीं दयालोभ या,
सुमार्ग नव दाविले, दवडिलें दयालो भया;
उमेद धरुनी मनीं वळण जें तुवां लाविलें,
तसेंच जनिं वागणें स्मरणचिन्ह हें कीं भलें. १६

---

## ३. महर्षि दादाभाई नवरोजी यांचें प्रयाण !

श्लोक—[ वृत्त मंदाक्रांता. ]

" भूमातेची परम कुदशा होउनी भासमान,
झालें ज्यातें प्रथमचि तिच्या दुर्गतीचें निदान;
सेवी तीतें अनवरत जो घालुनी अंतरंग,
गेला दादा अहह ! करुनी आमुचा चित्तभंग ! " १
ऐकोनीयां असुखकर या केसरीगर्जितास,
झालों होतों व्यथित हृदयीं तेंवि चित्तीं उदास;
कार्यागारीं लिहुनि लिखितें मोडूनी आंकडेही,
सायंकालीं जडपदिं हळू पातलों जों स्वगेहीं— २
" दादा क्षेमप्रकृति अजुनी जीव देहीं धरून, "
वार्ता ऐसी श्रवणसुभगा येइ मार्गीमधून;
झालों चित्तीं प्रमुदित पुन्हां खेद गेला लयाला,
जाणों पर्णांकुरचि फुटले दग्ध आशाद्रुमाला ! ३
जन्माचा जो हतभग अशा भाग्य त्या भारताचें,
एकाएकीं सुफलित परी केंवि हो ! व्हावयाचें ?
ज्याचा काय प्रकट गवसे केसरीकालपाशीं,
हा ! हा ! कैंचें कुठुनि मिळणें दिव्य चैतन्य त्याशीं ? ४

---

१ दादाभाई गेल्याचें वृत्त केसरीनें त्यांच्या मरणापूर्वीच एक दोन दिवस आधीं प्रसिद्ध केलें होतें त्याला उद्देशून हे शब्द आहेत.

होता त्याचा करित बसला वासनादेह खालीं;
स्वातंत्र्याच्या श्रुतितम महा स्वर्णदीला प्रणाली;
आला दादा, परत फिरला होउनी कीं हताश,
लावाया तैं सुरगुरुसवें दुःस्थितीचा कयास ! ५
चांदोबा ज्या उपहसुनियां मानिलें आजवेरीं,
त्या ध्येयाची प्रकटितपणें ठोकुनी तूंच भेरी;
गंगातीरीं स्वजनसदसीं वंगकालीसमोर,
सिंहध्वानें अचुक हरिला भारतभ्रांतिभार. ६



उत्कर्षाचा अतुलबल जो मंत्रराज स्वराज्य,
तद्द्रष्टा तूं अभिमत महा दिव्यदृष्टि सुपूज्य;
तैसी त्याची विजयवरदा देवता आत्मनिष्ठा,
दौर्बल्या जी निवटुनि क्षणीं वाढवी संप्रतिष्ठा. ७
इच्छाशक्ति स्वभुजबल हें कीलक स्वावलंब,
स्वातंत्र्याचें मधुर फल ही प्राप्ति, नाहीं विलंब;
शोभे दादा म्हणुनि तुजला एकट्या ही महर्षी,
पावित्र्याची परम पदवी श्रेष्ठकार्यप्रदर्शी. ८

---

१ जलमार्ग. २ नगारा. ३ सभेंत. ४ आधार; धीरा.

ध्येयप्राप्तिस्तव सुलभ जीं साधनें सूत्ररूपें,
स्वालंबादि प्रमुखबल तीं बोधिलीं त्वां हुरूपें;
वाक्तेजें त्या परि बधिरता प्राप्त झाली अनेकां.
मार्तंडाच्या प्रखर किरणीं जेविं अंधत्व घूकां! ९
' वेडा दादा ' म्हणुनि तुजला दूषिलेंही तयांनीं,
पाजोनी तूं परि वचसुधा बोधिलें त्या निद्रानीं;
पाटीरांगीं निशित परशू मारितां तन्मुखास,
लागावा हें समुचितचि कीं गोड खासा सुवास! १०
जाशी दादा विगलित तनू टाकुनी तूं इथें ही,
येईं येईं परि परतुनी होउनी दिव्यदेही;
कर्तृत्वाचा शिथिल भरतीं जीव घालावयास,
सामर्थ्याची हितकर तया जागृती द्यावयास. ११
शेवीं आतां विनति तुजसी हीच बापा महर्षे,
आशीर्वादें तव सुफल हो ध्येय अस्पत् प्रकर्षें,
एकत्वाची त्वरित फलदा भावना बद्धमूल,
होवो जावो सकल विलया भावभिद् भेदशूल! १२

---

## ४. वज्राघात!

दुःखाचा अतिरेक झाल्यावर हृदयाचें हृदयत्व मावळून व दुःखाचें दुःखत्वच नाहींसें होऊन मुखावाटें खालील उद्गार निघणेंच साहजिक नाहीं काय?

पद ( चाल--उरला भेद न ज्या...... )

येइ न रडुं आतां मजला, टिपुस न दिसेल डोळ्यांला ॥ ध्रु० ॥
झराच प्रेमाचा अटला, लवहीं ओलावा नुरला;
जरी तो भानु शिरीं पडला, अथवा हिमनग कोसळला;
जरी वा प्रलय आजि झाला, पुढें कीं काल मूर्त ठेला;
करुणामूर्ती कवि भवभूती साक्षात् जरि आला,
फोडिल नच या दगडाला! ॥ १ ॥
कवणा कवणास्तव म्हणुनी, रडूं मी धाय मोकलोनी;
काला! विष्णु तुवां हरुनी, केलिस माझी बहु हानी;
माधव खुपला तव नयनीं, श्रीधर पाडिलास पचनीं;

गोपालहि मम गिळुनी अनुपम चाटितोसि जिभल्या;
वद का भुका न तव निवलया ? ॥ २ ॥



(सुप्रसिद्ध कादंबरीकार हरि नारायण आपटे.)

अगणित रत्नें मम ऐशीं, अभिनव गुणतेजोराशी;
हरुनी अदया प्रतिदिवशींऽ, नकळत तूं चुटकीसरसी;
केलें दग्धहृदय सजसी, वेडी विकलमना विवशी;
सजीवतेची वृत्ति निमाली वारा जणुं प्याला;
जिव हा वैतागुनि गेला ! ॥ ३ ॥

स्मरुनी पूर्वदुःखभोग, असतां मन्मन सोद्वेग;
पुनरपि ओढवला भोग, दुर्धर किति योगायोग;
जिरे जों तो न दुःखवेग, दाटे नव शोकावेग;
बालकरामा, मनोभिरामा गिळिलें जों काला;
तों तूं माझा हरि हरिला ! ॥ ४ ॥

कशाचा खेद होतसे हा, कशाला दीर्घ उसासा हा;
कशानें अधर कंप पावे, असें का हृदय हेलकावें ?
कशाला पावतसां मोहो, अशानें काय घडे लाहो !
मिशाळ बाया केवळ झाला दुःखरोदनाला;
किंवा दळण दळायाला ! ॥ ५ ॥
करा हो स्मारक या गाढें, गिरवा तेच पुन्हां पाढें;
गुणांचे गा गा पोंवाडे, योजुनि शब्द जाडजाडे;
यांहीं दुःखांचे खाडे, भरुनी, काय सौख्य वाढे ?
उषःकालिच्या सूर्योदयिंच्या गावें चंडोला;
गडींच्या कीं त्या सिंहाला. ॥ ६ ॥
कळकळ कांहीं जरि साची, असे या मातृभूमिकेची;
तैशी चाडहि अब्रूची, किंवा पूर्वजकीर्तीची;
गळ्याची आण याच साची, तशी त्या हरिगोपालांची;
कर्तव्याची शपथ चला घ्या त्यजा आळसाला;
गिळोनी दुःखभार सगळा ! ॥ ७ ॥

---

## ५. दिवंगता नागकन्या इलावती !*

### अभंग.

इले ! नागकन्ये ! ' देहदेहभोग, यांचा पूर्ण त्याग, करोनीयां. १
जासी निजधामीं,' वृत्त आयके जों, चित्त बेलगामी, स्थिरावलें. २
क्षणभर तरी, गात्रें पांगुळलीं, वृत्ति बावरली, दुःखक्षोभें ! ३
कोण कोठिल तूं, ठावें हें नसोनी, मोहें झपाटोनी, टाकियेलें ! ४
गोड तुझीं, काव्यें डोळियांपुढारां, येवोनि झरारा, ठाकलीये. ५
भिन्न जातगोत, भिन्न हवापाणी, भिन्न वेशवाणी, भिन्न सर्व. ६
भिन्न जन्मभूमी, भिन्न रूपकांती, भिन्न चालिरीती, भिन्न सारें. ७

---

* Ella wheeler wilcox ही जगत्प्रसिद्ध अमेरिकन कवयित्री ता. ३१ आक्टोबर १९१९ इ. रोजीं आपले वयाचे ६४ वे वर्षी [ जन्म. इ. स. १८५५ ] दिवंगत झाली. तिला उद्देशून प्रस्तुत कविता लिहिलेली आहे. वरील हकीकतीवरून, या कवयित्रीला ' नागकन्या ' कां म्हटलें हें चाणाक्ष वाचकांचे सहज लक्षांत येईल.

स्वातंत्र्य-सौभाग्य, अपूर्व मंगले ! तुजसी लाधलें, पूर्व पुण्यें. ८
त्याचाच व्युत्क्रम, मज अभाग्यासी, काय ठावें तुशीं ? दुःख माझें. ९
डोळे असोनीयां, अंध मी जन्मलों, बधिर गे झालों; कान जरी. १०
मुखवाणी मातें, दिली नारायणें, परंतु दैवानें झालों मुका ! ११
जरी बाह्यात्कारीं. मांदे मूर्त भेद, तरी गे अभेद, अंतरंगीं. १२
वाटे म्हणोनी हें, मन धांव घेई, लागे तुझेठायीं, वेल्हाळे गे ! १३
काय जादू शब्दीं, तुवां सांठवीली, वृत्ति मोहियेली, माउलीये ! १४
हृदयाचा वीणा, गळे आपोआप, त्वदर्थ विलाप, करूं कैसा ? १५
देई देई बाई, दिव्य तुझा वीणा, गाईन तराणा, तुज एक. १६
चित्तींचें वांच्छीत, घालीन गे कानीं, मधुर शब्दांनीं, अंशमात्रें. १७
पाठीं पोटीं वाटे, तुझिया गे यावें, स्वस्थ पहुडावें, अंकीं तुझे. १८
दिव्य गान तुझें, ऐकत ऐकत, गुंगावें निवांत, स्कंधीं तुझ्या ! १९
जन्म घेवोनियां, तूंच किंवा यावें, मज सुखवावें, भूषवोनी. २०
माझ्या अंकभागीं, निजवीन तुशीं, जिवाची असोशी, हीच एक. २१
सुखगंगेतोनी, उसळोनी वरी, आल्या ज्या बाहेरीं, काव्यशुक्ती. २२
कांति आकृती कीं, त्यांची न्यहाळीत,बसूं दे समस्त,लोकांना या.२३
हृदयसिंधून, परि मी तुझीया, बुडी घेवोनियां लागवेगें. २४
डोई खुपसोनी, अंतर्लोचनांनीं, काढीन शोधोनी, काव्यमुक्ता. २५
विद्रुमवल्लरी, विद्रुमकुहरें, काढीन निर्धारें, शोधोनियां, २६
किती बैसल्या त्या, तळीं सागराच्या,नौका विचाराच्या,भंगोनीयां.२७
काढोनि बाहेरीं, करीन मी गाणीं, माळीन माळांनीं, तुजलागीं. २८
इले नागकन्ये ! सर्वजनमान्ये. सुकीर्ति अनन्ये, धन्य तुझी. २९
काय लागाबांधा, असेल पूर्वीचा, नेणे अनंताचा, तनय हा. ३०
तरी एक वाटे, तुझ्या अविनाशी, चिदंशी आत्म्याशीं, जीवेंभावें– ३१
अशाच निर्गंध, फुलांची निस्तेज, वहात्री अव्याज, माला एक. ३२

---

१ 'Introductory verses' म्हणून या कवयित्रीची एक कविता आहे त्या कवितेंतील मजकूर व प्रस्तुत अभंगाच्या २२ ते २७ चरणांतील मजकूर इतके परस्परांना जुळते आले आहेत कीं एकाद्याला हें त्या कवितेचें भाषांतरच आहे असें वाटेल. परंतु प्रस्तुत लेखकानें ती मुळींच वाचलेली नाहीं, हें येथें मुद्दाम नमूद करीत आहे. प्रसंगोपात विषयाशीं तादात्म्य झालें असतां कशी मौज होते याचा हा एक मासला आहे.

# तरंग ६ वा.

## १. मृदंगास

पद [ किति कपटि असति...... ]

[ मृदंग लागण्यापूर्वी ]

१

कां करिसि अशी कुचराई! मृदंगा! कां करिसि० ध्रु०
निशिदिनिं दंगा करुनि मृदंगा! मांडिसि किति पुंडाई. १
चल, संगातीं जाउं मिळोनी थोडि करीं चपळाई. २
सुखरंगीं या भंग न करिं तूं दाविं तुझी चतुराई. ३
मंजुभाषणी ध्वनिमंजूषा हांसे तुज तव ताई. ४
ठकठक तव शिरिं केव्हांपासुनि, करिं न येसि परि ठायीं! ५
गदगदवुनियां अंग खिळखिळे, होइ लाज तरि नाहीं! ६
तोंडभरी मम खाउनि मलिदा, दाविसि ही चतराई। ७
आण असे तुज रसिकांची या ताळ्याला झणिं येई. ८

[ मृदंग लागल्यावर ]

२

कां करिसि अशी वद घाई, मृदंगा कां करिसि० ध्रु०
' धिक् त्वां धिक् त्वां ' वदसि मला तूं, होसि भला उतराई. १
ज्याचें खाशी निंदिसि त्यातें, अतुळ थोर तूं भाई! २
सामदाम मम वाया गेले, आतां मी निरुपायी. ३
ताडियलें जरि उभय मुखीं तुज, लाज तयाचि तुज नाहीं. ४
निर्मल तव मुख काळें केलें, फांसुनि बघ हें शाई. ५
कृष्णमुखें या खुशाल आतां, आरड भय मज नाहीं! ६

## २. तार्किक तर्कट.

[ चक्षुर्वै सत्यं या न्यायानें धडधडीत डोळ्यांसमोर दिसत असणाऱ्या गोष्टींबद्दलसुद्धां कित्येक अरण्यपंडित कसे तर्कवितर्क करतात व त्यांचें समाधान अखेर कसें करावें लागतें याची थोडकीशी चुणूक खालील कवितेंत आढळेल. ]

आर्या. ( गीति )

" कां बोलसी मृषा तूं मींही प्रत्यक्ष पाहिलें डोळां,
जातां अस्ता सविता दिसला जणुं लाल अग्निचा गोळा, १
सत्यापलाप न करीं, न वदे केव्हांहि मी निराधार,
प्रत्यक्षाप्रत्यक्षहि देतों तुज घे अनेक आधार. २
' उदये सविता रक्तो रक्तोऽस्तमने ' न का तुला पाट ?
संथा संथपणें तुज देतों शेंडी धरोनि; करिं पाठ. " ३
" निर्णय खरा न होणें कितिही जरि बोललासि आरडुनी,
पायां पडून माझी करुणा जरि भाकिलीस वा रडुनी. ४
होतां न मनाजोगें आई रागा चढूनियां माझी,
चडफडुनि आपुल्याशीं बडबडुनी ती जळे मनामाजीं ! ५
शमवी निरुपायानें राग जसा ती अम्हांसि मारोनी,
किंवा दणदण भांडीं भूमीवरती सरोष अपटोनी. ६
तूंही याचाच तसा अंतीं करणार खास आलंब,
आहे जाणुनि मीही, विनति परी माजवीं न आडंब. ७
रवि पीत तप्त हेमापरि अस्तीं हें त्रिकाल साचार,
स्वयमेव सत्य त्याला व्हावे द्याया कशास आधार ? ८
आधाराश्रित ज्याचें अस्तित्वहि तें असत्य बा, खास,
लागे न आरसा कधिं हातींच्या कांकणां पहायास. " ९
" घेसी लहान तोंडीं मूर्खा. मोठा उगाचि कां घांस ?
बसतां घरांत अडकुनि येइ न तुज अन्नलेश खायास ! १०
नसता वाद कशाला आतां इथल्या इथेंचि या कालीं,
लाली सूर्यास्ताची दाखवितों मी तुझ्याच या गालीं ! " ११
" मिथ्या वादांचा या शेवटीं शेवट असाच ठरलेला,
होतें बाटत नवलाचि बघतां अझुनी तुला न रागेला ! " १२
आली साजत वाजत चपला चपराख पूर्ण वेगांत,
पडणार जों कडाडुनि, निसटे तों तो कुमार निमिषांत ! १३

## ३. व्यग्रचित्त.

[ चिंतननिमग्न असल्यामुळें दाराशीं आलेल्या मित्राची
नाहीं. त्यावरून उभयतांत झालेला संवाद खालील कवितेंत प्र

पद ( चाल—धनराशी जातां मूढा......

'कविराया, धुंदी लोचनीं या ।
चढली कशी वद रे अशी' ? ॥ ध्रु० ॥
'कृष्णभक्तिची सुरा पिता मी,
जडेंद्रियें हीं बेलगामी,
प्रेमें रमलीं हरिनामीं,'
'मज न रुचतें, वदसि भलतें,
पडशी फशीं, कथितों तुशीं' ॥ कवि०
'कोणि सुमती अमति कोणी,
जागृत कोणी बाळ कोणी,
कांहीं नयनें या भुवनीं,
सतत हसती, कितिक रडती,
मद हा अशी, छवि दे मशीं' ॥ कवि०
'स्वस्थ उभा वद का असा तूं,
चित्तिं धरोनी काय हेतू,
लक्षिसि नभ वद त्यज किंतू,'
'पद जड खरे, हृदयभारें'
'उचित न तुशीं, गमतें मशीं' ॥ कवि
'कुणी धांवती चालतीही,
रेंगाळति कीं बैसतीही,
मुक्त कुणी कीं बद्ध पाहीं,
पद जड खरे, हृदयभारें;
स्थिति ही अशी, सुखवी मशीं' ॥ कवि

# ४ नवरसमंजरी.

श्लोक [ वृत्त वसंततिलका ]

मंजरी १. ( शृंगार )

आलिंगुनी समुद मी हृदयेश्वरीला,
जों चुंबिणार धरुनी हसिताननाला;



' अं: काय हें ' वदलि तों मुरडोनि लोल,
अद्यापि ते स्रवति मोद मनांत बोल. १

* * * *

मंजरी २. ( वीर )

" कां हो सचिंत दिसतां सगळेचि आजी,
कीं पातली जणुं भयंकर विघ्नराजी; "



नाना सखेदवचनीं कथिती तयातें,
" बाळा, चढाइ करुनी रिपु ये पुण्यातें.

---

१ श्रीमंत सवाई माधवराव लहान असतां इंग्रज मुंबईहून पुण्यावर चालून आले होते. त्यावेळीं इंग्रज व मराठे यांची वडगांव येथें लढाई होऊन तींत इंग्रजांचा सरदार ' इष्टुर फाकडा ' कामास आला, या गोष्टीचा स्मृति वरील कवितेंत आहे. पेशव्यांचे बखरींत प्रस्तुत गोष्ट दिलेली आहे; अर्थात् वरील श्लोकशब्द बाल माधवाचे तोंडचे आहेत.

हस्तें स्वखड्ग फिरवी भटभूपबाल,
बोले " पहा चिरियला रिपुकंठनाल; "



ये वृत्त तों रिपु पराजित जाहला तें,
अद्यापि वीरवच तें मनिं मोद देतें ! २

× × × ×

मंजरी ३. ( करुण )

' मूर्तींत दोन जरि ते प्रकृतींत एक, '
मी एकला न कथिं हें, कथितील कैक;
बाह्यीं परंतु जगता दिसत्तां न मित्र,
अन्योन शत्रु गमले किति हें विचित्र ! १



आला समीप कळतां निज–अंतकाळ,
गोपोळ बाहि अपुला प्रिय मित्र बाळ;

२ कै. गोपाळराव आगरकरांच्या अंतकाळच्या वेळचा हा एक प्रसंग आहे. इ. स. १९१६ सालीं मुंबईस ' आगरकर डे ' साजरा केला; त्या दिवशीं पुष्कळांनीं त्यांच्या स्मृति गायिल्या पण या सर्वविश्रुत गोष्टीचें स्मरण कोणासच आलें नाहीं !

दाटे गळा गंहिवरें नयनांस पाणी–
आलें, प्रयत्निंहि मत्या उमटे न वाणी ! २
' हाकेस अंत्य मम या दिधलीस ' ओ ' तूं,
आलास धांवत सख्या ! धरितां न किंतु;
घालूं गळां चल मिठी, धरिं हात माझा,
अन्योन्य भेद विसरूं, अजि बाळराजा ! ३
' होता तसा मजवरी तव लोभ राहो;
येतों सख्या ! मज कधीं विसरूं नको हो,
मी पूर्व वैर गिळुनीहि मदंतकाळीं,
जी मागतों तुजसि ती मज भीक घालीं ! ४
' आला कधीं विधिवशात् विषम प्रसंग,
' कॉलेज ' रक्षिं अपुलें नच पावुं भंग; '
गोपाळ हें वदुनियां मिटि लोचनांतें,
कारुण्यवाक्सस्मरण सद्रव मोदवीतें ! ५

* * * *

मंजरी ४. ( अद्भुत )

जी जन्मतांच दुहिता नयनाभिराम,
' गोदू ' असे श्रुत तिचें स्वजनांत नाम,
ये यौवनीं नवल तें परि काय होई,
होती तिला पुरुषधर्म असोनि बाई ! १
वैद्याग्रणी म्हणुनि जो श्रत ' वॉनलेस, '
धन्वंतरीच दुसरा नच ऊन लेश !
त्या तें स्वकर्मनिपुणें साधि वैद्यरत्नें,
मोठें परीक्षुनि तिला विविध प्रयत्नें. २
' गोविंदराव तुम्हि हो नच गोदुबाई, '
बोलोनि पुंवपु दिली तिज सौख्यदायी;

---

१ मिरजेचे प्रख्यात शस्त्रवैद्य डॉ. वॉनलेस यांचें नांव महाराष्ट्रांत सर्वविश्रुत आहे. यांनीं एकदां श्रीमंत पंतप्रतिनिधि यांच्या संस्थानांतील एका तरुणीस शस्त्रक्रियेनें पुरुषत्व दिल्याची सर्वश्रुत गोष्टच या कवितेंत उद्धृत केली आहे.

अत्यद्भुता कृति अशी स्मरतां अनन्य,
आपैंच शब्द मुखिं ये ' जय धन्य धन्य ! ' ३
ती गूढ विस्मयकरा कृति ईश्वराची,
शस्त्रक्रिया कुतुकदाहि भिषग्वराची;
पाहोनि अद्भुतरसीं मन होय लीन,
' गोविंद-गोदु-चरितीं न रिझेल कोण ? ४

* * * *

मंजरी ५. ( हास्य. )

झाली प्रसू व्यसु यदा, मज शांतवाया,
आल्या कितीक जमुनी कनवाळु बाया;
बोधें प्रबोधन तदा वदल्या करोनी,
' आम्हांस तूं स्वजननी सुखदा प्रमाणीं ! १
होता दिवंगत परी दयिता मदीया,
ये स्त्री न एकहि कुणी मज शांतवाया;
' पत्नी प्रमाणिं मजला, ' वदली न वा ते,
हास्योत्थवाक्स्मरण तें हंसवी मनातें ! २

* * * * *

मंजरी ६. ( भयानक. )

स्वातंत्र्यशैलशिखरावरि गोखल्यांनीं,
बैसूनियां प्रलपितध्वनिपाटवांनीं;
केल्या स्फुटा भरतभूपतिनीतिरीती,
अत्यल्पही न धरितां स्वमनांत भीती ! १
उच्चाश्रय त्यजुनि तो परि जों न येई,
तों वेढिलें त्वरित त्या नृपसेवकांहीं !
पाहूनि दुर्गम दशा प्रखर प्रसंग,
स्वातंत्र्यवाक्श्वसित तद्धृति हो विभंग ! २
त्या रक्तदृष्टि अपुल्यावरि लागलेल्या,
जिव्हा विलोल रुधिरास चटावलेल्या;

१ माता. २ मृत.

दंष्ट्रा कराल रदनावलिही सुतीक्ष्ण,
ती लोहवक्रवलयें यमपाश आन ! ३
वर्णं विकृष्ण वरुनी परि वक्षिं कृष्ण,
वस्त्रेंहि कृष्ण सगळीं असिकोष कृष्ण;
गोपालकृष्ण जरि धीर पडेचि कृष्ण,
कृष्णांबरांतरिं जसा घनवृत्त कृष्ण ! ४



पाहोनि कौरवचमू स्थिति उत्तराची,
झाली तशीच असह्य तई गोखल्यांची !
साक्षाद्बृहस्पतिच वाग्विजयी जयिष्णु,
तो शेवटीं परि वरी कृति हाय धृष्णु ! ५
गोपाळ तोंचि वदला नृपसेवकांला,
'माझ्याकडोनि अजि हा गुरुदोष झाला;
तेव्हां विचार लवही करितां न कांहीं,
मूढापरी बरळलों, मन आजि खाई ! ६

१ बेड्या. २ म्यान. ३ ढगांनीं झांकलेला सूर्य. ४ हीन.

याची क्षमाचि मजला करिजे नृपानें,
मानूनियां विमति वा मज बाळ तान्हें !
आतां वदें न कधिं मी नृपतीविरुद्ध,
देतों लिहून परि जें करणें सुबद्ध !' ७
आकाश कृष्ण वरतीं तळिं तोय कृष्ण,
नौकाहि कृष्ण वरि ते नृपदूत कृष्ण !
कृष्णा जसी मसि तसें मसिपात्र कृष्ण,
पत्रीं विकृष्ण परि तो लिहि वर्ण कृष्ण ! ८
' वाचाळता करुनि मी वदलों तिथें जें,
तें आजि भाजि मजला मम चित्त लाजे;
देवो क्षमा नृपति तो मज सेवकातें, '
ही वाक्सुनीतिधृतिदक् सुखवी मनातें. ९

* * *

मंजरी ७. ( बीभत्स )

चर्में जयांतुनि गळे नव लोह ऐशीं,
होतीं, तसेंच पडले किति मांसराशी !
पात्रें कवोष्ण रुधिरीं भरलीं अनेक,
चाले तसा पशुशवांतुनि रक्तसेक ! १
चांडालमंधिं असल्या कुशिकात्मजाला,
पोटास कांहिं बघतां मिळवावयाला;
बीभत्सपापकृतिची स्मृति खेदकारी,
रोमांचिता तनु करी मन घे शिसारी ! २

* * * *

तोटा जिथें न लवही चिलटां पिसांना,
उंदीर जेथ दिसती बहु धांवतांना;

---

१ शाई. २ विश्वामित्र ऋषि भुकेनें व्याकुळ होऊन एका चांडाळाच्या घरांत चोरी करण्याच्या उद्देशानें शिरले होते अशी कथा भारतांत आहे; त्या कथेची ही स्मृति आहे.

घोंघावतात जिकडे तिकडेहि माशा,
कोळी स्वपूरिषिं जिथें लिहिती नकाशा ! १
गाती प्रदोषसमयीं बहु जेथ डांस,
देतात मच्छर मुदें वरि साथ त्यांस;
घुंघूरटींहि हरिखें करितात नाच,
जेथें सदैव जलसा झडतो असाच ! २

जेथें विहार दिवसां सुरु मत्कुणांचा,
तैसा अमंगल अशा किति कीटकांचा;
वासे हळूहळु वरी कृमि पोंखरून,
पांसुच्छलें उधळिती जणुं दिव्य चूर्ण ! ३
चाले सदा किलबिलाटहि वाघुळांचा,
तों त्यांत भीषण मिळे ध्वनि टिट्टिभांचा;
पाकोळिया मिरविती विहिणीसमान,
साक्षात् जणूं नरक हाचि नसोचि आन ! ४

वस्त्रें अमंगल तनूवरि गोणपाट-
घालोनि निश्चितपणें प्रहरांत आठ;
काथ्या सदैव कुटितां वळतां चऱ्हाटें,
कीं रंग सिद्ध करितां उठुनी पहाटे- ५

बीभत्स या स्थलिं अशा नरकेसरीनें,
केले किती श्रम तरी मुखिं गात गाणें;
ती तत्स्थितिस्मृति अहा ! किति कष्टवीते,
होते तनू पुलकिता स्तिमिता मती ते ! ६

* * * *

मंजरी ८. ( रौद्र )

स्तंभांतुनी प्रकट जों न नृसिंह झाला,
मांडीवरी स्वनखरीं चिरि कश्यपूला;
झाला गतायु तरिही न तयास सोडी,
चावी रदां कडकडा तनुमध्य फोडी ! १
प्रऱ्हाद तो विनवि तैं ' पितयास सोडा,
फाडा शवा न अशिवा अयशा न जोडा;

होई न लाभ वधुनी प्रभुजी मृताला,
हें काय त्यां नयपते ! कथिजे तुम्हांला ! ' २
' लाधेल अन्य तुजसें नव भक्तरत्न,
कीं काय हें वधतसें करुनी प्रयत्न; '
जें हें नृसिंह वदला दनुजात्मजातें,
अद्यापि रौद्रवच तें मन मोदवीतें ! ३

* * * *

' राष्ट्रीय दिव्य परिषद् भरणार जेथें,
क्षुद्रा समाजसमिती भरणें न तेथें !
जे निश्चयास मम या प्रतिरोधतील,
ते खास आत्मकृतिचें फळ चाखतील ! १
जाळीन मांडव उभा ढवळया दिशीं या,
हीतें तुम्हांसि कथिं मी अजिं निक्षुनीयां; '
कोणास तें करवला न विरोध त्यातें,
अद्यापि रौद्रवच तें मन मोदवीतें ! २

* * * *

मंजरी ९. ( शांत )

शिक्षा षडब्द दिधली जंइ दावरानें,
दुःखाग्नि जाळि हृदया जशिं दाव रानें !
तो तें नृसिंह वदला नयमंदिरांत,
' दोषी न मी ' मज कथी मम पूत चित्त ! १
' आपत्तिनेंच असल्या असहा मदीय,
होणें असेल जरि उन्नति भारतीय;
सोसावया समुद हा तरि सिद्ध तीतें,
गंभीर धीर वच हें मन मोदवीतें ! २

* * * *

---

१ इ. स. १८९५ सालीं पुण्यास ११ वी राष्ट्रीय सभा भरली होती; त्या वेळीं राष्ट्रीय सभेच्या मंडपांत सामाजिक परिषद् भरूं नये अशाबद्दल फार तंटे झाले. त्यावेळीं कै. श्रीधर विठ्ठल दाते वरील शब्द बोलले होते, त्याची स्मृति ही आहे.

मंजरी १०. ( वत्सल )

' पापी पहा तालि खला किति गोल गोल,
काका तुला वहिनि कीं तुद देउं बोल; '
धाविन्नलों उभय तें वच आयकोनी,
चुंबावयास कुतुकें करिं त्या धरोनी ! १



तो बैसला अवचिता शिशु धूर्त खालीं,
तेणें परस्पर मुखें अमुचीं मिळालीं;
झालों सलज्ज तरि तें सुखवी अम्हांतें,
वात्सल्यवावस्मरण तें किति मोद देत !

---

## ५. राजपारितोषिक !

[ एकदां एका कवीनें एका राजाकडे आश्रयार्थ आपलें काव्य पाठविलें असतां त्यांस महाराजांकडून खालील उत्तर आलें. ]

### आर्या (गीति.)

झालों प्रमुदित भारी, बघतां या तव अपूर्व काव्यास,
काव्यांस लाजवी मग, तुळितां न उणा पडेल का व्यास? १
बाह्यांग फार मोहक केवळ तद्दर्शनेंच हरलों कीं,
लोकीं प्रबुद्ध केलें नसतें, असतोंचि आजि हरलोंकीं ! २
किति रम्य वर्णमुद्रा, मुद्रा निमिषांत पालटी वर्ण,
वर्णन किती करावें साक्षरवर्णा अवर्ण्य जो वैर्ण. ३
रूपप्रताप इतुका वास्तव शिरलों न अंतरंगांत,
रंगांत अंत तेणें, बुडलें मन भीरु या तरंगांत ! ४
आनंदें योजियलें द्यावी ' कविचंग ' ही नवी पदवी,
पदवीच वाक्तपाची, यश इतुकें अन्य कोणतें पद वी. ५
होतें मनीं करावें राजकवी देउनी तुम्हां सर-की,
' सर ' कीं वदों न कोणी, वदशिल परि पार्शवी नको सरकी ! ६
वास्तव नियोजिलें कीं द्यावा नव धवल एक गजराज,
कविराज ! हीच इच्छा, व्हावें आपण सदैव सुखभाज ! ७
अट एक ही परी कीं, त्याची करितां मुळीं न आबाळ,
सांभाळावें प्रेमें, जणुं कीं प्रत्यक्ष आपुला बाळ ! ८
गजभार वा नको हा, तुमच्या येणार काय कामातें ?
कां मातें चिंता परि ? पुरविन अपुल्या समग्र कामातें ! ९
म्हणुनी प्रसन्न चित्तें देतों योजून पंच रूपक मी,
रूपक हें न खरोखर, होवो अपुला न कीं, हुरूप कमी ! १०
न्यावें धन हें अपुल्या खर्चें नगरीस तूर्ण येऊन,
ये ऊनता न येणें, अपयश या प्रार्थनेस येऊं न ! ११
इतुकें नकोचि, घालुनि खर्ची कीं आपुल्याच नांवानें,
नांवानेंच जमाही करवूं, हें कोण ना वदा वानें ! १२

---

१ शुक्राचार्यांस. २ वर्णन. ३ पशुसंबंधीं.

## ६. वरची वाट.

पद [ चालः—घनश्यामसुंदरा श्रीधरा........ ]

सौख्यकदंबा नगरीरंभा रम्या मुंबापुरी,
मयासुराची मोहमयी ही कन्या गुणसुंदरी. ध्रु०
अमरेन्द्राची अमरावति कीं रावणलंकापुरी,
कनकभूषिता द्वारावतिची प्रतिमा जणुं दूसरी;
इन्द्रप्रस्थाची ही किंवा कांति काढिली जणूं,
कमनीयाकृति कैलासचि कीं तळीं उतरला म्हणूं;
लावण्याची लोचनलुब्धक ललिता लतिका नवी,
भान हरपवी मती गुंगवी मनोमधुप मोहवी;
जिकडे तिकडे एकसारखीं उंच उंच मंदिरें,
सानुश्रेणीपरी पसरलीं गगनचुंबि गोपुरें;
स्तिमित विस्मयें होउनि बघतां मान उचलुनी वरी,
शिरोविभूषणं पडे मागच्या मागें न ठरे शिरीं !
विविध ध्वनिंच्या कोलाहलिं या शब्द न कर्णीं पडे,
नीट एकही न ये आयकूं. बसले जणुं कीं दडे;
अध्वनिकारी रथ अश्वांचे पवनजवें धांवती,
मागुनि पुढुनी एकामागें एक भराभर किती;
त्यांतचि पळती चक्रवाहनें फटफट रव चालतो,
विघ्नशतें हीं बघतां होतो घामाघुम जीव तो.
स्वैरगतिक क्षिति त्यांत धांवती घणघण घंटा झडे,
न कळे जावें कसें कुठोनि हृदय किती धडधडे !
फेरीवाला मधेंच कोठें अस्फुट बडबड करी,
सोत्सुक पाही अनभ्यस्त नर उगीच वेड्यापरी ! १
मीही होतों असाच नवखा विपरित झाली परी,
भांबावुनियां गेलों पाहें भिरभिर खालीं वरी !
झालों होतों किती मुंबई उत्सुक पाहावया,
हौस सर्व परि जिरली, मन्मन इच्छी परतावया.
मुंबईस ही पहिलिच होती वेळ यायची खरी,
परतायातें वाट न गवसे झाली मति बावरी !

---

१ रबरी टायरच्या घोड्यांच्या गाड्या. २ बायसिकली. ३ मोटार.

संगें होते चार सोबती सर्वांचि माझ्यासम,
जरि धीराचे घाबरले ते जमे न कांहीं जम;
पत्ता होता लिहुनि आणिला तो न कुठें सांपडे,
काय करावें पुढें कळेना कोडें मोठें पडे !
काय भूल तैं पडली न कळे चुकून पत्त्यांतलें,
स्मरे न मजला एकहि अक्षर वेडें मन जाहलें.
चक्र रथाचें भूनें गिळितां कर्णाची जी गती,
झाली माझी तशीच अगदीं जागृत हो न स्मृती !
मुंगुस असतां समयपरत्वें यावें तोंडीं जसें–
' सुमंग मुंगुस मुसुंग घुमुसहि ' झालें माझें तसें !
' बोलघुमट ' कीं ' गोलघुटम ' कीं ' वर्तुलगुत्ता ' 'पिठा',
असें वदत मी किती जिवाचा केला आटापिटा !
घर्म दरदरा सुटला, गात्रें शिथिल जाहलीं किती,
चमचम डोळ्यापुढें काजवे माझ्या तैं चमकती !
पडे कोरडी जीभ, बोबडी वळली माझी पुरी,
करपद गळुनी सांधे धरले भ्यालों बहु अंतरीं ! २
भीषण जीवनसंग्रामीं या मुंबईस त्यांतुनी,
कोण कुणाची करी चवकशी उगिच उभे राहुनी !
जो तो असतो कार्यनिरत कीं आपआपुल्यापरीं,
उसंत कोणा पसंत जरिही मौज पहाया तरी;
सुदैव अमुचें निकट आमुच्या बाल तेधवा कुणी,
पहात होता मौज आमुची तेथ उभा राहुनी;
एकामेकां घट्ट धरोनी आम्ही मार्गांवरी–
उभे पाहुनी हांसत होता आम्हां वरचेवरी !
वेडीं आम्ही जणूं श्वापदें भित्रीं रानांतलीं,
पाहुनि ऐसीं घाबरलेलीं मौज तया वाटली.
काडीच्याही आधारातें बुडतां घेतो जसा.
सहाय त्याचें मिळवायाला मीही पाहीं तसा.
उसना तेव्हां धीर आणुनी सहज जणूं त्या पुसें,
' बाळा, वरची वाट सांग ही कोठें मज जातसे ? '
सस्मित करुनी थोडी मुद्रा पहात गगनीं मुदें,
' वरची ही ही ? वरची हो का ? ' बालक मजला वदे;

'आभाळीं ही सरळ जाउनी जाते आणिक वरी,
लांब लांब ही खूप लांब हो अशीच बाप्पा-घरीं !' ३

## ७. निरस्त नगरी.

पद [ चालः—अर्ध तनू वाळूंत बुडाली...... ]

श्रीकृष्णाची भुवनसुंदरी नगरी द्वारावती,
कनकमय होती जन सांगती. ध्रु०
काव्यपुराणें एक स्वानें मधुशब्दीं वर्णिती,
इच्यापरि पुरी न दुसरी क्षितीं;
भूमिका प्रसवल्या बहुविध धान्या धना,
उपवनीं येथल्या लाजविलें नंदना,
गोपुरीं रोधिलें गगनविहारी घना,
बालबालिका सदा खेळल्या स्वच्छंदानें किती,
वर्णितां कुंठित होते मती ! १
देवदेवतांपरि नरनारी सदातरुण दंपती,
भासले जणुं कीं मन्मथरती;
वनीं उपवनीं सैकतपुलिनीं सुंदर सुमनीं दलीं,
स्वनामें त्यांहीं आलेखिलीं;
जी एक अलंकृति वसुंधरेची खरी,
द्वारका अशी ती अनन्य भूमीवरी,
जी अतुल सुखाची कधिं न संपती झरी,
अदय सागरें बुभुक्षितें त्या बघतां बघतांच ती,
घातली जठरीं जन सांगती ! २

* * * *

दंतकथा ही काय वाटतें ? असत्य मनिं मानतां,
अनुभवें कळेल परि पाहतां;
पौराणिक हें जरी कथानक शब्द शब्द यांतला,
खरोखर सत्यानें ओतला;
त्या अनंत निर्गत कालमहासागरीं,
स्वानंदसुखाची तुमची यौवनपुरी,
घसरुनी क्षणोक्षणीं बुडतां हो सत्वरीं,
साश्रुलोचनीं पहाल जेव्हां वर्म तदा निश्चितीं,
यांतलें कळेल तुम्हांप्रती ! ३

## ८. पायस

श्लोक—[ शार्दूलविक्रीडित ]

जीवन्मुक्त जितेंद्रियार्थ मुनिही यत्नें मनोदान्तता,
सोडोनी वरिती यदर्थ हरिखें क्षुद्रैव लोलंगता;
यत्प्राशीस्तव देवतापितरही होतात मोहाकुल,
पीयूषोपम पूत पायस असे रक्षो अम्हां सोज्ज्वल. १

आर्या ( गीति )

वसुधासुधा सदभिधा देउनि धर्में जयास गौरविलें,
माहात्म्य पायसाचें गावें त्या सरस केंवि म्यां अबलें ?
श्रीमद्भगवद्गीतोपनिषत्पावनपयस्विनीदुग्धा,
प्राशवि फणिवरमर्दन उद्धरि जो बालगोपिकां मुग्धां; ३
भूतेश भूतिशालि भवभयहर भक्तभावमधुभृंग,
माकंदमंजरीमधु भक्तपिकां तो तसा रमारंग; ४
पार्थसखा फणिशायी बलिजेता भक्तकामकल्पतरु,
मंदाकिनीपदांघ्री मंगल माधव महावदान्यगुरु. ५
यत्पावनसहवासें व्रजभू प्रत्यक्ष जाहली स्वर्ग,
पायस पवर्ग सेउनि देइ जनां तो इथेंचि अपवर्ग ६

पृथ्वी.

नितान्त तव माधुरी अनुपमा अशी पायसा,
तुझ्या सुखद संगमें अमरभूमि होई रसा;
समोद तुज सेवुनी ससख वासुदेवें सदा,
करूनि तव ठेविली सुचिर बा ! यशःसंपदा ! ९

स्रग्धरा.

दुर्वासें मत्त विप्रें तुजसि विटुनियां टाकितां स्वीय पात्रीं,
श्रीकृष्णें आदरानें स्थल तुज दिधलें आपुल्या सर्व गात्रीं:
' तूं अन्योच्छिष्ट ' हेंही तुजसि न वदतां सेवि तैं देवराय,
तूंही बा ! त्यास त्याचें अतुल बल दिलें; होय तो वज्रकाय ! १०

पृथ्वी.

अपार महती तुझी तव निधीप्रती क्षीरधी,
पयोधि अथवा कुणी वदति गौरवानें सुधी;

त्वदीय सुखसागरीं भुजगमंचि नारायण,
करी शयन पद्मिनी करि पदाब्जसंवाहन. ११
त्वदंग अभिमंत्रितां द्विजवरीं मुदा गौरवें,
अमोघबल होसि तूं तुजकडे न तैं पाहवें;
प्रतीत बल हें असे दशरथा तुझें जाहलें,
सशेषजगदीश्वरा सगुण व्हावया लागलें ! १२

शालिनी.

वर्णावें म्यां काय तें भागधेय,
ज्याचें त्याला तें नसें हेयदेय;
कौशल्येचे ये कुशीं देवराणा,
लाधे लोकीं रम्य रामाभिधाना. १३

पृथ्वी.

विनातरुसमाश्रया अवशवल्लरीचे परी,
अशोक तरुकाननीं ललित जानकी सुंदरी;
क्षुधाविकल पाहुनी तिज शचीन्द्र रक्षावया,
नियोजि तुज पायसा ! तिजसि शांतता द्यावया ! १४

भुजंगप्रयात.

नखोले गहोले फणोले अमूपें,
स्वरूपें तशीं शेवयादी हुरूपें;
तुला देउनी कामिनी सर्वदा रे,
तुझे मांडती चोज नानप्रकारें. १५

दिंडी.

समारंभीं कामिनीशोभनाचे,
परम मांगल्योत्सवीं दोहदाचे;
विविधरूपें तव रम्य रजतपात्रीं,
स्त्रिया झांकुनि ठेविती सौख्यदात्री. १६
पात्र बघतां उघडोनि तुझें साचें,
पुंस योषित् जें रूप दिसायाचें;
तयावरुनी बघतात शकुन भावी,
पुत्र व्हावा कीं सुता पुढें व्हावी. १७

### इंद्रवज्रा.

उष्टावणाच्या समयीं तसेंच,
माहात्म्य मोठें असतें तुझेंच;
क्षीरस्वरूपीं तव गोड घास,
देतात माता प्रिय तान्हुल्यास. १८

### वसंततिलका.

टाकूं नये धृत कधीं सहसा अनीगा,
आहे जशी तशिच ही तुझियाविषीं गा !
' माता मरे ' त्यजालियां तुजला विशेषें,
घाली मुलां भय असे जनता प्रकर्षें. १९

### द्रुतविलंबित.

कवळ गोड तुझा मृदु सुंदर,
वरवधू स्वविवाहिं परस्पर;
हंसत लाजुनि लोलविलोल तीं,
अभिनयें बिनयें मुखिं घालती. २०

### वसंततिलका.

दिव्यान्न तूं परम पावन गा म्हणोनी,
श्राद्धादि पुण्य दिवशीं बहु आदरोनी;
आद्यस्थलीं प्रथमतां तुज वाढतात,
प्रारंभि तेंविं तुज सादर सेवितात. २१

### शार्दूलविक्रीडित.

जन्मायत्त अनेक धार्मिक असे संस्कार जे संप्रती,
होती प्रत्यहिं तन्निमित्त अथवा जीं भोजनें भारतीं;
द्रष्टा तूं असतोसि त्या प्रमुखतां त्यांची यथासांगतां,
होईना तुझियाविणें तव अशी लोकोत्तरा मान्यता ! २२

### द्रुतविलंबित.

बहुपरीं, परि बा ! जरि तूं असा,
गुणिल कीं असती मधु पायसा !
तुजमधें वसती तरि दुर्गुण,
तुजसि भूषण तें नच दूषण. २३

अद्‌यता नयधीप्रती भूषवी,
कपट भूपतिचें यश वाढवी;
असित लांच्छन दे शशिला छवी,
विगुणही न तुझा तुज लांच्छवी. २२

मालिनी.

रविकर इतरां जे सौख्य देती अपार,
दुखविति परि घूकां तेच जैसे उदार;
ज्वरहत नर तैसा सेविती जों न तूंतें,
त्वरित यमपुरीचा दाविसी मार्ग त्यातें ! २३

वसंततिलका.

येसी पुन्हां परतुनी जंव भोजनांत,
झाला असें समजती जन भोजनान्त;
चाले सपासप असा ध्वनि ओरप्यांचा,
वर्षाव तो तुजवरी जणुं दूषणांचा ! २४

---

## ९. विनोदलहरी.

[ आपण एकांतांत स्वस्थ ( स्वे तिष्ठति सः स्वस्थः ) बसलों असतां मनाचा अप्रतिहत संचार सुरू असतो. या संचारांत मागें ऐकिलेल्या व वाचलेल्या नानाविध गोष्टींची त्याला स्मृति होऊन तें त्या त्या प्रसंगांत तल्लीन होत असतें. अर्थात् या स्मृति सुसंबद्ध नसतात. असो. अशा प्रकारें मनाला वेळोवेळीं झालेल्या कांहीं विनोदात्मक स्मृति प्रस्तुत कवितेंत गोंविल्या आहेत. ]

श्लोक. [ वृत्त वसंततिलका. ]

१. शृंगार.

हातीं प्रियेस धरुनी मृदुपद्मपाणी,
जों मंचकीं सुखभरें नृपराज आणी–
बोले हळूचि दयिता तंइ ती स्वनाथा,
श्रृंगारचार मज हे रुचती न आतां. १
नाहीं नवोढ ललना पतिराज आज,
वाटे कशी न गमतें मनिं बाइ लाज ?

आतां वसंत अगदींच लहान नाहीं,
वाटे तया अजुनि का न कळेचि कांहीं ? २
जेव्हां गडे सहज त्या दिवशीं मलाही,
आलिंगुनी स्वहृदयीं स्वकरद्वयांहीं;
प्रेमें मुखाप्रति असें मुख लावियेलें,
चूतें तयें सकलही तंइ पाहियेलें ! ३
तो तेधवां दिनिं दुजे इकडील नाम,
घेवोनियां मज पुसे हृदयाभिराम;
' घेती कसा तव मुका वद काल आई, '
बाजिंद सान जरिही बहु पोर बाई ! ४

* * * *

२. वीर.

' का साश्रु आज तव हीं नयनें विलोल,
कोणीं तुला छळियलें सखि बोल बोल;
झाला स्वजीव न कळे जड गे कुणास,
दंडावया वळवळे कर हा तयास. १
' हा देवि ! एक तव गे नयनांबुबिंदु,
प्रक्षोभवी बहुपरी मम चित्तसिंधु;
देईन आणुनि तया अनुभूति याची,
होईल शांति मम या तंइ मानसाची ! ' २
' शंका अकारण फुका मनचीच घ्यावी—
नी साप साप म्हणुनी भुइ धोपटावी;
यालागिं काय म्हणिजे तरि माणसानें,
जाणोत तेंच अपुलें; अबला न जाणे ! ३
' लागोनि नाथ विडिचा अपुल्याच धूर,
चाले मदीय नयनीं आजि अश्रूपूर;'
वाणी विनोदनपरा स्मरतां अशी ते,
अद्यापिही मज नवोनव मोद देते. ४

* * * *

३. हास्य.

मित्रासवें सहज मी करितां विनोद—
व्युत्पत्तिशास्त्रि शिरुनी, वदलों अगाध;

' हा यावनी ' हसन ' ये हसनावरोन,
याला न सम्यक गमे उपपत्ति आन ! ' १
श्रीकृष्ण तोंचि वदला हंसुनी मला, ' तूं–
' व्युत्पत्ति छान करितोसि नसेचि किंतु,
किट्सन्, किसन् हसन कीं हडसन् तयाच,
बंधू सहोदराचि हे सगळेच साच ! ' २

* * * *

४. अद्भुत.

' आरक्तपीत तनुकांति अवर्णनीय,
तुंबी महोदर असा बहु लोभनीय;
क्षेत्रीं विशाल शकटावरि घातिलेला,
येतां पथीं सहज म्यां अजि पाहियेला ! १
ओढावयास शकटाप्रति शैलशा त्या,
जोड्या अनेक धरिल्या जरि खास होत्या–
हाले न हा शकट तो तरि कांहिं केल्या,
युक्त्या बलासहितही विलयास गेल्या ! ' २
ऐकोनियां नव चमत्कृति ही अनन्य,
श्रोते स्मयस्तिमित बोलति, ' धन्य ! धन्य !
त्याचाच मित्र पुढतीं बहुतां दिसांनीं,
सांगे तया सहज एक अशी कहाणी. ३
' येतां गृहीं पथिं मला दिसलें तपेलें,
भारी प्रचंड बघतां द्दिशतां न पेले;
होते घडीत बसले शत लोक आंत,
बाहेरुनीहि तितुके; न च मिथ्य यांत ! ' ४
' भांड प्रचंड असलें घडलें कशातें,
याचा गड्या ! न करवें मुळिं तर्क मातें; '
' तुंबी महोदर तुझा शिजवावयाला, '
देई दुजा हंसुनि अद्भुत उत्तराला ! ५

* * * *

५. शांत.

' लावोनियां कर सदा फुटक्या कपाळीं,
आभाळ तीक्ष्ण नयनीं तुसतें न्यहाळीं;

संकोचिताक्ष अथवा बसुनी सदैव–
नेत्रें त्रिकाल मिटुनी निरखी स्वदैव ! १

' ओंठ्या कपालपटलीं दिड दीड बोट–
घालोनि दाबित बसे अपुलेचि ओठ !
काढोनियां मळकुव्या गुटिका करीत–
नासापुरीष अथवा बसतो वळीत ! २

' चोळीत हात हनु कीं भ्रुकुटीप्रदेश,
चावीत अग्र मिशिचे उपटीत केश;
वाटे विचार अपुल्या करि डोंबल्याचा,
मेला सदोदित असा न दुजा कशाचा ! ३

' पोटा न अन्न पुरतें कपडा न अंगीं,
हा नित्य दंग अपुल्या कवितातरंगीं;
जीवंत हा असुनिही गमतें निमाला,
वाटे न लाज कशि कीं मुळिंही मनाला ! ४

' संसारिं लक्ष लव ना करवें न धंदा,
कोणी कसेंहि कितिही कधिंही निखंदा;
सोसूं विपत्ति तरि मी किति कोठवेरी,
मागील वैर जणुं घे उगवोनि वैरी ! ५

' लोंदा सदोदित पडे अयता मुखांत,
खाई निवांत बसुनी मुखिं गीत गात;
ना येस पार अपुल्या क्षुधितां मुलांची,
आक्रंदती परि न घे कधिं दाद त्यांची ! ' ६

हृन्मर्मभेदक असे विषवाक्प्रहार,
ती झांलिपी पतिवरी करि दुर्निवार;
सॉक्रेटिसें सकलही परि तें सहावें,
होतां विशेष तुसतें सहजीं हंसावें ! ७

एके दिनीं कडकडाट असा करून,
भाजी पतीस सहसा बहु जों वदून–
तो लागला पति हंसूं बसल्याच जागीं,
कोपा चढे, चरफडे बहु ती बजागी ! ८

पाणी घडा भरुनियां तंइ आणुनी ती,
शीर्षी सकोप पतिचे विहसोनि ओती,
आंघोळ कर्दमजळीं घडतां अशी ते,
शांतांत दांत मुनि तो वदला तियेतें.  ९.
त्वां गाइल्यावरि असे घननादसूक्त—
व्हावें असें सदाभिसिंचन हेंचि युक्त;
ही वाक् प्रशांत मधुरा रुचिरा विनोदी,
अद्यापि मग्न करिते स्मरतां प्रमोदीं !  १०.

---

## १०. नवें जुनें वर्ष.

( शके १८३६ व १८३७ )

### दिंडी.

विगत वर्षा ! तव यशोगान गाया । करुनि पूजाऽऽरति तुज निरोप द्याया,
नूतनाब्दा तव भाट होउनीयां । उदयगीतीं तुज तेविं आळवाया.  १
मित्र माझा सोत्कंठ वदुनि मातें । कथीं प्रेमें नव काव्य रचायातें,
काव्य म्हणजे का त्यास गमे चित्तीं । भाजि अपुल्या मागील दारची ती !२
काव्य म्हणजे कचदाम कामिनीची । माल्यमाला मंदारमाधवींची,
काय अथवा तें तूप साखरेचें । सुबक बांधिव लाडूच करायाचे !  ३
काव्य म्हणजे का पात्र सुवर्णाचें । घडायाचें कीं वसन विणायाचें ?
छनन निघतो जो नाद रुपायाचा । काव्यसंग्रह का तोच होय त्याचा ?  ४
काव्य म्हणजे का शब्दमंत्रजाल । काव्य गाण्याची काय गोड चाल,
काव्य नर्तन का विश्वयोषितांचें । द्रव्य दिसतांक्षणिं सुरू व्हावयाचें ?  ५
विकारांच्या मंथानदंडकास । त्रिगुण रज्जूचा घालुनियां फांस,
हृदयसिंधू मंथोनि काढितांच । शब्दमुक्ता येतात वरी साच.  ६
क्वचित्कालीं मोतीं न वरी येती । सिंधुवीची अनिवार धाव घेती,
देह रोमांचित अधर कंप पावे । नृत्य नयनांचें चालतें स्वभावें.  ७
हावभावा सोत्साह करिति हात । स्फुरे चरणांमी द्यावयास साथ,
यथाकालोद्भव दुःखहर्षणांचें । चित्र वदनावरि उठे प्रसंगांचें !  ८
सार्थ शोभे यालाच ' काव्य ' नाम । चिदानंदाचें हेंच खरें धाम,
परी जगतीं सत्या न मान कोठें । विजय नक्कल पावे; न नवल मोठें !  ९

असें वर्षांनो ! मूक काव्य नामी । हृदयिं उमटे ना काय करूं या मी,
तुम्हांविषयीं प्रेमा न मनीं जागे । तसा आदर लवलेशही न वागे ! १०
बरावाइट परिणाम जरी कांहीं । हृदयभागीं माझिया होत नाहीं,
स्फुरण कैसें हृदयांत वदा व्हावें । काव्य कैसें बाहेर तरी यावें ? ११
दिलें एकें परि दुजें हरण केलें । काय उरलें संग्रहीं ? स्वप्न झालें,
दिलें वासंतिक पुष्प मोतियाचें । परी नेलें तें पारिजातकाचें ! १२
बाळ दिधला गोपाळ परी नेला । घात अमुचा अनिवार कसा केला !
जमा जितुकी तितुकाच खर्च झाला । शिलक बाकी भोंपळा करीं आला! १३
देवदेवींची रीति विदित लोकीं । तुम्ही निजला अपवाद कोविं व्हा कीं,
रीति मान्या जरि हीच देवतांना । तुम्ही अपवादी कोविं या कळे ना ! १४
पुन्हां ऐसें केव्हां न करा कर्म । तरिच तुम्हां लाधेल मानशर्म,
प्रीति वाढे हो प्रीतिपासुनी ती । नका विसरूं सिद्धांतरूप नीति ! १५

---

## ११. मत्कुणगीता.

[ कथासूत्र—एके दिवशीं अंगरख्यांत कांहीं चावतें आहे असें वाटल्या-वरून अंगरखा काढिला तों त्यांत एक ढेंकूण सांपडला. त्याला मारणार तों त्याला वाचा फुटून तो बोलूं लागलाः— ]

पद [ चालः—अर्ध तनू वारुळीं बुडाली...... ]

व्यर्थ नरा का मला मारिसी अनीति माझे करीं,
जाहली सांग कोणती तरी ? ध्रु०
तव देहांतिल एकचि सारा रक्तबिंदु चाखिला,
राग का आला म्हणुनी तुला ?
खाउनि केली पृथ्वी सारी फस्त तुवां सोज्ज्वला,
कवणें दंडावें बा तुला ?
ही विविध वस्तुंनीं भूषित ऐसी धरा,
तारकाखचित या सुंदर नीलांबरा,
या जवन मारुता तैसें जलसागरा,
ज्यें निर्मिलें तोचि आपणां निर्मी भूमीवरी,
गोष्ट ही काय न बापा खरी ? १

' सृष्ट्युत्पादन करिते वेळीं ईशें चतुरस्रता,
दाविली केविं पहा तत्त्वतां;
नरापासुनी अणुपावेतों प्राणी कोट्यावधी,
पोषितो केविं पहा तो सुधी;
करावयातें इतुक्यांचें या जीवितसंगोपन,
नेमि तो भिन्न भिन्न जीवन;
वा खाद्य तृणाचें निर्मी पश्वादिकां,
ते विहग भक्षिती सुफलां वा कीटकां,
तो मनुज चालवी धान्याशनिं जीविका,
रुधिरप्राशन अम्हां लाविलें सत्य सत्य वैखरी;
मानसीं सूक्ष्म विचारा करीं. २
' तात्त्विक गोष्टी किंवा मनुजा सांप्रत ठेवूं दुरी,
बघूं ये व्यवहारा घडिभरी;
झाली इतुकी तनू कशानें तव ही वद जर्जरा ?
आटला रक्ताचा का झरा ?
मांस जाउनी उरला कैसा अस्थिचर्म पंजर ?
जाहलें थंड कसें अंतर ?
या जीवसृष्टिचा राजा तुज बोलती,
पातली तुला का असली हीन स्थिती ?
वा दृष्टि तुझी का अंधचि वद होइ ती ?
अनर्थ इतुके जयें घातिले संप्रति रे तुजवरी,
तयाला विसरसि कैसा तरी ? ३
' प्रेमें तूं जी पदीं मिरविसी दास्यरूपि शृंखला,
पीडिते तीच तुला अवकळा;
ज्या धनेंकोला प्रतिधर्मासम लेखिसि अपुले मनीं,
तोचि रे कारण यालागुनी;
व्याजमिषानें जळवा त्यानें लावुनि पाहीं तुला,
सर्व हा रुधिरकोश शोषिला;

१. कर्ज देणारा. [ शेतकरी व सावकार यांमधील संबंध ज्यांनीं अनुभवलेला असेल त्यांना ही गीता यथार्थ वाटेल.]

सोडिली करुनियां भूमि तुझी कोरडी,
दावितो बहुपरी भरभर वरि बेगडी,
ती असे सर्वथा नकली, परि, रोकडी,
घरकामध्यें तुला घालुनी पिळितो इक्षूपरी,
वाटते मौज तुला अंतरीं ! ४
' त्याच्या माझ्या कृतींमधें जें अंतर परि थोडकें,
सांगतों तुजला तें मी निकें;
मधुरभाषणी धनी तुझा हा भुरट्या चोरापरी,
घालितो घाला तुझियावरी;
राजरोस मी पितों शोणितां जागृत करुनी तुला,
तयाचा दोष न यावा मला !
करिं विचार याचा शांत मनानें जरा,
सोडुनी तयातें वधसी मज पामरा,
तूं शूर नसोनी भेकड दिससी खरा,
मत्कुणवच हे खड्गासम कीं भिनलें माझे उरीं,
गुरु मी वेगें त्यातें करीं ! ५

---

# तरंग ७ वा.

—*—

## १. पत्रिकेस उत्तर.

[ सुप्रसिद्ध कवयित्री लक्ष्मीबाई टिळक यांनीं इ. स. १९०७ मध्यें अक्कलकोटीं भरलेल्या प्रथम कविसंमेलनास पाठविलेल्या काव्यपत्रिकेस उत्तर. ]

पद [ चाल:—चंद्रकांत राजाची........ ]

प्रेमभरें त्वां प्रेमललिखिता पतिकरिं धाडियलें,
विमल मनें तें वाचुनि बघतां हर्षित मन झालें. ध्रु०
परिचय नव्हता बाह्यात्कारीं नसो भगिनि अपुला,
अंतर्यामीं पटेल ओळख, देतों खूण तुला;
आदरातिपूर्वक ज्या देवीला सेविसि तूं साची,
प्रेमानंदें करीं भक्ति मी त्याच शारदेची;
पत्रांतरिं तूं स्वतांस म्हटलें दीन भिकारीण,
कारण याचें नुमजे मजला होतें मन खिन्न.
कवितादेवीभाललग्नशा तिलकासम जगतीं,
शोभे तव पति कवि नारायण धवलरुचिरकीर्ती;
काय कमी गे भगिनि तुला तूं असोनि कवयित्री,
वर्णालंकृत कविता तव मज भासे सुखदात्री;
राजा जैसा भर्ता तव गे असशी तूं राणी,
शांत मनानें करीं विचारा सत्य न का वाणी ?
सुंदर पुष्पित लताकुंज हे अपुले प्रासाद,
उदात्त तैसे विचार खासे हेच उंच सौध:
तारान्वित हे नीलांबर गे छत या सदनाचें,
सूर्यचंद्र नव दीप उजळले वारिति तम साचें;
जाई बकुली मधुर मालती सखिजन हा भासे,
गुलाब चंदन चंपक तरु हे सेवक तव तैसे;
कोकिल भुंगे मयूर रावे स्तुतिपाठक जाण,
भूजलकमलें वन्यसुमें हीं अलंकार मान;

श्वेतांबुद जो विलसे गगनीं रथ तो तव गमतो,
पवन जवन हा वारु तसा गे त्रैलोकीं पळतो;
उज्ज्वलकाव्यप्रतिभा शालू हा तूं कटिं कससी,
भव्य कल्पना हीच कंचुकी अंगीं तूं लेसी;
वैभव तव हें विशाल ऐसें पाहुनि नृप-रमणी,
करितिल हेवा सदा तुझ्या त्या होउनि खिन्न मनीं;
सर्वांचि तुजला गोष्ट सांगतों देईं अवधान,
देवी लक्ष्मी सरस्वतीची कट्टी वैरीण;
मोद बंधु हा अपुला तैसा शांति बहिण विमले,
काय कमी गे जगीं आपणां दुःखें जरि भरलें, १

---

## २. इंदिरेचें आगमन !

[ ले. कर्नल. के आर. कीर्तिकर यांनीं आपलें ' इंदिरा काव्य ' प्रेमाची भेट म्हणून तारिख २४।३।०७ रोजीं पाठविलें, त्यास उद्देशून खालील कविता लिहिली आहे. ]

श्लोक. [ वृत्त पृथ्वी. ]

अलंकृतिविभूषिते ! सुरसभावनीं पंडिते !
अये गुणगणाश्रिते ! प्रथितरम्यवृत्तास्थिते !
सुरीतिनयमंडिते ! रसाधिकन्यके इंदिरे !
प्रमोदविशि तूं बये ! ममनोंबुजा चंदिरे ! १
पुरा निरखिलें तुला सहज आंग्लवेशांतरीं,
तशी बघत आज मी रुचिर आर्यवेशीं परी,
खुले तुजसि गे गडे ! मज तसाच हा वाटतें,
निसर्ग-मधुरां जनां खचित सर्व ही शोभतें. २
विरूप परि वेश हा तव पित्या गमे वाटतो,
म्हणोनि परिधानितो सतत आंग्लवेशास तो,

---

१ सदरहु कविता देवी लक्ष्मीकडे व इंदिराकाव्याकडे सारखीच लागूं पडते.
२ पूर्वी. ३ जातीच्या सुंदरांना.

अशी स्थिति असूनही तुज दिला तये कां गडे,
अजागळ कु-वेश हा मजतरी कथीं रोकडें. ३
त्वदीय जनकें जरी तुज दिला सु-शृंगार हा,
तुझ्यांत दिसती परी अजुन पूर्वरीती अहा !
अपूर्व अशि मिश्रता नच तुला जरी दूषि ती,
स्वभाव परि मूळचा कधिं न पालटे या क्षितीं. ४
असो-जनन मूळचें प्रभु-कुलीं तुझें इंदिरे !
तसेंच तुज आणुनी भरतभूत रम्यांबरें !
प्रमोदयुतमानसें सखि ! जयें सुसंवाधिलें,
धनाढ्य तव तात तो रसिक ही असे मंगले ! ५
तदीय सुख-मंदिरा त्यजुन तूं सु-दीनाश्रमा,
बये ! समुद्र सोसुनी बहुतशा कु-मार्गश्रमा,
मदर्थ सखि ! येशि तूं परि गडे ! इथं राहणें,
रुचेल तुज केविं गे ! नच कळे विलोलेक्षणे ! ६
तिथें तुजसि लोळण्या विमल रम्य काष्ठासन,
मिळेल इथ भूमि वा कधिं मिळेल चित्तासन,
तिथें तुज मिळे सदा मधुरसें गडे भोजन,
उपोषण कधीं इथें, कधिं मदीय मोदाशन. ७
तिथें तुज फिरावया कुसुम-वाटिका लाविली,
इथें प्रभुविनिर्मिता सुरुचिराटवी गे ! भली,
दुकूलवसनें तिथें सु-कवि-दारिके गे तुला,
मदीयनयनांशुकें परि इथें न ज्यातें तुला. ८
सतार तबला अशीं वहुत रम्य वाद्यें तिथें,
रिघोनि वन-कुहरीं पवनवाद्य वाजे इथें
सुगायक तिथें किती करिति गान गंधर्वसें,
इथें भ्रमर बालिके ! मधुरसें सदा गातसे. ९
असो-परि असा तुझा जनक आणि गे एक मी,
निसर्गवनमंदिरीं मुळिं न जाण सौख्या कमी,

---

४ इंदिरा काव्य ज्याची अनुकृति आहे त्या इंग्लिशकाव्याला 'प्रिंसेस' असें नांव आहे म्हणून इंदिरेला 'प्रभुदुहिता' (राजकन्या) असें म्हटलें आहे.

सुखें तरि रहा इथें स्थिरमनें न हो श्री परी.
त्वदीय अभिधानिं या हृदय भीति माझें वरी. १०
सदा म्हणुनि मी तुला हृदयपार्श्विं या ठेवितों,
सवेंचि कवितासुमा तव शिरीं मुदें अर्पितों,
प्रसन्न मज हो गडे ! तुजसि मी न दे अंतर,
पिसें करिसि इंदिरे ! खचित तूं मदीयांतर. ११
" असे कुशल इंदिरा मममनोगृहस्वामिनी, "
त्वदीय जनका असें, कळवितों तरी धाडुनी,
मदीय कवितावधू, क्षणिं न लावितां मी क्षण,
करो कवि पिता तुझा, इजवरी कृपा-वीक्षण. १२

---

## ३. ध्वजारोपण !

श्लोक. [ वृत्त. शार्दूलविक्रीडित. ]

[ पितापुत्रसंवाद. ]

पुत्रः—

बाबा, ही अपुली ध्वजा उभविली, केला कुलाचार कीं,
लोकाचार म्हणा प्रशस्त अथवा जो रूढ या लौकिकीं;
श्रद्धापूर्वक चाल आजवरि ही सोत्साह हो पाळिली,
एकाकीं परि आजला मजपुढें शंका उभी राहिली. १
आम्ही वाचितसूं सदैव परिसूं श्रीरामकृष्णध्वजा,
होती नाचत सर्व देशभरही भंडावुनी दिग्गजा;
नाहीं ज्ञात कुणा कपिध्वज महा तो अर्जुनाचा तसा,
वाटे आजहि भाविकांस अगदीं हो मोक्षदायी असा. २
जीनें कांपविले सुरासुरमुनी ती मन्मथाची ध्वजा,
अद्यापी करिते भयार्त सुजनां ही काय नोहे मजा !
विष्णूची गरुडध्वजा प्रतिमनीं राहे उभी कीं स्वतां,
लागेना उभवावया तिज कुणी दे शांति उच्चारितां ! ३
झेंडा तो भगवा तसाच पटका या दोन राष्ट्रध्वजा,
ज्यांहीं दाखविलें रणांत रिपुशीं ही ग्याड नोहे प्रजा;

त्यांचा तो ध्वनि आजही फडफडे कर्णीं असें वाटतें,
होतें स्वांतर हें प्रफुल्ल किति हो. प्रेमें जणूं दाटतें ! ४
वाजे ही अमुची ध्वजा न कधिंही, हाले न डोले कदा,
नाचे ही न तशी चुकून सहसा वाटे न उत्साहदा;
प्रत्यब्दीं तिज निर्विकार हृदयें श्रृंगारुनी प्रेतशीं,
द्वारीं बांधुं जशी प्रभातसमयीं काढूं प्रदोषीं तशी ! ५
वस्त्रें वाळवि वंश तो अपकरा पाटींत भांड्यांचिया–
बैसे जाउनि, बासनांत खण वा पेटींत वस्त्रांचिया;
बाबा, ही असली ध्वजा चढवुनी सांगा तरी कोणता,
आहे लाभ अम्हां मला न कळतें हानी दिसे सर्वथा ! ६

पिताः—

जिज्ञासा बघुनी तुझी प्रखर ही तैशी अशी जागृता,
केला सम्यक तूं समर्पक तसा तो प्रश्न मी ऐकतां,
झाली हर्षभरें तनू पुलकिता संतोष झाला मला,
देतों उत्तर मी यथामति अतां साधार बाळा, तुला. ७
बाळा, काय गमे तुला विलसतें चैतन्य वंशांत या ?
यावें सांग कुठोनि तें तरि तुझ्या क्षुद्र ध्वजेला तया ?
चाले वस्तु जरी अचेतन तरी केवीं तुला मानवे,
व्हाया काय नको सहाय तिजला चालावया मानवें ? ८
नाचे ना जरि आमुचा ध्वज गड्या, हा दोष आम्हांकडे,
देवाचे असतांहि वंशज अम्ही झालों जणूं माकडें;
देशप्रीति न ठाउकी कशि असे द्वेष जळूं अंतरीं,
अंगीं शक्ति न शौर्य रेसभरही दूषूं परांना परी ! ९
दीनांच्या अनुकंपनें द्रवुनियां रामध्वजा नाचली,
दुष्टां शासित सर्व देशभर ती मागें पुढें धांवली,
केल्या श्रीहरिच्या ध्वजेंहि सुकृती रामध्वजेसारख्या,
दुर्दैवें अमुच्या ध्वजा परि अशा झाल्या यशा पारख्या ! १०
होता श्रीशिव राजकार्यकुशली धर्माभिमानी तसा,
निष्ठावंत तसाच ईशचरणीं कीं शूरही पार्थसा;
होता स्वार्थि जरी तया न शिवला खोटा कधीं स्वार्थ रे,
त्याची ती स्मरतां ध्वजा अजुनही उत्साह चित्तीं स्फुरे. ११

आम्ही स्वार्थि असूं परंतु अमुचा हा स्वार्थ खोटा असे,
हेवा मत्सर हीच योग्य मजला नामावली त्या दिसे;
लाधावें सुख आपणां बहुपरीं इच्छा न ही दुष्ट कीं,
अन्यातें बघतां सुखांत दुखणें पोटांत हें घातकी ! १२

'नाहीं हा अनुकूल काल अपणां शौर्यादि दावावया,'
कोणी बोलुनि पाहतात अपुल्या दोषांस झांकावया;
मोहें हें परि सत्य पथ्य हितही, ते आपणां वंचिती,
होती आपण आपुलेच रिपु, ते दुःखामधें डुंबती. १३

'शत्रूंचे रणिं कंठनाळ चिरणें' हा मात्र कीं विक्रम,
वाटे ज्यांस असेंचि त्यां न कळते, संमोहवी संभ्रम;
शौर्याचे विविध प्रकार असती, ना एक कीं केवळ,
'नाहीं' शब्द वदावयासहि पहा लागे मनाचें बळ ! १४

'दैवें शांति भली अम्हां गवसली आतां हमामा नको;
पूर्वींचा हुतुतू नकोचि अथवा पेंढारशाई नको;
लाधे सौख्य अमोघ आज भुवनीं कोठें न कांहीं कमी,
नांदे मोद जिथें तिथें विपुल तो आम्ही नसूं कीं श्रमी ! १५

ऐसीं भ्रामक बोलणीं वदुनियां दावी कुणी शांतता,
कोणी शीतल साउली सुखमयी कीं आत्मसंतुष्टता !
नाहीं ही परि पुष्टि तुष्टि अथवा ही सूज रोगाश्रित,
शांती ही न तशी, विषार चढला मारील तो निश्चित ! १६

बाळा आज तयां सुरेख पिंवळी जी अंगकांती दिसे,
खोटी ती नकली कळेल पुढती कावीळ बा ती असे !
अंगीं लोचनलोभनीय दिसते कीं जी तया गौरता,
हा ! हा ! ती क्षयकारिणी परि असे बा, दुर्धर पांडुता ! १७

'नाचावी अपुली ध्वजा सतत ही' ऐसा जरी हेतुशी,
चित्तीं वागविशी तरी परिस जें मी सांगतों हें तुशीं;
'कर्तव्यीं रति वाढवी विपुलशी छेदोनियां आळसा,
देशाचा अभिमान तूं धरिं परी वागे न उन्मत्तसा ! १८

'नाचावी अपुली ध्वजा चहुंकडे ऐसी जरी कामना,
प्रेमें ध्याइं सदा सदाश्रितपदा सोडूनि दुर्वासना;
प्रेमानें निजदेशबंधुसह तूं बा, आदरें वागुनी,
व्हावें त्यास सहाय कीं शुचिमनें आज्ञापरी मानुनी. १९

'नाचावी अपुली ध्वजा चहुंकडे' वाटे जरी अंतरीं,
स्वामीसद्गुरुरामदासवचनीं विश्वास निष्ठा धरीं;
आस्थापूर्वक लोकसंग्रह करीं, दूरी न सारीं तया,
नेमें त्या शिकवी स्वयें शिकुनियां शिक्षा समर्थांचिया. २०

## ४. मायाब्रह्मानंद.[1]

### अभंग.

मायेचा आनंद तोचि ब्रह्मानंद। सेवावा स्वच्छंद सावधान. १
माया आणि ब्रह्म ब्रह्म आणि माया। चाले वाद वाया पूर्वापार. २
ब्रह्म तेंचि सत्य माया ते असत्य। परी पथ्य तथ्य गमेना हें. ३
माया आणि ब्रह्म अन्योन्य निःसीम। वैरी, परी भ्रम वाटे मातें. ४
मायेशीं ब्रह्माचें ब्रह्माशीं मायेचें। भार्याभ्रतारांचें नातें असें. ५
पतिपत्नीसंगीं ब्रह्मानंदबीज। नांदतें निर्व्याज अनुभवीं. ६
पत्नीप्रेमसंगीं रमावें सर्वांगीं। परी बा निःसंगी असोनियां. ७
हळूहळू तीज आपुलें करावें। प्रेमें रंगवावें निजरंगीं! ८
खऱ्या एकत्वाची भावना पहाया। स्थान पतिजाया हेंचि एक. ९
अग्नि,-अग्निदीप्ती, वायु,-वायुगति। काय भांडताती अन्योन्यांशीं? १०
काम्य कौमुदी ती चारु चंद्रासंगें। घटस्फोट मागे काय कधीं? ११
काय अग्नि सत्य दीप्ति ती असत्य?। असत्यचि सत्य झालें येथें. १२
ब्रह्म तेंचि माया माया तेचि ब्रह्म। व्यर्थ मूढें भ्रम माजवीला! १३
हेंचि व्यवहार शिकवी साचार। न मी निराधार बरळें हें. १४
जें का पतिसुख तेंचि पत्नीचेंही। पत्नी दुःख साही पतीसंगें. १५
करोनी विलाम बोलतों मी याचा। सेवावा सुखाचा भावार्थ जो. १६
पत्नीचा आनंद ज्यांत तो भ्रतारें। कां न मानावा रे सांग मातें. १७
म्हणोनी पुनः मी सांगे तुजप्रती। घेईं बा प्रतीति याची कांहीं. १८
'मायेचा आनंद तोचि ब्रह्मानंद। सेवावा स्वच्छंद सावधान.' १९

---

१ मायापाशांत गुंतलेला जीव ब्रह्मानंदांत निमग्न कसा होतो या किंवा अशा आशयाची एक शंका लेखकाचे मित्र कवि 'गिरीश' यांनीं आपल्या एका पत्रांत घेतली होती. तिचे निरसनार्थ वरील अभंग लिहिला आहे.

## ५. मकर संक्रमणाचा तिळगूळ.

श्लोक. [ शार्दूलविक्रीडित. ]

हा घ्या-

सर्वश्रेष्ठ म्हणून ज्यास म्हणती भूदेव कीं ब्राह्मण,
होते आजवरी सदा करित जे अध्यात्मसंशोधन;
जे शापादपि कीं शरादपि तसे स्वातंत्र्यवादी महा,
ज्यांना राष्ट्रहिताविना न शिवली केव्हांहि अन्यस्पृहा. १
शापोच्चारणिं शक्ति त्या न शरही येती न सोडावया,
अंगीं शक्ति परी नवीन भरली दास्यांत राबावया;
वेदोद्धावयित्या रवींहि पथ तो संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. २
होते आजवरी सदा निरत जे गोविप्रसंरक्षणीं,
दुष्टां दंडुनि भूमिभारहरणीं जे थोर शूराग्रणी;
देतां दान जयां कदा न शिवलें कार्पण्य अत्यल्पही,
मिथ्या भाषण ठाउकें न कधिं ज्यां स्वप्नांत निद्रेंतही. ३
ऐसे भारतभूमिपाल म्हणुनी सर्वत्र जे गाजले,
प्रेमें; क्षत्रिय तेच आज दिसती सेवासुखीं रंगले;
ऐशा संगरसूर्यें आजि पथ तो संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. ४
केली ज्यांहिं सदा समोद कृषि कीं गोरक्ष्य वाणिज्य कीं,
कर्मे तीं न तयांस आज रुचती ते दंग सेवासुखीं;
व्यापारोद्यमसूर्यें त्या पथ असा संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. ५
सेवातत्पर हीनकर्मकुशली अज्ञानमोहाकुलां,
शूद्रां त्या न रुचे स्वकर्म, रत ते ज्ञानार्जनीं आजला,
त्यांहीं पूर्वपरंपरोक्त पथ तो संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. ६
ऐसे धर्मसमाजराष्ट्रघटनाचातुर्यचिंतामणी,
होते जे निजराष्ट्रभूस जणुं कीं पृथ्वीस जेवीं फणी,
त्यांहीं पूर्विल मार्ग सर्वपरि तो संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. ७

-नाहीं तर-हा घ्या.

बोटें दावुनि अन्यदेशजनता ज्या भारतीयांकडे,
होती निंदित कोंबडे म्हणुनियां कीं उंबरांचे किडे;
आर्यांच्या तनयीं तयां स्वपथ तो संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. १

भाषा यावन बोलले न कधिं जे जातां लया देह ही,
होते मानित जे स्वकीय सदना निःशंक सर्वा मही;
जे का उज्ज्वल धर्मनिष्ठ म्हणुनी मानें सदा गर्जले,
ज्यांनीं स्वेतर लोक, धूर्त म्हणती, निर्भर्त्सिले तर्जिले; २

आतां धाडिति तेच विप्र तनुजां ज्ञानार्थ देशांतरां,
वेदज्ञान तसें सुखें वितरिती शूद्रादि हीनां नरां;
त्यांहीं आज असा स्वकीय पथ तो संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. ३

सद्धर्मांतरिता स्वकीय जनता जी हिंदवी व्हावया,
इच्छी प्रेमभरें, दिली तिज पुन्हां आज्ञा घरीं यावया;
ऐसा आर्यि परंपरोक्त पथ तो संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. ४

दाणे खाउनि कोंबड्यापरि सदा जे सारखे झुंजले-
म्लेंच्छार्यां; कळतां प्रमाद परि त्या सज्ञान ते जाहले;
दोघांनीं पथ तो असा शुभदिनीं संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. ५

होते विश्रुत पक्ष दोन भरतीं अस्मद्धुरीणांत कीं,
नामें राष्ट्रिय कीं मवाळ अथवा नेमस्त जाहाल कीं;
त्यांहीं तो कलिमार्ग या शुभदिनीं संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. ६

निद्रालस्य, विमोह, सौख्य, कलहा जे आर्य लांचावले-
होते, ते चमकोनि आज गमतें जागे मला जाहले;
ईशानुग्रह कीं, तयीं स्वपथ तो संक्रांत केला असे,
घ्या हो हा तिळगूळ गोड म्हणुनी बोला मुखें गोडसें. ७

---

## ६. लोकमान्यांस भूमातेचा निरोप.

पद्य [ चाल.—जरी कुणा श्रीमंताची....... ]

जरठ जन्मभूमी तव ही आजि बालराया,
उभी पाहिं ढाळित अश्रू तुज निरोप द्याया. ध्रु०
असह्य दुष्ट दुर्भिक्षानें सतत गांजिलेली,
विविध दुःखभारें तैसी सदा व्यापिलेली,
काय पुढें चिंतनें या पुरी ग्रासलेली,
स्नेहभरें आली तरि ही तुला विलोकाया. १
एकवार मस्तक तव तें मला हुंगुं दे रे,
तनूवरी प्रेमाचा हा हात फिरवुं दे रे,
उचलुनियां हृदयाशीं या तुला घेउं दे रे,
नयनजलीं न्हाणूं दे कीं तुझी दिव्य काया. २
जाशि दूर देशा ऐशा जिथें आप्त नाहीं,
शत्रुपती परि वा बघती तुला सर्वदाही.
तुजसि हवें सांगाया हें स्थिति न अशी कांहीं,
जीव परी वेडा कैसा राहि तळमळाया ? ३
कृष्णगूढवाणी-गीतामर्म बोधियेलें,
किरण दिव्य आशेचे या हृदीं पाडियेले,
विकल हृदय बोलायासी शक्तिमंत झालें,
रामचरित तेजोदायी तुला निवेदाया. ४
राम, कृष्ण, शिवबा, बाजी चतुर शूर वीर,
जया कुशींतूनी जन्मा पावले सुधीर,
ती न कूस वंध्या झाली प्रसवि कीं न कीर,
मानवती मद्वाणी ही सार्थ तूं कराया. ५
पुत्र एक गंगेलागीं जेविं भीष्मराय,
अंजनीस किंवा तैसा जेविं आंजनेय,
रेणुकेस[1] किंवा तैसा जेविं रैणुकेय[2],
जिजाईस शिव तूं तैसा मला ‘ मम ’ म्हणाया ! ६

---

१ श्रीपरशुरामाची आई. २. श्रीपरशुराम.

'दास्यमुक्त व्हावें मी' हा हेतु बा धरोनी,
आंग्ल देशिं गेले जे जे पुत्र पूर्व कोणी,
सुगम मार्ग ठेवीयेला करुनि कीं तयांनीं,
सार्थ सिद्धि सहजासहजीं साध्य तुला व्हाया. ७
वंदिलेंसि ठेवोनीयां पदीं स्वीय माया,
प्रदक्षिणाहि घातीयेली भावभाग्यवंता,
कडेवरी घेवोनीयां पोंचवीं अनंता!
'यशोलाभ' होवो तूतें' आशि देउनीयां. ८
करी चूर्ण पाषाणाचें जिची दुग्धधारा,
कीर्तिमान मातेचा त्या पुत्र तूं कुमारा,
चहूंकडे तव नामाचा गर्जतो नगारा,
हिनपणा येणें त्यातें करिं न तुझ्या आर्या! ९

---

पद [ चाल.—ब्रिजलाला रे कांहीं...... ]

मात घननीळा रे कांहीं करिं तूं मात,
सेतु विरचिला, सागर तरला, सीता तरि न घरांत.
कपि कपि गेले रडले कढल, नयनांबुजलीं रिपुपद
धुतले, गात रमेचा कांत! मात० १
व्यर्थ सकलही उपाय झाले, गेले तैसे परतुनि
आले, आले हलवित हात! मात० २
मुखें करावी लटपटपची, कळतां बळता जो तो
वंची, शक्ति न मणिबंधांत! मात० ३

---

पद [ चाल.—नाचत ना गगनांत...... ]

सीतेचा अपहार! बाळा! वाटे नच साचार. ध्रु०
आर्यसूकीर्तिप्रगतीवरती पसरविला अंगार, बाळा. १
विचार नैतिक बौद्धिक दैविक याहुनि थोर विकार, बाळा.२
संस्कृतिहृदयीं असंस्कृती ती खुपशी खोल कट्यार, बाळा.३
अदृश्य ब्रह्मावर जी मिरवी माया बघ बाडिवार, बाळा. ४

---

पद [ चाल--माझ्यासाठीं तीनें ..... ]

दुर्जनांचे संगें शिष्टाई फळाला, आली काय बाळा सांग कधीं ? १
रावणासंगतीं शिष्टाई कराया. प्रेषी रामराया अंगदासी. २
दुर्योधनासंगें शिष्टाईकारणा, द्वारकेचा राणा स्वयें गेला. ३
औरंगजेबासी शिष्टाईकारणा, महाराष्ट्रराणा गेला स्वयें. ४
निजामासंगतीं किति शिष्टाई त्या, सांग झाल्या होत्या पेशव्यांच्या ? ५
तुर्क फराशीस, रूस कीं शर्मण्य, यांनींही अन्योन्य शिष्टाई त्या. ६
पाहीं इतिहासीं. कितीकदां केल्या, कितीदां मोडील्या गुर्मीइनें ? ७
शिष्टाई-खलीते, कागदी-कपटें, घालिती कपटें पायातळीं ! ८
करोनी चिंधोऱ्या झोंकिती अंबरीं, जणूं वाऱ्यावरी कबूतरें. ९
ठेवीं परि ध्यानीं, असा न इंग्रेज, शिष्टाईचे चोज करील तो ! १०

---

पद [ चाल—निरोप द्यावा बाळा आतां....... ]

खुशाल जाई सखया आतां सोडुनि मागिल चिंता. ध्रु०
मार्ग सुखाचा होवो तूतें नलगे दुसरें कांहीं,
फेडशील तूं वृद्धेचे या पांग भरंवसा पाहीं. १
उदारहृदया सागरराया जपून नेई बाळ,
नको द्यावया अगस्तिचा तुज आठव तव जो काळ. २
नउनवसाचा बाळ लाडका जलदेवींनो माझा,
ओटींमध्यें घालीं तुमच्या जीवाचा या राजा. ३
सुखद समीरा स्वाधीन तुझ्या केला आहे बाळ,
फुलांत घालुनि दे आणोनी भीम तुझा संभाळ. ४
जा जा बाळा नको पाहुं बा मागें मुरमुरडोनी,
निरोप देतें निरुपायानें जीव मुठींत धरोनी. ५
डोळे वाटेकडे पांखरा तुझिया मी लावून,
बसेन अंधेरांत लोचनीं सखया प्राण धरून. ६
ध्रुव प्रदेशीं षण्मासांची असे ऐकिली रात,
षडब्धे पडली येथें असतां तूं त्या वनवासांत ! ७

---

१ लो. मा. संडलेस सहा वर्षांची शिक्षा भोगित असतां इ. स. १९०७ ते १९१३ पर्यंतच्या काळांत महाराष्ट्र किंबहुना सबंध भारत अंधेरांत सांपडल्या प्रमाणें अगदीं निश्चेष्ट पडला होता; त्या प्रसंगाचें दिग्दर्शन या ओळींत केलें आहे.

## ७. विकल्पपरिहार.

अभंग.

काय तुज ऐसें सांग वाटावें तें, काय मन खातें तुझें तुज ? १
चोराचे मनांत चांदणें दिसावें, तत्त्व हें न ठावें काय लोकां ? २
त्याच न्यायें तुझें रहाटावें चित्त, पाहतां विस्मित झालों चित्तीं. ३
काय हिरकानें काच बा गिघावें, पंडितें दावावें मूढत्व का ? ४
झालें ज्याचें मन विलीन उन्मन, दिसावें मलिन काय बापा ? ५
काय कविमनें मन सामान्याचें, क्षुद्र दांभिकाचें व्हावें लोकीं ? ६
भाटीचे का दांत पिलां दुखवीती, पद्में का सुकती सूर्यकरीं ? ७
राग नाम प्रेम हाचि माझा अर्थ, अन्य ना पदार्थ ठावें मज. ८
जोंवरी मन्मन असें माझेंच तें, तोंवरी तयातें बाधा कैंची ? ९
माझ्या कर्तव्यांत भंग नाहीं जरी, स्वानंदशिखरीं विराजें मी. १०
कर्तव्याची शांती जोंवरी अंतरीं, कोणाची उजरी सांग मातें ? ११
म्हणोनी कितीही मज विंधिलेंसी, कुशब्दें तयासी नेघें चित्तीं. १२
मानोनी तयातें रम्य पुष्पदाम, देईन त्या धाम शिरावरी. १३

---

## ८. पांढऱ्यावर काळें.

[ विषयसूत्र—एके दिवशीं सायंकाळीं, मुंबईस चौपाटीवर कांहीं कवि मित्रांसह समुद्रशोभा पहात बसलों असतां एका सत्कवि मित्रानें ' तुम्हीं पांढऱ्यावर काळें खूपच करतां म्हणायचें ' असे कुत्सित शब्द वापरले. त्यास प्रस्तुत उत्तर आहे. ]

पद [ चाल—-अर्ध तनू वारुळीं....... ]

मोडित डोळे उण्या दुण्या या शब्दीं मज का असा ?
हिणविसी सांग सख्या राजसा ! ध्रु०
कळति न का हे लपेटिचे तव बोल मला तुज गमे.
वृथा परि भुलसी या संभ्रमें.
बा, मर्म तयांतिल कळलें मज चांगलें,
परि शंभुपरी मी वाग्विष तव पचविलें,
चंदना अहीचें विष का कधिं झोंबलें ?
आत्मविकत्थन यांत खरोखर नाहीं कविसारसा.
सेविं हें घेतों अलि रस जसा. १

गमो पांढऱ्यावरती काळें माझें लेखन तुला,
परी तें सुवर्णभूषण मला;
ज्याचें त्याला न्याय भला हा रूढ असे लौकिकीं,
तया अपवाद कसा मीच कीं ?
जो दयार्द्र निःस्पृह गुणज्ञ रसिकोत्तम,
बा, असा परीक्षक दुजा न कालासम,
हें कार्य कराया स्वार्थी नर न क्षम,
अनंत कवितुनि दहा पांच कीं कालाच्या या कसा—
उतरले, इतिहास न का असा ? २
शास्त्रें काव्यें पढसी पढविसि करिसी पारायणें,
परी तें व्यर्थ मुखा शिणविणें.
दिसे न गंधहि संस्काराचा तुझिया चित्ताप्रती,
हीच का काव्याची संस्कृती ?
सहवासें सुमाचे सुगंध धरि मृत्तिका,
सहवासें जनांचे बोलति शुकसारिका,
सहवासें जलाचे दगडहि झिजती न का ?
काव्यसुधा तूं रात्रं पाजिसी परी कोरडा असा—
कसा तूं पूस आत्ममानसा. ३

---

## ९. पुण्यपुरीचा—

## शिष्टमंडळास निरोप !

पद [ चाल.—उद्धवा शांतवन....... ]

हा निरोप द्याया सजतां, जायातें परदेशाला; ध्रु०
काहूर दाटुनी भारी, हृदयाचा भडका झाला;
तें सर्व गिळाया केलें, यश न परी येई मजला;
सद्विचारकुविचारांनीं, झगडा सुरु एकाचि केला;
मन विकारवश हें झालें,
शांतीचें बंधन तुटलें,
हृत्सर त्यायोगें फुटलें,
बांध कोण घाली त्याला ? १
मोटली वदा वाऱ्याची, शक्त कोण बांधायाला ?
गगनास गवसणी तैसी, शक्त कोण घालायाला ?
जलराज सागरा तैसें, शक्त कोण झांकायाला ?

कमलाचा कोमल तंतू,
वारणा न वारि, परंतू–
शमवि तोचि बंभर–मंतू,
दाखला मला हा आला ! २

इतिहास भूतकालाचा, भूतापरि ठाकुनि पुढतीं;
दे हांक वर्तमानाला, पळ खुंटवि त्याची प्रगती;
भाविकाल काळाकुट्ट, भिववी मज भीषणकांती;
हर्ष–शोक–ऊर्मी यांचा,
खळखळाट आवेगाचा,
उसळुनी जोरजोराचा,
आश्चर्यें स्तंभित केला ! ३

शाइस्त्यावरती गेला, येथुनीच शिवभूपाल;
आजिही छत्रसालाची, राखण्या बाजि बल्लाळ,
येथुनीच गेला पुढतीं, शत्रूंचा कर्दनकाळ;
येथुनीच चिमणा आप्पा,
वसईवर चढवी छापा,
त्या आकाशांतिल बापा–
पाठवी फिरंगी सगळा ! ४

येथुनीच नाना माझा, शत्रूवरि चालुनि गेला;
येथुनीच भाऊरायें, नाचवीत भाला नेला;
उदगीर–उदयगिरिवरती, शत्रूंचा नांगा चिरिला;
येथुनीच राघु भरारी,
अटकपार करुनी स्वारी,
गिलच्यांची भालि भंवेरी,
उडवुनी परतुनी आला ! ५

विजयश्री संपादोनी, धनभार विपुल घेवोनी;
येतांच वीर दारांत, विजयधुंद रणिं होवोनी;
सामोरें जावें त्यांना, आरती करीं घेवोनी;
काळीज सुपापरि व्हावें,
मन उचंबळोनी यावें,
प्रेमभरें ओंवाळावें,
न्हाणावें बाष्पें त्यांला ! ६

माझींच भूषणें मजशीं, नाहिंतशीं होतीं झालीं;
आणोनि परत तीं सारीं, ओंवाळणि मजला दिधली;
चंद्रकोर दिल्ली-पतिची, मस्तकीं विभूषित केली;
कन्नडचे सुंदर तोडे,
लेवविले वाडेंकोडें,
काबुलचे उमदे घोडे,
चालविले किति जिलबीला ! ७

मलमली पातळें ढवळीं, ढाक्याची तलम उन्हाळी;
नागपुरी चंदेरी कीं, चंद्रकळा सुंदर काळी;
औरंगाबादी साधी, कीं बऱ्हाणपुरि कांचोळी;
वरि शेला वेलबुटीचा;
पैठणचा कोइमतुरचा,
पदिं विजापुरी गादीचा—
मउ जोडा घालायाला ! ८

पण पुढें ? पुढें मी आतां, सांगावें काय कपाळ ?
मिळविलीं भराभर जैशीं, तैशीं तीं गेलीं बाळ !
तृण जैसें होतें खाक, पेटुनि पळ एक झळाळ;
चमचमाट करुनी चपला,
निमिषांत जाय विलयाला,
वळवाचा पाउस पडला,
पडला कीं नाहीं पडला ! ९

ते सुमंत परराष्ट्रींचे, येउनियां सांजसकाळ;
या इथेंच माझेपुढतीं, होते ना घोटित लाळ ?
चाटीत जिभेनें माती, घाशित कीं भाळ विशाळ;
पदरक्षा दूर करोनी,
दासापरि कर बांधोनी,
खालतीं तोंड घालोनी,
कुर्निसात करिती मजला ! १०

मर्जीचा कल माझ्या तो, बघुनियां जयीं वागावें;
फिरती या भुवया तैशा, साक्षेपें नाच करावें;
'आश्रयार्थ घ्या' या म्हणुनी, नित्य तोंड वेंगाडावें;

बहु मिठास बाता करुनी,
नित्य नव्या नजराण्यांनीं,
सुखवावें मजलागोनी,
पाहुनियां तालामाला ! ११

परि अवघ्या शत वर्षांत, दैवाचा हुकुनी डाव;
सगळेंच जाहलें उलटें, गाड्यावरि चढली नाव;
रावाचा होउनि रंक, रंकांचे झाले राव !
वरधनी जाहले तेच,
बटकुर मी होय सवेंच,
पाडुनियां माझी मीच,
घेतिली शिला दुःशीला ! १२

सप्तसिंधु दुस्तर तरुनी, तद्देशा प्रेषायाचा;
अनिवार योग हा यावा, कळसचि कीं दुर्दैवाचा;
येऊं नये आला कैसा, हा प्रसंग जीवावरचा ?
अंतरंग करपुनि जातें,
काळीज कलाकल उलतें,
वळचणिचें पाणी चढतें,
हा हाय कसें आढ्याला ! १३

येथुनीच जातां आजी, चालुनि परदेशावरती,
कासया ? न रिपु जिंताया, साधाया ज्ञानें मुक्ती;
मोक्षाची भिक्षा किंवा, मागाया भाकुनि विनती;
या युगांत कर्तव्याच्या,
चळवळिंच्या सामर्थ्याच्या,
या युगीं कणिकनीतीच्या,
कोण पुसे भिक्षांधीला ? १४

कर्माचा नसतां चाळा, भक्तिचा तसा जिव्हाळा;
कोणता न केंव्हा मोक्ष, ज्ञानानें केवळ झाला;
हें नित्य सत्य सांगाया, व्हावी का मीच तुम्हांला ?
कर्माची गीता गूढ,
बाळानें केली रूढ,
नुमजे ती इतुके मूढ,
काय तुम्ही सांगा झाला ! १५

मकराच्या दाढेखालीं, जें जाय एकदां रत्न,<br>
आपेंच न देइ सुखानें. कांहींहि न करितां यत्न,<br>
केवळ का भीड भिकेनें, मावळे भाव सापत्न ?

जा बोला सम्राटास,<br>
किति सहाय्य केलें त्यास,<br>
रणिं वेंचुनि शोणितमांस,<br>
तो रावण जिंतायाला ! १६

जा बोला सम्राटातें, संदेश आजचा माझा;<br>
आपदीं ऐन मी त्याचें, आले किति शतधा काजा;<br>
परहि दिलें खालीं करुनी, करितां नच गाजा वाजा;

स्मर कांहीं पूर्विल काळ,<br>
करिं त्याचा कांहीं ख्याल,<br>
न करीं बा माझे हाल,<br>
कांख्यावरि वस्त्र न घाला ! १७

रसफलीं परिमलीं आम्र, जो थारा सकलां झाला;<br>
चंडोल द्विजवर गानें, रमवी जो खिन्न मनाला;<br>
जें त्रिकालिं कारण झालें, गृह तनूस रक्षायाला;

त्या आम्रा काय चिरावें ?<br>
खगकंठा नख का द्यावें ?<br>
त्या खाल्ल्या गृहिं मोजावे-<br>
वासे; हा न्याय न झाला ! १८

जा बोला सम्राटातें, खडखडीत द्या जा जाब;<br>
हाचि काल बोलायाचा, घालवा न माझा आब;<br>
मुळुमूळूं न करणें तेथें, ही नसे उपेक्षे बाब;

जो बोले त्याची खपती,<br>
गाजरें भराभर म्हणती,<br>
केळींहि न त्याचीं खपती,<br>
जो दुर्बल बोलायाला ! १९

---

## १०. ते कोण कीं दुर्मती !

श्लोक—[ शार्दूलविक्रीडित ]

बालत्वींहि विटाळली न रसना मिथ्या जयें बोलुनी,
शिक्षेचें भय वा कधीं न शिवलें ज्याच्या मनालागुनी;
सत्तेजें[1] अपुल्या जयें दिपविलें सर्वत्र लोकांप्रती,
' खोटा ' त्या म्हणतां न दिक्कत जयां ते कोण कीं दुर्मती ! १

सत्यासाठिं नृपाळरोषहि जयें शांतें मनें सोशिला,
स्वार्थी मोहुनियां न ओक अपुला ज्यानें कधीं चाटिला;
धर्माख्या नरकेसरीस असल्या ' खोटा ' म्हणायास ती–
ज्यांची जीभ विशेष सैल सुटते ते कोण कीं दुर्मती ! २

' आम्ही भ्याड नसूं, नसूं विमतिही कीं दुष्ट जात्या नसूं,
छावे कीं हरिचे उदारहृदयी, जैशास तैसे असूं,
स्वार्था मारुनि लाथ हें शिकविलें ज्यानें स्वलोकांप्रती,
' स्वार्थी ' त्यास वदावया धजति जे ते कोण कीं दुर्मती ! ३

' मैत्री वस्तु अनर्घ्य ' जो शिकवि हें सर्वस्वही वेंचुनी,
पाळि जो निज मित्रदत्तकसुता पुत्रापरी मानुनी;
कारावासहि जो स्वमित्रविषयीं सेवी सुखें त्याप्रती–
नाहीं ओळख मैत्रिची वदति जे ते कोण कीं दुर्मती ! ४

ईषन्मात्र[2] करूनि कार्य सहसा येतां इथें गोखले[3],
गुंडाळूनि जयें विरोध सगळा आधीं तया पूजिलें;
ऐशा त्या स्थिरचित्त कार्यकुशली निर्द्वन्द्व योग्याप्रती–
अन्योत्कर्ष न पाहवे वदति जे ते कोण कीं दुर्मती ! ५

जेव्हां मद्यनिषेधनार्थ महती येथें सभा होय ती,
तेव्हां सर्व मतांतरें विसरुनी श्रीरामकृष्णांप्रती[4]–
ज्यानें बैसविलें सभापतिपदीं त्या साधुवर्याप्रती–
' हट्टी थोर दुराग्रहीहि ' वदती ते कोण कीं दुर्मती ! ६

काळानें गिळिलें सुतास जरिही, गेली गृहस्वामिनी–
सत्वाढ्या सहधर्मिणी झुरुनियां कांतार्थ आक्रंदुनी,

१ सत्याच्या तेजानें. २ किंचित्. ३ प. लो. वा. नामदार गो. कृ. गोखले.
४ डॉ. सर भांडारकर.

यत्कार्यी पडला न खंड कधिंही त्या कर्मयोग्याप्रती,
धाष्टर्यें जे जन ' कार्यचोर ' वदती ते कोण कीं दुर्मती ! ७
सप्तद्वीपवसुंधरा धृतिबलें सानंद उल्लंघुनी,
छातीठोकपणें वसे परगृहीं जो एकटा जाउनी–
वृद्धत्वींहि अशा, तयास ' कच तो खातो ' असें बोलती,
त्यांना काय म्हणूं ? विमुक्त पशु कीं, कीं सन्मती दुर्मती ! ८
जेथें शब्दचहाटळीस महती कार्यास संवर्जुनी,
तेथें ही असलीच कार्यघटना व्हावें भ्रमी कां मनीं ?
वाणीवंध्यविलास जेथ सुरु कीं, स्वातंत्र्य वैयक्तिक,
निंदा हेंच विशेष कार्य तिथलें; बोलें न मी लौक्षिक ! ९
निंदी कोण कुणा न आज जगतीं ? साक्षात् तुझी ही हरी,
निंदा बा ! करिती विरोध करुनी दुर्दान्त ते आसुरी !
' शापें तीव्र मदीय सूर्य मृत हा ' ऐसें निशेमाजिं जे,
जल्पे घूकतती, प्रभाति परि ते चित्तांत भारी [२]खिजे ! १०
निंदो कोणि कितीहि बाल तिलका त्याच्याच हातें खरी.
झाली उन्नति आमुची प्रभुवरा ! अत्यल्पही ती जरी;
' या देहीं नयनींहि याच बघुं दे '–निष्काम या योगिया–
स्वेच्छेची परिपूर्तता–जरि असें थोडीहि तूतें दया ! ११
हाडाचे असतील मात्र कुणि जे त्याचे खरे द्रोहक,
देईं त्यासम त्यांस आयु बल हीं वर्जूनियां दांभिक;
निंदा स्थूलमतिप्रती गमतसे अत्युग्र जी ऐकतां,
अंतर्बुद्धिस त्यामधेंच दिसतो स्तुत्यौघ वोलंघता ! १२

## ११. औक्षण !

**पद** [ चाल—घनश्याम सुंदरा...... ]

हृदयविलासा गुणिल पाडसा बघ ही पुण्यापुरी,
ओंवाळुनियां तुला तान्हया भावें औक्षण करी. ध्रु०
रविनीराजन उजळुनि ठेवुन गगनाचे भाजनीं,
या दिग्-युवती प्रमुदित चित्तीं ओंवाळिति साजणी;
नित्य–आत्मसंतुष्ट-सृष्टि ही प्रेमाकुल होउनी,
प्रभातलक्ष्मी सतनु तुजवरी टाकी कुरवंडुनी;

१ अलंकारिक. २ वरमते.

चंडोल द्विज घेत लकेऱ्या आला नभ भेदुनी,
कोकिलाप्सरा साथ करितसे मधुर पंचम स्वनीं;
घालिती भृंग रुंजी । बा स्वस्तिपाठ जणुं हे,
ढाळिती वृक्ष-वेली । सुम-रंग-रेणु मोहें;
द्विजसंघ जणूं शीर्षीं । मंगलाक्षता वाहे,
काळिज झालें सुपा-एवढें पाहुनि तुज यापरी !
ओंवाळुनियां तुला तान्हया भावें औक्षण करी. १



प्रभातकीर्ति प्रभातींच बा यावें तूं या स्थलीं;
वाटे म्हणुनी रमणी राजस रजनि दीर्घ जाहली;
दुष्टदृष्टि ती नये बाधुं तुज वाटे म्हणुनी जणूं,
नभोनीलिमा तुझे सभोंतीं पसरी सृष्टी म्हणूं;
रविकिरणांचा त्रास न व्हावा श्रांत तुझ्या मूर्तिला,
दाट धुक्याचा गमे तिनें जणुं पट इकडे सोडिला;
बा जन्मभूमिसाठीं । वेंचिले प्राण ज्यांहीं,
ते स्वभूभक्त सारे । होउनी मुदित हृदयीं,
गाळुनी तुहिनबिंदू । न्हाणिती तुजसि पाहीं,
मंगलधामा मनोभिरामा पाहें जरा तरि वरी !
ओंवाळुनियां तुला तान्हया भावें औक्षण करी. २

बंधुवृंद तव पहा लोटला तुजला भेटावया,
हर्षांभोधी जणूं उसळला इंदुस चुंबावया;
कुठें ठेवुं तुज कुठें न ठेवूं झालें ऐसें तया,
अमोघ चिंतामणी तयासी गमसी संचिन्मया;
जागोजागीं ध्वजा पताका कमानि उभवोनियां,
अतुल स्वागत करि तव जनता उत्सुक होवोनियां;
तेज हें तुझें बाळा । सोसे न ज्यां समूळ,
उठुनियां शूल शीर्षीं । घालिती तोंडिं धूळ,
मात्सर्यविषें जडलें । अनिवार त्यांस खूळ,
समाजकंटक असे बैसले दारें लावुनि घरीं,
ओंवाळुनियां तुला तान्हया भावें औक्षण करी. ३

राजपुरुषही आले सादर तुझिया सुस्वागता,
उत्साहानें करुनी सारी अटोकाट सिद्धता;
जागोजागीं संत्री बघ हे उभे राहिले कसे
इडा पिडा ती टळो म्हणोनी पळो अमंगळ तसें;
राजशासनें-काडतुसें-हीं बंदुकांत ठासुनी,
रौद्र शैलटी नवीं आयुधें तिखट पाजळोनी;
नांदतां मूर्त येथें । सत्त्वस्थ बंधुभाव,
शांतिचें दिव्य तैसें । नांदतां सौख्यपर्व,
संदेह अजुनि टाकी । भीतिचा काय डाव ?
' इच्छावें जें परां घरां ये ' सांगा कुणि त्या तरी,
ओंवाळुनियां तुला तान्हया भावें औक्षण करी. ४

मंगलसमयीं कशा अशांची झाली स्मृति ना कळे,
विटाळुनीयां तोंड कशाला अपशब्दीं घेतलें ?
बोलत आलों गारपिरावार डेरे जेथें दिले—
पूर्वीं विजयी होउनि येतां भटनृप बाहू-बलें,
विक्रमशाली गोसाव्यांचें वसतिस्थल पातलें,
रास्त्यांचें नव विशिष्टवैभव तुंग शिबिर हें भलें;
आदित्यवार आला । विलसले वीर जेथें,
खेळले रंग श्रीरंगा-। परी बाल भूप जेथें,
अंबार हाहि आला । चिरियला शत्रु जेथें,

ज्ञानशूर त हवा घेति ज्या आज स्थळिं त्या परी.
ओंवाळुनियां तुला तान्हया भावें औक्षण करी. ५
श्रीमंतांचा दुर्ग दुर्ग तो डोळे उघडुनि जया,
छाति न झाली कधीं रिपूंची नुसतें पाहावया;
रणवाद्यांचा रणवीरांचा जिथें निघावा ध्वनी,
जुनीं चिरगुटें तेथें आजी विकती बोहारिणी;
तीं तीं स्थानें पूर्विल रूपीं मजपुढतीं ठाकुनी.
सुयशोद्बोहक तुझे तसे ते कोलाहल मांडुनी;
आडुनियां मज पुसती । कोणता लाभ झाला ?
कोणता शत्रु वधिला । जीव हा केविं धाला ?
माळिसी सांग कोणा । देउनी आलबेला ?
मातृवृत्तिची परी कल्पना कोणा होणें खरी ?
ओंवाळुनियां तुला तान्हया भावें औक्षण करी. ६
भूपतिदत्ता सनद न दिसतां तुझिया हस्तांतरीं,
' रमाकांत तूं आळवीत कीं रड्या राउतापरी-
येशी ' ऐसें गणुनी द्वेष्टे तव तुज हसती वरी;
भावि कालकल्पना गबाळया होय केविं ती परी ?
काल संक्रमित व्हायापूर्वींच येशी गृहिं धांवुनी,
विरहें माझ्या सख्या राजसा व्याकुलमन होउनी;
चोरुनी अंग जे जे । योजुनी शब्द फोल,
कळवळा मातृभूचा । दाविती पिटुनि ढोल,
केविं या शब्दशूरां । बा कळे कार्य-मोल ?
जननिभक्तिचें खरें मर्म त्या केविं कळावें परी ?
ओंवाळुनियां तुला तान्हया भावें औक्षण करी. ७

---

# १२. मनाची ग्वाही.

अभंग.

मनासी आनंद । व्हावा हा कशाचा, बोध न हो याचा । माझा मज ! १
कशाचें वा दुःख । व्हावें मनालागीं, काय मी अभागी । निंदास्पद ? २
सुखदुःख दोन्ही । काळाचीं खेळणीं, कर्म-उगवणी । ज्याची त्याची ! ३
आनंद तो खोटा । दुःखही तें खोटें, उगीच बोभाटे । केले लोकीं ४
स्तुतीनें सहर्ष । निंदिनें सामर्ष, खरा परामर्ष । कोण करी ? ५
एकानें निंदावें । दुजानें वंदावें, तिजानें हंसावें । व्याजें मज ६
काय माझी झाली । जगासी परीक्षा, पाहिली तितीक्षा । काय माझी ? ७
वस्त्रें उंची उंची । लेई मी सुखाचीं, चोरीचीं भाड्याचीं । कोण जाणें ? ८
किंवा मळकट । चिंध्याचा जोजार, हीन दीन फार । कृपण कीं. ९
कोण जाणे कळा । माझी काय असे ? वृथा निंदी हंसे । जग मज. १०
भाविक भाबडा । वरोनी मी दिसें, चित्तीं कैसा असें । कोणं जाणें ? ११
डोंगर दुरूनी । दिसती साजिरे, श्वापदें भेसुरें । परि गर्भीं ! १२
दिसे वरी रूप । हिरवें गोमटें, खातां परी भेटे । मृत्यु कूपीं ! १३
कृष्णवर्णं पिका । मानिजे कावळा, परि तो जिव्हाळा । वसंताचा ! १४
दिसे कास मोठी । गाय घरा न्यावी, सूज ती निघावी । बिबव्याची ! १५
म्हणोनी हिताची । आतां एक गोष्ट, सांगतों मी स्पष्ट । ऐका सारे. १६
अंतरंग कैसें । ज्याचा तोचि जाणे, स्तविणें निंदणें । वाया लोकीं ! १७

---

